इरावती कर्वे

# युगान्त

ऊर्ध्वबाहुर्विरौम्येष न च कश्चिच्छृणोति माम् ।
धर्मादर्थश्च कामश्च स किमर्थं न सेव्यते ॥

बाहू उभवून आरडतो । परी कोणी न आयके ।
अर्थ काम मिळे धर्मे । का त्याला न सेविता ॥

# अनुक्रमणिका


| | | |
|---|---|---|
| १. | निवेदन | ९ |
| २. | प्रस्तावना | ११ |
| ३. | शेवटचा प्रयत्न | २५ |
| ४. | गांधारी | ४९ |
| ५. | कुंती | ६३ |
| ६. | पितापुत्र | ८६ |
| ७. | द्रौपदी | १०१ |
| ८. | मयसभा | १२८ |
| ९. | 'परधर्मो भयावहः' | १४३ |
| १०. | मी कोण ? | १६१ |
| ११. | कृष्ण वासुदेव | १८८ |
| १२. | युगान्त | २३८ |

ऊर्ध्वबाहुर्विरौम्येष न च कश्चिच्छृणोति माम् ।
धर्मादर्थश्च कामश्च स किमर्थं न सेव्यते ॥

बाहू उभवून आरडतो । परी कोणी न आयके ।
अर्थ काम मिळे धर्मे । का त्याला न सेविता ॥

# निवेदन

हे पुस्तक तयार होण्यास अनेकांची मदत झाली. त्या ऋणाचे कृतज्ञतापूर्वक स्मरण करण्यासाठी हे निवेदन आहे. गेली पाच वर्षे मी हे लेख लिहीत आहे. पुष्कळ वेळा प्रसिद्ध न झालेले पण तयार असलेले संशोधित आवृत्तीचे महाभारताचे भाग मला ताबडतोब पाठवून देऊन प्रो. रा. ना. दांडेकरांनी मला मदत केली. सर्व लेख एकत्र करून पुस्तक बांधावे अशी कल्पना आली, तेव्हा प्रो. नरहर कुरुंदकर ह्यांनी सर्व लेख चिकित्सेने वाचून अनेक सूचना केल्या. आमच्या कॉलेजचे मुख्य प्रो. सु. मं. कत्रे ह्यांनी किती वेळा मदत केली, त्याला गणतीच नाही. कोठच्याही संस्कृत शब्दाचा मी करते तो अर्थ बरोबर आहे का, अर्थ कळला नसल्यास तो अर्थ काय, हे समजण्यासाठी डिक्शनरी उघडायची तसदी न घेता मी सरळ प्रो. कत्र्यांकडे जात असे, व तेही हातांतले काम बाजूस ठेवून पहिल्याने

माझी जिज्ञासा पुरी करीत. तोच उपयोग प्रो. मेहेंदळ्यांचाही झाला. प्रो. कालेलकरांनी मराठी व त्याचे इंग्रजी संस्करण बारकाईने वाचून कित्येक ठिकाणी चुका दाखवून दिल्या. प्रो. पुंडलीकांबरोबर झालेल्या अनेक संभाषणांमुळे विचार पक्के बांधावयास मदत झाली. माझे पी-एच. डी.चे विद्यार्थी श्री. डिंगरे ह्यांनी बऱ्याच लेखांची नक्कल केली. टीकाकारांनी व लेख प्रसिद्ध झाल्यावर शंका काढणाऱ्यांनी विचाराला चालना दिली, व लेख परत तपासून त्यांतील चुका काढून टाकण्यास मदत केली. घरची मुले जाई, रजनी, गौरी व आनंद ह्यांच्या, इतरांच्या मानाने जरा जादा निर्भीड मतप्रदर्शनामुळे लेख लिहिताना जास्त खबरदारी घेतली गेली. यजमानांनी मदत केली, व्याकरण तपासले, इंग्रजी शब्दांचे स्पेलिंग तपासले – टीका मात्र मुळीच केली नाही. ज्या अनेक मित्रांनी हे पुस्तक प्रसिद्धीस आणण्यात मदत केली, त्यांत प्रा. अरविंद मंगरूळकर यांचा आवर्जून उल्लेख करावयास पाहिजे. त्यांनी अनवधानाने राहिलेल्या व इतरही कित्येक चुका दाखवून दिल्या व हस्तलिखित सुधारण्याची मला संधी दिली. देशमुख-पतिपत्नींची मदत सर्वच बाजूंनी झाली. लेख तपासणे, टीका करणे, नकला करणे व मी अगदी कावून गेले असले, म्हणजे मला संभाळून घेणे ही सर्वच कामे त्यांच्यावर पडली. ही सर्वांची मदत, चालना व टीका नसती, तर लेख लिहूनच झाले नसते.

दिनांक १४ जानेवारी, १९६७ इरावती कर्वे

## प्रस्तावना

१

यातील दुसरा लेख 'गांधारी' जुलै १९६२-मध्ये लिहिला. त्या वेळी महाभारतातील व्यक्तींवर आणखी काही लेख मी लिहीन, अशी कल्पनाही नव्हती. एकातून एक ह्याप्रमाणे गेल्या पाच वर्षांत लेख लिहिले गेले. प्रत्येक लेख लिहिताना आता ह्यापुढचा लिहीन, अशी कल्पना नव्हती. तशा तऱ्हेचे लिखाण आता ह्या पुस्तकाबरोबर संपले, असेही नाही. प्रत्येक लेख लिहून झाला की वाटत होते की, हा लेख शेवटचाच! ह्यापुढे आता तेच-तेच येत राहणार. आता काही लिहायचे नाही. तशीच भावना ह्याही क्षणाची आहे. ती कायम राहते की परत आणखी काही मी महाभारतावर लिहिणार, हे आज काही सांगता येत नाही. माझ्या पुष्कळ मित्रांनी मी हे का लिहिले,

म्हणून विचारले. ह्या प्रश्नाचे उत्तर देणे शक्य नाही. बोलण्या-लिहिण्या-मागे माझ्या मते एकच हेतू – आपल्याला काहीतरी उत्कटतेने वाटत असते, ते इतरांना सांगावे हा. ही एक दबून न राहणारी प्राथमिक प्रवृत्ती आहे. ह्यापेक्षा जास्त काही हे लेख लिहिताना माझ्या मनात होते, असे मला आढळत नाही. पेशा मास्तराचा असल्यामुळे आपण सांगतो ते इतरांना जास्तीत-जास्त कळावे, अशी इच्छा. त्यामुळे विवरण स्पष्ट व सुबोध व्हावे, हा माझा कटाक्ष आहे. माझे लिखाण काय आहे, हे कळून त्यात एखाद्याला काही आक्षेपार्ह वाटले, चुकीचे वाटले व त्याने त्याप्रमाणे म्हटले, तर मला काही दुःख होत नाही; पण माझे लिहिणे निष्काळजीपणाचे होऊन त्यातून निराळाच अर्थ निघत असला, तर मला वाईट वाटते. उदा. माझ्या एका मित्रांनी 'द्रौपदी'च्या शेवटी असलेल्या "पुढच्या जन्मी थोरला भाऊ हो, भीमा !" ह्या वाक्याचा अर्थ "पुढच्या जन्मी माझा (द्रौपदीचा) थोरला भाऊ हो," असा केला, ह्याचे मला फार वाईट वाटले. माझ्या मनातील द्रौपदी पाच नवऱ्यांशी इमानाने वागणारी होती. शिवाय, एखाद्या पुरुषाची बायको म्हणून राहून त्याच्यापासून मूल झाल्यावर त्याला पुढच्या जन्मी का होईना, 'भाऊ हो,' हे म्हणणे मला अस्वाभाविक, दांभिक व सर्वतया अशक्य वाटते. म्हणून ह्या आवृत्तीत माझा आशय स्पष्ट करण्यासाठी "पुढच्या जन्मी पाचांतला थोरला भाऊ" असे शब्द घातले आहेत. माझ्या आशयाचा विपर्यास होईल, असे आणखी काही राहिले नसेल, अशी आशा आहे.

मी महाभारताची भांडारकर इन्स्टिट्यूटने काढलेली संशोधित आवृत्तीच वापरलेली आहे. त्यामुळे पूर्वी आपल्याला महाभारतात आहेत अशा वाटत असलेल्या बऱ्याच गोष्टी गळल्या आहेत. लेखांत ठिकठिकाणी त्या नमूद केलेल्या आहेतच. त्याशिवायही ह्या आवृत्तीत

राहिलेल्या पण उघड-उघड मागाहून घुसलेल्या गोष्टीही पुष्कळ आहेत. ह्याचे कारण सध्याची 'भांडारकर-आवृत्ती' ही सर्व हस्तलिखिते तपासून झाल्यावर जुन्यांत जुन्या हस्तलिखितावर आधारलेली आहे हे. जुन्या हस्तलिखितांत सर्वस्वी नाही, पण इतर हस्तलिखितांतून काहींत आहे, काहींत थोडेसे आहे, असे जर काही असेल, तर ते ह्या नव्या आवृत्तीत काढून टाकलेले आहे. आपल्याला नव्या आवृत्तीने जे दिले, ते संपादकांना मिळालेल्या सर्वांत जुन्या आवृत्तीत आढळते ते! ही आवृत्ती ख्रिस्ती शकाच्या आठव्या-नवव्या शतकामागे जात नाही. ही आवृत्ती आता पुढील संशोधनास व अभ्यासास योग्य अशी झाली आहे. आतापर्यंतचे संशोधन बव्हंशी बाह्य रूपावर आधारलेले होते. आता जी प्रत मिळाली आहे, तीमध्ये उघड-उघड मागाहून घुसडलेले, कथेशी काडीमात्र संबंध नसलेले असे कितीतरी भाग आहेत. अभ्यासाने ते काढण्याची आवश्यकता आहे. तसे झाल्यास आणखी काही वर्षांनी भांडारकर-प्रतीत जे आहे, त्यांतले निम्मेशिम्मे जाऊन कदाचित आणखी एक संशोधित आवृत्ती मिळण्याचा संभव आहे. एवढ्यावरच हे काम थांबत नाही. कदाचित त्याहीपुढे जाऊन महाभारताच्या मुळाशी असलेली 'जय' नावाची गाथा प्रस्थापित होण्याची शक्यता आहे. जसजसे संशोधन होत राहते, तसतसे संशोधनाचे नवे-नवे मार्ग उपलब्ध होतात. जुन्या पिढीतील संशोधनाच्या चुकाही समजतात. म्हणून कुठचेही एक संशोधन म्हणजे कोणत्याही गोष्टीवर अगदी शेवटचे शिक्कामोर्तब झाले, असे समजू नये.

संस्कृत हा माझा अभ्यासाचा विषय नव्हे. मी महाभारत वाचते, ते आवड म्हणून. मला जे भाग प्रक्षिप्त वाटले, किंवा मागाहून घुसडलेले वाटले, त्यांचा मी पदोपदी उल्लेख केलेला आहे. हे माझे मत वाचता-वाचता झालेले आहे. त्याच्या पाठीमागे भक्कम संशोधन

नाही. मला प्रक्षिप्त वाटलेला भाग संशोधनाने तसा नाही असे ठरले, तर तेवढ्यापुरते माझे विवेचन चुकले, असे म्हणावेच लागेल. पण एरवी 'बाईंचे विवेचन चुकले,' असे म्हणता येणार नाही. 'पटत नाही,' असे जरूर म्हणता येईल. महाभारत ही एक मोठी खाण आहे. तीतून काही बाहेर काढायचे, तर निरनिराळ्या तऱ्हांनी काढता येईल. एकाने जे लिहिले, त्यांत सर्व काही आले – यावे, असे म्हणताच येणे शक्य नाही. जो-तो आपल्या कुवतीप्रमाणे ह्या संस्कृति-भांडारातील द्रव्य वापरीत असतो. ज्योतिषशास्त्र, भाषाशास्त्र, प्रागैतिहासिकशास्त्र ही माहीत असणाऱ्यांना महाभारतातील व्यक्तींवर व प्रसंगांवर निरनिराळ्या तऱ्हांनी लिहिता येईल. मी लिहिले, ते माझ्या कुवती-प्रमाणे व आवडीसाठी. काही गोष्टींचा नुसता उल्लेख केला आहे. (उदा. 'आज्य' म्हणजे काय असावे; 'घृत' म्हणजे काय असावे.) पण त्या गोष्टींवरती मी संशोधन केलेले नाही. हे लिहिण्याचे कारण कोणीतरी तरुण वाचक कदाचित ह्या असल्या संशोधनात रस घेऊन त्याच्या मागे लागेल, व माझ्या चित्रणांत ज्या उणिवा आहेत, त्या भरून काढील हे.

'गांधारी' हा लेख प्रसिद्ध झाल्यावर माझ्या एका तरुण हिंदी मित्राने विचारले, 'ही गांधारी कोण होती बुवा?' मला अतिशय वाईट वाटले. आपण ह्या युगात निरुपयोगी, उगीचच भूतकाळात वावरणारी अशी एक अडगळ आहोत, असे वाटले. पुढे काहीच लिहू नये, असेही उद्वेगाच्या भरात वाटले. किंवा इंग्रजी आवृत्तीत लिहिल्याप्रमाणे महाभारताची सबंध गोष्टच प्रस्तावनेत लिहावी, असेही मनात आले. पण हे दोन्ही मार्ग विचारान्ती सोडून दिले. मी अतिशय हट्टी आहे. तरुण पिढी आपले म्हणणे माझ्या गळी उतरविण्याचा प्रयत्न सारखा करीत असते. तीन अत्याधुनिक मुले व पी-एच. डी.चे तरुण विद्यार्थी

ह्यांच्या हल्ल्याला मी सारखी तोंड देत असते. माझे म्हणणे ह्या पिढीच्या गळी उतरविण्याचाच हा एक प्रयत्न आहे. माझे विवेचन चुकले असे वाटून ह्या पिढीने महाभारत वाचले, तरी मी जिंकले, असे मला वाटेल.

## २

महाभारताची संशोधित आवृत्ती म्हणजे काय, संशोधन कसले झाले, पन्नास वर्षे खपून काढलेल्या ह्या आवृत्तीवर माझे लेख आधारलेले आहेत असे मी म्हणते, मग अमका भाग मागाहून घुसलेला, अमका प्रक्षिप्त असे मला वाटते, असे मी कसे म्हणू शकते, इत्यादि प्रश्न राहतातच. हा रुक्ष वृत्तान्त प्रस्तावनेत मी मांडणार नव्हते; पण बऱ्याच मित्रांनी परत-परत हेच प्रश्न विचारले, म्हणून लिहीत आहे. ज्यांना अगोदरच माहिती आहे, ज्यांनी सुखटणकरांचे मूळ लेख वाचले आहेत, त्यांनी त्या लेखांवरूनच घेतलेली ही माहिती वाचण्याची गरज नाही. तसेच, ज्यांना इतिहासाच्या काथ्याकुटात शिरायचे नाही, त्यांना हा भाग न वाचताही लेख समजायला काहीच अडचण नाही. पण बऱ्याच जणांना जिज्ञासा आहे; माझी भूमिका काय, हे समजायला त्यामुळे मदत होईल, असेही त्यांना वाटते. म्हणून थोड्याशा अनिच्छेनेच हें विवरण करीत आहे.

ज्या पुस्तकाचे शास्त्रीय संपादन होते, ते जुने असते. काही दशकांचे असेल, काही शतकांचे असेल, काही सहस्रकांचे असेल. त्याचा ग्रंथकार (– एक वा अनेक –) जिवंत नसतात. आणि त्याच्या बऱ्याच आवृत्त्या प्रचारात असतात. बऱ्याच वेळा तो ग्रंथ निरनिराळ्या भाषांतूनही असतो. अशा वेळी सर्व उपलब्ध आवृत्त्या तपासून, सवात

जुनी, शक्य तर ग्रंथकाराच्या वेळची आवृत्ती संपादन करण्याचा जो प्रयत्न, त्यालाच एका प्रकारची संशोधित (critical) आवृत्ती म्हणतात. दुसऱ्या तऱ्हेच्याही संशोधित आवृत्त्या असतात. ते पुढे दिलेले आहे. बायबलच्या अशा आवृत्त्या सारख्या निघत आहेत. काही नवा शोध लागला की, जुन्या आवृत्तीवर प्रकाश पडत राहतो. म्हणजे अशी एखादी आवृत्ती काढली, तर ते शेवटचे संशोधन झाले, असे म्हणता येत नाही. अमक्या एका काळी जो पुरावा उपलब्ध होता त्यावर आधारलेली अमकी आवृत्ती, एवढेच म्हणता येईल. महाभारताच्या संपादकांचाही एवढाच दावा आहे. महाभारताचे एखादे नवे हस्तलिखित भारतातच नव्हे, तर भारताबाहेर – चीन, तिबेट, ब्रह्मदेश इकडे – मिळाले, तर ते मिळविण्याची खटपट हेच संपादक पहिल्याने करतील व त्यामुळे जास्त आधीचे काही मिळाले, तर त्याबरहुकूम आपल्या आवृत्तीत सुधारणा करतील.

महाभारत-संपादनात एक हजारावर हस्तलिखिते तपासण्यात आली. काही पोथ्या सबंध महाभारताच्या मिळाल्या, काही थोड्याशा पर्वांच्याच मिळाल्या. सर्वच सारख्या महत्त्वाच्या नव्हत्या. त्यांतल्या ज्या महत्त्वाच्या ठरल्या, त्यांची फारच बारकाईने छाननी झाली. नव्या संशोधित आवृत्तीतील शब्द-न-शब्द बाकीच्या आवृत्त्यांतील शब्दांशी ताडून पाहिला आहे. हे सांगितले, म्हणजे काम किती किचकट व परिश्रमाचे होते, हे कळेल.

महाभारताच्या आवृत्त्या गोळा केल्यावर सुखटणकरांनी जी पहिली गोष्ट प्रस्थापित केली, ती ह्या निरनिराळ्या आवृत्त्यांचे वर्गीकरण व त्यांतील फरक. त्यात असे दिसून आले की, मिळालेल्या आवृत्त्यांचे 'उत्तरेकडल्या' व 'दक्षिणेकडल्या' अशी प्राथमिक विभागणी होते. उत्तरेकडल्या आवृत्त्यांत एकमेकींशी मिळत्या-जुळत्या पुष्कळ गोष्टी

आहेत; तसेच दक्षिणेकडच्या पोथ्यांतून आपापसांत साम्य आहे. उत्तरेकडच्या पोथ्यांचे परत दोन विभाग पडतात. एकात शारदालिपीत लिहिलेली, काश्मिरात भूर्जपत्रांवर लिहिली गेलेली एक पोथी, व त्याच पोथीच्या वा तसल्याच पोथीच्या आधारे केलेल्या इतर पोथ्या. ह्या गटाला 'K' नाव दिलेले आहे. दुसऱ्या विभागाचे परत दोन भाग पडतात. एकात मैथिली, बंगाली व नेपाळी लिपींत लिहिलेल्या पोथ्या व दुसऱ्यात देवनागरी-लिपीत लिहिलेल्या पोथ्या. दक्षिणेकडील पोथ्यांचेही दोन विभाग पडतात. एका विभागात तेलुगू व ग्रंथ लिपींत लिहिलेल्या पोथ्या व दुसऱ्या विभागात मल्याळी लिपीत लिहिलेल्या पोथ्या. ह्या पोथ्यांचा एकमेकींशी व मूळ भारताशी काय संबंध असावा, हे खालील आकृतीवरून सुखटणकरांनी दाखविले आहे.



आज ज्या आवृत्त्या उपलब्ध आहेत, त्या सर्व तळच्या ओळीतील. वरच्या ओळींतील सर्व आवृत्त्यांचे काय झाले असावें, ह्याचा तर्क करून त्या कल्पिलेल्या आहेत. व्यासाने भारत सांगितले, ते पाच शिष्यांना. तीच पांडवांची 'जयगाथा', – 'जय' नावाचे काव्य, असा तर्क आहे. पाच शिष्यांना कथा सांगितली, तिची प्रत्येकाने आपल्या मनाप्रमाणे व कलाप्रमाणे मांडणी केली. जैमिनीने दुर्योधनाच्या बाजूने लिहिले असावे, असा एक तर्क आहे. (आश्वमेधिक-पर्वातील प्रो. करमरकरांची प्रस्तावना पहावी.) तिघांनी लिहिली असल्यास आज त्यातील काहीच उपलब्ध नाही. आपल्यापुढे जी कथा आहे, ती वैशंपायनाने अर्जुनाच्या पणतवाला (जनमेजयाला) जी सांगितली, तिची वाढविलेली आवृत्ती आहे. कारण ही कथा उग्रश्रवा लोमहर्षणीने नैमिषारण्यात कुलपती शौनकाला जी सांगितली, ती आहे. व्यास-भारत, वैशंपायन-भारत, लोमहर्षणीने वैशंपायनाचे म्हणून सांगितलेले ते मूळ महाभारत, अशा पायऱ्या कल्पिल्या आहेत. ह्या मूळ महाभारताची एक पायरी उत्तरेकडच्या सध्याच्या पोथ्यांच्या मुळाशी व दुसरी दक्षिणेकडच्या पोथ्यांच्या मुळाशी. उत्तरेकडील मुळातून वायव्येकडील एक आवृत्ती निघाली. (ह्याला सुखटणकरांनी $\nu$ – 'न्यू' हे ग्रीक अक्षर – घातले आहे.) तीपासून शारदा व देवनागरी या लिप्यांत लिहिलेल्या पण शारदेवर आधारलेल्या पोथ्या निघाल्या. गंगेच्या खोऱ्यासाठी ($\gamma$ – 'गामा' हे ग्रीक अक्षर –) एक version होते. त्यातून पूर्वेकडच्या भाषांची ($\epsilon$ – 'एप्सिलॉन' हे ग्रीक अक्षर – हे मूळ धरून) नेपाळी, मैथिली व बंगाली ही महाभारते लिहिली गेली. ही सर्व महाभारते शारदा व 'K' ह्या पोथ्यांपेक्षा विस्ताराने मोठी आहेत. गंगेच्या खोऱ्यातील पोथ्यांपासूनच पण खूप भर पडून निघालेल्या पोथ्या म्हणजे देवनागरी-लिपीतील पोथ्या. ह्यांत

श्लोकसंख्या अतिशय आहे. उत्तर, दक्षिण, पूर्व या सर्व भागांतील पोथ्यांतून घेतलेले भागही आहेत. दक्षिणेकडच्या मूळ ग्रंथातून खूप भर पडलेल्या एका σ ('सिग्मा') नावाच्या आवृत्तीच्या पोथ्या निघाल्या. तीतून ग्रंथ व तेलुगू पोथ्यांचा उगम झाला. दक्षिणेकडच्याच मूळ ग्रंथांतून पण नवीन भर न पडता साधलेली आवृत्ती ती मल्याळी भाषेतील पोथ्यांची.

ह्या पोथ्यांतील बहुतांश पोथ्यांवर कालनिदर्शक असा महिना वा वर्ष दिलेलेच नाही. ज्यांच्यावर दिलेले आहे, त्यांतील सगळ्यांत जुनी नेपाळी पोथी इसवी सन १२००-च्या सुमाराची. सर्वांत अर्वाचीन इ. स. १८४२-मधली! जी पोथी सर्व कामाला आधार म्हणून घेतलेली ती मुंबईत छापलेली व येथल्याच हस्तलिखितांवर आधारलेली वर दिलेल्या देवनागरी-परंपरेतील व भारुडभरती झालेली अशी निघाली. पण ती पोथी छापलेली असल्यामुळे विलायतेत व इकडे सर्वांना माहीत होती, व तीतले गेले काय, राहिले काय, हे येथल्या व तिकडल्या विद्वानांना तपासून पाहता येणे शक्य होते. सर्वत्र माहीत असलेल्या ह्या आवृत्तीचा 'The Vulgate' ह्या नावाने सर्वत्र उल्लेख आहे. [Vulgate = नेहमीच्या प्रचारातील सर्वांना ठाऊक असलेली आवृत्ती. हा शब्द मूळ इटालियन वा लॅटिन भाषेत असलेल्या बायबलच्या प्रतीला लावलेला होता. – Oxford Dictionary.]

ही निरनिराळी हस्तलिखिते पाहता असे दिसून आले की, 'शारदा' हे सर्वांत कमी श्लोकांचे महाभारत आहे. K-च्या बहुतेक आवृत्त्या त्याशी जुळत्या आहेत. नेपाळी जुनी आवृत्तीही त्याच्याशी खूप जुळती आहे. एवढेच नव्हे, तर दक्षिणेकडील मल्याळी आवृत्तीही बऱ्याच बाबतींत शारदेशी जुळते. म्हणजे कधीतरी जुन्या काळी दक्षिणेकडे जी आवृत्ती गेली, व जिच्यापासून पुढे मल्याळी आवृत्ती

निघाली, ती उत्तरेकडच्या आवृत्तीपेक्षा फार निराळी असावी. तीत भर पडून मैथिली वगैरे आवृत्त्या निघाल्या व सारखी भर पडपडून शेवटी देवनागरी आवृत्त्या निघून मूळ भारताला 'शतसाहस्री संहिता' असे नाव मिळाले. प्रत्येक गटाचे काही विशेष आहेत. उत्तरेकडच्या आवृत्तींत नसलेला व ग्रंथ व तेलुगू या आवृत्तींत आलेला एक विशेष म्हणजे एका विशिष्ट प्रकारचा नीतिबाजपणा. उत्तरेकडच्या आवृत्तींत दुष्यन्त-शकुन्तला, ययाति-शर्मिष्ठा ह्यांचे लग्न झालेले नाही, हे स्पष्ट आहे. दक्षिणेकडे ह्या लग्नसमारंभाचा व ब्राह्मणांना दिलेल्या दक्षिणेचाही उल्लेख आहे. एवढेच नव्हे, तर सत्यवतीचे व पाराशराचेही मोठ्या समारंभाने लग्न लावून दिलेले आहे! देवनागरी लिपीतून असलेली पण शारदा, K व नेपाळी यांमध्ये नसलेली अशी प्रकरणे म्हणजे कणिकनीती, दुर्वासाने हजारो शिष्यांसह वनात जाऊन पांडवांकडून जेवण मागणे, व द्रौपदीचा धावा आणि कृष्णाने वस्त्रे पुरविणे. शिवाय, लहान-लहान प्रकरणे तर कितीतरी आहेत. सर्वांत मोठ्या पोथीत शतसहस्र नाहीत, पण ९५५८६ श्लोक आहेत, तर संशोधित आवृत्तीत ८९१३६ राहिले आहेत.

प्रत्यक्ष महाभारताच्या पोथ्यांखेरीज सापडतील तशी इतरही प्रमाणे ह्या आवृत्तीसाठी उपयोजिली आहेत. त्यांतील एक म्हणजे महाभारताचा संक्षेप करून लिहिलेला 'भारतमंजरी' नावाचा ग्रंथ. हा क्षेमेंद्राने सुमारे इ. स. ११०० ते १२००-च्या दरम्यान लिहिला आहे. जेथे श्लोक-न-श्लोक तपासला जातो, तेथे अशा ग्रंथाची उपयुक्तता मर्यादितच. पण काही बाबतीत तो उपयुक्त ठरला. क्षेमेंद्राने महाभारतातील आख्यानांची जंत्री दिली आहे. तीतही 'कणिकनीती' हे प्रकरण नाही. काही श्लोक नसते, तर त्यावरून कयास बांधता आला नसता. पण ज्या प्रकरणावर टीका लिहिल्या आहेत, ते सबंध

प्रकरणच नसावे, म्हणजे शारदादि पोथ्यांच्या (–ज्यांचा काल दुर्दैवाने माहीत नाही, –) जुनेपणाबद्दल पुरावा मिळतो.

आंध्रात वादिराज नावाच्या कवीने ह्याच सुमारास तेलुगू भाषेत महाभारताचे भाषांतर मुळातील श्लोक न वगळता केले आहे. त्याही भाषांतराची छाननी करून वादिराजापुढे कोणती प्रत असावी, ह्याची छाननी झाली.

महाभारत-ग्रंथ जावामध्ये १५००-च्या सुमारास गेला व तेथे त्याचे तिकडील भाषेत भाषांतर झाले. अधूनमधून मूळ संस्कृत श्लोकांचे व श्लोकार्धांचे बरेच भ्रष्ट असे उतारे त्यांत आहेत. ह्या उताऱ्यांचाही तुलना करताना फार उपयोग झाला. पुष्कळदा जुना संस्कृत शब्द न कळल्यामुळे जेथे नवा शब्द देवनागरी आवृत्त्यांत घातलेला आहे, तेथे जावा-आवृत्तीत जुनाच शब्द सापडला आहे.

ह्या तीन ग्रंथांखेरीज महाभारतावरील टीकाकारांच्या टीकांचाही फार उपयोग झाला आहे. ते टीकाकार पुढीलप्रमाणे : देवबोध → विमलबोध → सर्वज्ञ-नारायण → अर्जुनमिश्र → नीलकंठ.

देवबोधाची टीका ‘ज्ञानदीपिका’ या नावाची आहे. देवबोध इ. स. १०००–११००-च्या सुमाराचा असावा. सर्वांत जुना टीकाकार, तसाच अतिशय विद्वान, म्हणून त्याची ही टीका फार उपयोगी पडली. विमलबोधाची टीका ‘दुर्घटार्थप्रकाशिनी’ किंवा ‘विषमश्लोकी’ नावाची आहे. काल नक्की नाही. सर्वज्ञनारायणाची टीका ‘भारतार्थप्रकाश’ नावाची आहे. काल सुमारे इ. स. ११००. अर्जुनमिश्राच्या टीकेचे नांव ‘भारतार्थप्रदीपिका’. काल सुमारे इ. स. १४००. नीलकंठाची टीका ‘भारतभावदीप’ नावाची व तिचा काल सुमारे इ. स. १७००. ह्याची माहिती सर्वांत जास्त. हा गोदावरीतीरावरील कोपरगावचा राहणारा. जातीने ब्राह्मण. बाप

गोविंदसूरि व आई फुल्लाम्बिका. देवबोधाच्या टीकेत बरीच प्रकरणे नाहीत. ती शारदा-आवृत्तीतही नाहीत. म्हणजे देवबोधाची टीका व शारदा-आवृत्ती एकमेकींना पूरक आहेत. शिवाय, अर्वाचीन आवृत्तीत आलेले नवे शब्द तीत नसून शारदेत आलेले जुने शब्द आहेत, व त्यांचा अर्थही नीट लावलेला आहे. ह्यांखेरीजही इतर टीकाकार होऊन गेले.

महाभारताच्या पोथ्या, टीकाकार वगैरे वर दिलेल्या साधनांशिवाय महाभारताचे श्लोक वा आख्याने इतर कोठे आलेली असल्यास त्यांचाही उपयोग केलेला आहे. उदा. भीष्मपर्वाचे संपादन करताना प्रो. बेलवलकरांनी असे दाखविले आहे की, सध्या आपल्याला माहीत असलेली गीताच शंकराचार्यांच्या पुढे भाष्य करताना होती.

ह्या सर्वांचा अर्थ हा की, सध्या संपादित केलेली आवृत्ती जुन्यांत जुन्या माहीत असलेल्या हस्तलिखितांच्या परीक्षणाने सिद्ध झालेली आहे. हे हस्तलिखित सन १०००-च्या सुमाराचे असावे. म्हणजे महाभारत-कथा ख्रिस्तपूर्व १०००-ची धरली, तर घडलेल्या वृत्तान्ताच्या नंतर ते २००० वर्षांचे आहे. आज जी आवृत्ती आपल्या पुढ्यात आहे, तिच्यात उघड-उघड प्रक्षिप्त भाग असूनही सर्व जुन्या पोथ्यांत —विशेषतः शारदा व मल्याळम अशा दोन टोकांच्या पोथ्यांत— तो आहे म्हणून —हात न लावता तो जसाच्या-तसा ठेवला आहे. खुद्द संपादकांनी ठिकठिकाणी हे दाखविले आहे. पण त्यांच्यापुढे जे कार्य होते (जुनी पोथी काय, ते हुडकून काढणे), त्यामुळे अंतर्गत विरोधात त्यांना शिरता येत नव्हते. जुने सौत वाङ्मय ब्राह्मणांच्या हाती जाऊन अध्यायचे-अध्याय भृगु-कथा त्यांत घुसडल्या गेल्या आहेत. कृष्ण ज्यात मुख्य देवता आहे, तो भागवतधर्म प्रचारात आल्यावर कृष्णाच्या अतिमानुषत्वाच्या व देवपणाच्या गोष्टी व अवास्तव स्तुती

त्यात मागाहून आली आहे. सध्याच्या पोथीमध्येच महाभारताला दोन सुरवाती आहेत. अशा एक-ना-दोन अनेक गोष्टी खुद्द सुखटणकरांनी व इतर संपादकांनी जागोजाग दाखविल्या आहेत. त्या जमेस धरूनच बहुतेककरून मी अमके प्रक्षिप्त, अमके मागाहून घुसडलेले, असे म्हटले आहे. क्वचित एखाद-दुसऱ्या ठिकाणी स्वतःची बुद्धी वापरून तसे म्हटले आहे.

संशोधित आवृत्ती ही सटीक आवृत्ती नव्हे. ती काय व तिच्या मर्यादा काय, हे कळलेच असेल. ही आवृत्ती हाताशी आली आहे. आता तिच्यावर पुढचा अभ्यास होऊन अंतर्गत संशोधनाने अगदी उघड-उघड प्रक्षिप्त भाग काढले, म्हणजे दुसरी संशोधित आवृत्ती सिद्ध होईल. मग परत आणखी खोलात शिरता येईल. काम क्रमाक्रमाने, टप्प्याटप्प्याने, विशिष्ट तत्त्वांनी व महाभारताच्या जगातील सर्व अभ्यासकांची मदत घेऊन झाले पाहिजे. असले काम तत्त्वतः सौंदर्यशोधाचे नसते. पण सौंदर्यशोध व आनंदबोध हे दोन्ही असल्या कामाचे फळ म्हणून मिळतात. हा फक्त वाङ्मयीन शोध नव्हे. आपल्या सांस्कृतिक मुळांचा हा शोध आहे. मूळ काय होते, भर काय पडली, कशी पडली, हे सर्वच महत्त्वाचे आहे. हा शोध चालला म्हणजे इतरही सांस्कृतिक इतिहास समजू शकतो, — समजायला मदत होते. महाभारतावरून आपली प्राचीन कुटुंबसंस्था, राजकीय संस्था, धार्मिक व्यवहार काय होते, हे कळून आपल्या सांस्कृतिक इतिहासातला एक टप्पा जाणवतो. त्या अनुषंगाने इतरही प्रश्न डोकावतात. सुखठणकरांनी आपल्या लेखांत लिहिले आहे की, शारदापोथी ही पुष्कळ वेळा दक्षिणेकडील मल्याळी पोथीशी कमालीचे साम्य दाखवते. त्याला दोन कारणे असू शकतील :

१ ) पूर्वी महाभारत-कथा जेव्हा दक्षिणेत पोहोचली, तेव्हा उत्तरेत

प्रस्तुत असलेल्या आवृत्तीत व तिच्यात फारसा फरक नसावा. मल्याळी म्हणजे केरळ देश एका टोकाला. तेथे ती भर न पडता राहिली. उलट, आंध्र-प्रदेशात इतर प्रदेशांप्रमाणे तीत भर पडत गेली.

२) ह्या कारणाखेरीज दुसरे असेही संभवते की, पश्चिमेकडील किनाऱ्याने खाली शिरणारे आर्यभाषिक ब्राह्मण पंचनद्यांच्या प्रदेशांतील (पंजाबातील व काश्मिरातील) असतील, व त्यांनी आपल्याबरोबर महाभारताची काश्मिरी आवृत्ती आणिली असेल. म्हणजे भारतातील लोकसमूहांच्या हालचालींबद्दलही ह्या अभ्यासाने काही नवी माहिती मिळण्याचा संभव आहे.

हे इतके विद्वान लोक पन्नास वर्षे मान वर न करता खपले, म्हणून संशोधनाचे एक बहुमोल साधन आपल्याला प्राप्त झाले आहे.

१४ जानेवारी, १९६७

एक

# शेवटचा प्रयत्न

भीष्मपर्वापासून भारतीय युद्धाची पर्वे सुरू झाली, असे समजतात. पण हे पर्व जसजसे वाचावे तसतशी खात्री पटते की, हे पर्व म्हणजे युद्धाची सुरवात नसून युद्ध थांबविण्यासाठी केलेला शेवटचा प्रयत्न होता. तो प्रयत्न करणारी व्यक्ती भीष्म होती. भीष्माचे सर्व आयुष्य निष्फळ त्याग करण्यात गेले. आयुष्याचे हे शेवटचे दिवस म्हणजे त्याच्या त्यागमय जीवनाची पराकाष्ठा होती. आणि आयुष्यातील इतर सर्व त्यागांप्रमाणे त्याचा हाही त्याग निष्फळ ठरला. ज्या भीष्माने स्वतःचे हक्काचे म्हणून होते त्याचा त्याग केला होता, त्याच भीष्माने वृद्धपणी – अति वृद्धपणी – कौरवांच्या सेनेचे सेनापतिपद स्वीकारले तरी कसे, हाही प्रश्न मनाला टोचतो. पण भीष्माच्या सर्व आयुष्याचा विचार केला म्हणजे कळते की, भीष्माचे हे शेवटचे कृत्य सुसंगतच नव्हे, तर अटळ होते.

मानवी प्रयत्न निष्फळ असतात, मानवी जीवन हे विफलच असायचे, हा धडा मनावर बिंबवण्यासाठी तर महाभारत रचलेले नाही ना, असे सारा वेळ वाटते. मानवांचे प्रयत्न, आकांक्षा, वैर, मैत्री – सगळीच कशी उन्हाळ्याच्या वावटळीने उडविलेल्या पाचोळ्यासारखी क्षुद्र, फोलकट भासतात; पण त्याचबरोबर ज्या व्यक्तींनी ते प्रयत्न केले, आकांक्षा बाळगल्या, त्या व्यक्ती अविस्मरणीय ठरतात, हृदयाला कायमचा चटका लावतात. प्रत्येक व्यक्ती एका विशिष्ट परिपाकाकडे अटळपणे जात असते. आपल्याला त्रयस्थ वाचक म्हणून तो परिपाक दिसत असतो. त्या व्यक्तीलाही तो जाणवला असला पाहिजे. हे महाभारत वाचताना इतक्या तीव्रतेने जाणवते की, त्या व्यक्तीची व्यथा आपली स्वतःची व्यथा होते. त्या व्यक्तीच्या द्वारे सबंध मानवतेचे दुःख आपल्याला खुपत राहते.

भीष्माचे आयुष्य असेच होते. विरोधाने भरलेले होते, – निदान वरून तरी तसे दिसत होते. सुसंगती होती, ती भीष्माच्या मनाची व कृत्यांची. भीष्म जन्माला आला, तो एक शापित जीव म्हणून. त्याच्या बरोबरीच्या इतरांची सुटका गंगेने केली; पण तो मात्र जगात अडकून पडला.

गंगेला मृत्युलोकात जाण्याचा काही कारणामुळे प्रसंग आला. त्याच सुमारास अष्टवसूंना वसिष्ठाच्या शापामुळे मृत्युलोकात जन्म घेणे भाग झाले होते. "गंगे, आम्ही तुझ्या पोटी जन्म घेतो. जन्मल्या-जन्मल्याच तू आम्हांला मारून टाक व आमची सुटका कर," अशी त्यांनी गंगेची प्रार्थना केली. गंगेने त्यांना तसे वचन दिले व हे 'स्वर्गीय' प्राणी पृथ्वीवर निघाले. गंगा स्वर्गातील बाई होती, – चिरयौवना होती. तिच्या वयाचा विचार करण्याचे कारणच नाही. ती 'स्वर्गीय' होती, म्हणून तिला मृत्युलोकातील नियमही लागू नव्हते!

ही बाई पृथ्वीवर आली आणि थेट राजा प्रतीपाच्या मांडीवर जाऊन बसली, व ‘ मला तुझ्याशी लग्न करू दे, ’ म्हणून म्हणू लागली. राजा म्हणाला, “ बाई, बायको व्हायचे, तर डाव्या मांडीवर बसायचे. तू बसली आहेस उजव्या मांडीवर. ती असते मुलाची, नाही तर सुनेची. तेव्हा आता मला मुलगा होऊ दे; त्याला तुझ्याशी लग्न करायला सांगतो. ” गंगेने ते ऐकले. प्रतीपाला शंतनू झाला. प्रतीप राज्य त्याच्या स्वाधीन करून निघून गेला. शंतनू शिकार करण्यात गुंग असे. कुरुवंशात व इतरही राजघराण्यांत शिकार करणे हा क्षत्रियांचा एक मोठा छंद असे. एकदा त्याला गंगेच्या काठी एक अप्रतिम रूपवती स्त्री दिसली व त्याचीच शिकार झाली. ती गंगा होती. शंतनूची लग्नाची बायको होण्यास तिने रुकार दिला, पण इतर स्वर्गीय स्त्रियांप्रमाणे – उर्वशीप्रमाणे – तिने विचित्र अटी घातल्या. “ राजा, मी वाटेल ती कृत्ये करीन. तुला अयोग्य वाटेल असेही करीन; पण तू मला अडथळा आणता कामा नये, वा नावे ठेवता कामा नये. ज्या दिवशी तसे करशील, त्या दिवशी मी तुला सोडीन. ” कामी शंतनूने सर्व मान्य केले व गंगा त्याच्याजवळ राहिली. गंगेने शंतनूला सर्व प्रकारचे सुख दिले, असे महाभारत म्हणते. मूल झाले रे झाले, की ती त्याला गंगेत नेऊन बुडवायची. शंतनू इतका तिच्या अधीन होता की, त्याला काही म्हणवले नाही; पण आठव्या मुलाला जेव्हा ती बुडवायला निघाली, तेव्हा त्याला राहवले नाही. “ ह्याला तरी मारून टाकू नकोस ! काय अघोर कृत्य करणारी स्त्री तू आहेस ! ” असे तो म्हणाला. गंगेला तेवढेच निमित्त पुरे होते. “ हा मुलगा मी जिवंत ठेवते, पण आपल्या अटीप्रमाणे मी आता तुला सोडून देते. ” असे म्हणून मुलाला घेऊन ती अंतर्धान पावली.

ना मूल, ना बायको; शंतनू परत मृगया करीत रानात वणवण

फिरत राहिला. एक दिवस सर्व शास्त्रे शिकलेला, मोठा झालेला असा त्याचा मुलगा गंगेने त्याच्या स्वाधीन केला. शंतनूने त्याला राजधानीत आणून यौवराज्याभिषेक केला. हा देवव्रत आपल्या गुणांनी सर्वांचा आवडता झाला. मृत्यूने सुटका न होता हा जीव येथेच अडकला; एका प्राचीन राजघराण्याचा तो युवराज झाला.

अशी चार वर्षे गेली. शंतनूचा शिकारीचा नाद कायमच होता. ह्या वयात परत एकदा तो एका सुंदर स्त्रीच्या आहारी गेला. तिने नाही, पण तिच्या बापाने ह्या वेळी लग्नाच्या अटी घातल्या. अटी सर्वस्वी मानवी व लोकव्यवहाराला धरून होत्या. पण त्यामुळे देवव्रताच्या आयुष्याला परत एकदा कलाटणी मिळाली.

"ह्या मुलीच्या मुलाला राजपद मिळत असेल तर मुलगी देतो," ह्या दाश-राजाच्या मागणीला शंतनूला रुकार देववेना. तो खिन्न मनाने राजधानीत आला. त्याची मनःस्थिती जाणून घेण्याचा देवव्रताने प्रयत्न केला. शंतनूचे उत्तरही मोठे मजेदार आहे. "अरे, मला कसली काळजी? तुझ्यासारखा गुणी मुलगा राज्य संभाळायला आहे. भीती वाटते ती एवढीच की, तू एकटाच आहेस. तुला काही झाले, तर राज्याचे होणार कसे?" राजपुत्र इतर राजपुरुषांकडे गेला व त्याने सर्व बातमी काढून घेतली. मग शंतनूला न सांगताच अमात्य व इतर कुलवृद्ध बरोबर घेऊन तो दाश-राजाकडे गेला व त्याने शंतनूसाठी सत्यवतीला मागणी घातली. दाश-राजाने आपली अट सांगितली, तेव्हा सर्व माणसांपुढे देवव्रताने प्रतिज्ञा केली : "मी राज्यावर बसणार नाही." पण तेवढ्याने दाश-राजाचे समाधान होईना. "ते सर्व ठीक; पण तुझी मुले राज्यासाठी माझ्या मुलीच्या मुलांशी भांडतील, त्याचे काय?" राजपुत्राने दुसरी पहिल्यापेक्षाही अवघड अशी प्रतिज्ञा केली : "मी यावज्जीव ब्रह्मचारी राहीन!" ह्या कठीण प्रतिज्ञेमुळे

देवव्रताला ‘भीष्म’ हे नाव पडले. दाश-राजाचे समाधान झाले. त्याने गंधकालीला – आपल्या मुलीला – देवव्रत भीष्माच्या स्वाधीन केले. “आई, चल,” ह्या शब्दांनी भीष्माने तिला रथात घेतले व सर्व परिवारासह राजधानीत येऊन तिचे शंतनूशी लग्न लावून दिले.

ह्या असामान्य त्यागाने संतुष्ट होऊन बापाने भीष्माला इच्छा-मरणाचा वर दिला. म्हाताऱ्या बापासाठी पुरूने वार्धक्य पतकरले होते, पण तो त्याग कायमचा नव्हता व त्याचे फळही पुरूला उत्तम मिळाले. पुरू सर्वांत धाकटा मुलगा, पण वरच्या सर्व भावांचा (यदू, तुर्वसू, अनू ह्यांचा) हक्क हिरावून घेऊन ययातीने राज्य पुरूला दिले. भीष्माला त्यागाच्या मोबदल्यात काय मिळाले, तर इच्छामरण! भीष्माचा त्याग मोबदल्यासाठी नव्हताच. तो एक शापित जीव होता, हे त्याला स्वतःला माहीत नव्हते; पण गंगेने शंतनूला ते सांगितले होते. त्याला पूर्वायुष्याचे स्मरण नसूनही पूर्वायुष्यावर आधारलेल्या काही प्रवृत्ती असणार अशी कल्पना केली, तर ह्या प्रसंगाची एक निराळीच संगती लावता येईल. जन्मल्याबरोबर जगातून सुटणार, या आशेने आलेल्या पण अडकून पडलेल्या ह्या जिवाने जगाच्या पसाऱ्यात न अडकण्याची ही संधी साधली, असे तर नाही? राज्य नाही, लग्न नाही, आणि इच्छामरण. ह्या तिन्ही गोष्टींमुळे भीष्म जगातून निघून जाण्यास मोकळा झाला. पिंजऱ्यात अडकलेल्या पाखराला सुटकेचा मार्ग दिसला. पण भीष्माच्या बरोबर जन्माला आलेल्या त्याच्या नशिबाने त्याला परत खोड्यात टाकले.

शंतनूला सत्यवतीपासून दोन मुले झाली, व ती मुले मोठी होण्याच्या आतच तो मेला. ह्या लहान मुलांना व त्यांच्या तरुण आईला टाकून जाणे भीष्माला अशक्य झाले, व तो परत जगाच्या कटकटीत गुंतला. राजा नसूनही त्याने अडीच पिढ्या – विचित्रवीर्य,

पांडू, ते दुर्योधन वयात येईपर्यंत, म्हणजे कमीत कमी चाळीस वर्षे – राज्य संभाळले, अधिकार गाजविला. स्वतः लग्न करून न घेता दोन पिढ्यांच्या लग्नाच्या खटपटी त्याला कराव्या लागल्या. सत्यवतीला रथातून आणून तिचे बापाशी लग्न लावले, ही जशी काय त्याच्या पुढच्या आयुष्याची नांदीच झाली. विचित्रवीर्य, धृतराष्ट्र, पांडू व विदुर ह्यांची लग्ने भीष्माच्या पुढाकारानेच झाली. स्वतःचे मूल नसलेल्या ब्रह्मचाऱ्याचे सबंध आयुष्य दुसऱ्याची मुले संभाळण्यात गेले. ह्या गुंत्यात तो जो पडला, तो शेवटपर्यंत. त्यातून त्याला सुटताच आले नाही.

सत्यवतीच्या थोरल्या मुलाला राज्यावर बसविले, पण तो एका भांडणात मारला गेला. दुसरा मुलगा विचित्रवीर्य लहान असतानाच गादीवर बसला. त्याचे लौकर लग्न झालेले बरे, असे वाटून भीष्माने त्यासाठी काशि-राजाच्या तीन मुली स्वयंवरमंडपातून पळवून आणिल्या. थोरली अंबा म्हणाली, "मी शाल्वाला मनाने वरले आहे." त्याने तिला शाल्वाकडे पाठविले व तिच्या बहिणी अंबिका व अंबालिका ह्यांचे विचित्रवीर्याशी लग्न लावले. काशीहून मुली हस्तिनापुराला आणल्या. तो प्रवास काही दिवस चालला असणार. हस्तिनापुराला आणल्यावर 'मी मनाने दुसऱ्याची आहे,' हे सांगेपर्यंत काही दिवस गेले असणार व शाल्वाकडे जाण्यास आणखी काही दिवस लोटले. म्हणजे स्वयंवरमंडपातून शाल्वाकडे जाईपर्यंत काही आठवडे मध्ये गेले असणार. इतके दिवस परक्याकडे राहिलेल्या मुलीचा मी स्वीकार करणार नाही, असे शाल्वाने सांगितल्यावर अंबा भीष्माकडे आली व म्हणू लागली, "ज्या अर्थी तू मला स्वयंवरमंडपातून जबरदस्तीने आणले आहेस, त्या अर्थी तू आता माझ्याशी लग्न केले पाहिजेस." ब्रह्मचर्याच्या प्रतिज्ञेमुळे भीष्माने तिला नाकारली व अपमानित झालेल्या,

धिक्कारलेल्या, कुठेही आसरा नाही अशा परिस्थितीत असलेल्या अंबेने स्वतःला जाळून घेतले.

ह्या प्रसंगापर्यंतचे भीष्माचे आयुष्य निरुपक्रोश, निरागस असे गेले होते. त्याच्यामुळे दुसऱ्या कोणाचे नुकसान झाले नव्हते. कोणाचा तळतळाट झाला नव्हता. तो ह्या प्रसंगाने झाला व पुढेही असे प्रसंग बरेच आले.

लग्न झाल्यावर विचित्रवीर्य लौकरच मेला. मागे वंश न ठेवता मेला. स्वतःची मुले राज्यावर बसावी, ही सत्यवतीची इच्छा तर धुळीला मिळालीच; पण सबंध घराणेच नष्ट होण्याच्या मार्गावर लागले. तेव्हा तिने दीनपणे भीष्माची प्रार्थना केली की, ब्रह्मचर्याची शपथ सोड, राज्यावर बैस व कुरुवंशाचा उद्धार कर. निदान ह्या तुझ्या भावजयींना संतती दे. भीष्माने ह्या सर्व गोष्टींस नकार दिला. सत्यवतीला कुवारपणी झालेला मुलगा व्यास हाही विचित्रवीर्याचा भाऊच, म्हणून त्याच्या राण्यांचा दीर. तेव्हा त्याच्याकडून संतती निर्माण करवावी, असे सत्यवतीने भीष्माच्या अनुमतीने ठरविले. "मुली, आज रात्री तुझा दीर येणार आहे," असे मोघमपणे बोलल्यामुळे भीष्म येईल की कुलातील दुसरा कोणता कुरुयोद्धा येईल, असा विचार करीत असलेल्या थोरल्या राणीला एकाएकी एक काळा, लाल डोळ्यांचा, केसांच्या जटा असलेला असा पुरुष दिसला व ती बेशुद्ध पडली. ह्या संबंधापासून निपजलेला मुलगा धृतराष्ट्र हा जन्मांध झाला. म्हणून दुसऱ्या राणीकडे व्यास गेला. त्याचे रूप पाहून ती भीतीने पांढरी पडली व तिला एक पांढरा-फटक मुलगा झाला. तो पांडू. त्या दोघी राजघराण्यात वाढलेल्या क्षत्रिय बायांना केवढी घृणा उत्पन्न झाली, हे पुढील गोष्टीवरून स्पष्टच दिसते. तिसऱ्या वेळेला ह्या भयंकर, कधी केस न विंचरलेल्या ब्राह्मणाला पाठविणार असे कळले मात्र, त्यांनी

आपल्याऐवजी आपल्या दासीलाच त्याच्या स्वागताला उभी केली. तिला मुलगा झाला, तो विदुर.

भीष्माने अंधळ्या धृतराष्ट्राला लांब देशीची राजकन्या बायको म्हणून आणली. आपला नवरा अंधळा आहे हे कळल्याबरोबर तिने आपले डोळे फडक्याने कायम बांधून टाकले. कुंती जाडजूड [पृथा] व निबरच होती. पण तिला व रूपवती माद्रीला ज्याच्या गळ्यात बांधले, त्याला स्त्रीसंग शक्य नव्हता. बिचारी माद्री नवऱ्याच्या मृत्यूला कारण, म्हणून तरुणपणी सती गेली. ह्या पाच बायकांचा आत्मा किती तळतळला असेल! भीष्मामुळेच त्यांची विटंबना झाली. भीष्म कुरुकुलातील कर्ता, अधिकारी पुरुष होता. त्यानेच आपल्या वंशाच्या वृद्धीपायी ह्या कुलस्त्रियांची मानहानी व विटंबना केली होती. गांधारी, कुंती व माद्री ह्यांच्याबद्दल महाभारतात त्या वेळी लोक काय म्हणत होते, ते कळत नाही; पण काशिराजाच्या मुलींवर जे प्रसंग ओढवले, त्यांवरून भीष्माची भयंकर निर्भर्त्सना शिशुपालाच्या तोंडी आलेली आहे.

प्रसंग होता धर्माच्या राजसूय यज्ञाच्या वेळी अग्रपूजा देण्याचा. सर्व थोर-थोर राजांना आमंत्रणे होती. पाहुण्यांना अर्घ्य देऊन त्यांचा सत्कार करावयाचा होता. पहिल्याने अर्घ्य कृष्णास द्यावयाचा, असे पांडवांनी भीष्माच्या सल्ल्याने ठरविले. त्याप्रमाणे तो अर्घ्य देणार, तो शिशुपालाने हरकत घेतली. "इतर कोणी नाही, तरी तुमच्या कुळातील सर्वांत वृद्ध जो भीष्म त्याला अर्घ्य देणे योग्य," असे शिशुपाल म्हणाला. कृष्णालासुद्धा बोलता येऊ नये, असा हा मुद्दा होता; व तो बोललाही नाही. भीष्माने स्वतःच उठून, कृष्णच सर्व दृष्टींनी कसा योग्य, हे बोलून दाखविले, तेव्हा शिशुपालाने चिडून उत्तर दिले, "भीष्मा, तुझे सर्व चरित्रच क्षत्रियाला काळिमा लावणारे

आहे. अंबेने शाल्वाला वरले आहे, ही गोष्ट जगजाहीर होती, तरी तू तिचे हरण केलेस. विचित्रवीर्य धार्मिक राजर्षी. त्याने तिच्याशी लग्न केले नाही; ती तुझ्या आश्रयाला आली, तर तू तिला झिडकारलेस; तुझा भाऊ मेल्यावर त्याच्या राण्या तुझ्या होत्या. एका ब्राह्मणाने गुपचूप [ मिषतः ] त्यांच्या ठायी संतती निर्माण केली. तू ब्रह्मचारी नव्हेस, षंढ आहेस. आता अर्घ्य देऊन तुझा मान राखायची वेळ, तर तू कृष्णाचीच स्तोत्रे गात बसला आहेस."

धर्म-दुर्योधनांच्या पिढीत घरच्या पुरुषांसाठी बायका आणण्याचा भीष्माचा उद्योग थांबला, त्यामुळे कोणा बाईचा छळ झाला नाही. पण तो ज्या राजसभेत सर्वांत वडील म्हणून बसे, तेथे झालेली एका स्त्रीची विटंबना थांबविण्याचा त्याने प्रयत्न केला नाही. द्रौपदीला सभेत ओढून आणली तेव्हा अति झाले, म्हणून विदुर मध्ये पडला. विदुर धृतराष्ट्राचा धाकटा भाऊ होता. शिवाय दासीपुत्र होता. त्याच्याऐवजी भीष्माला अधिकारवाणीने हा लाजिरवाणा प्रकार बंद करता आला असता. त्याऐवजी तो धर्म काय, अधर्म काय, ह्याचीच चर्चा करीत बसला.

कुटुंबात म्हणा, राज्यात म्हणा, जे कोणी सर्वांत दुबळे असते, ज्याला अन्यायाविरुद्ध झगडता येत नाही, त्याला सौजन्याने वागविणे ह्यात खरा मोठेपणा असतो. देव अनाथांचा नाथ. म्हणून त्याचा मोठेपणा. अगदी हाच अभिप्राय तुकाराममहाराजांनी मराठीत सांगितला आहे, 'दया करी जे पुत्रांसी। तेचि दासां आणि दासी। तोचि साधु ओळखावा। देव तेथेचि जाणावा'. स्वतःच्या मुलाला कोणीही नीट वागवील. घरच्या गडी-मोलकरणींचे जो हित बघेल, त्याच्याच मनात देवपणा असतो. अशा घरात देव राहतो. जवळजवळ हेच शब्द मनूने उपयोजिले. मनुस्मृती महाभारतामागून लिहिलेली;

पण आचाराचे नियम – सदाचाराचे नियम – दोन्ही काळी सारखेच होते. पितृप्रधान कुटुंबात पुरुषाचे वर्चस्व असे. बायकांना – विशेषतः सासुरवाशिणींना – काही हक्क नसत. म्हणून अशांबद्दल मनूने आवर्जून सांगितले आहे, "ज्या कुळात वधूंना ( सासुरवाशिणींना ) अश्रू गाळावे लागतात, जेथे त्यांचा तळतळाट होतो, त्या कुलाचा नाश होतो. ह्याच्या उलट बायकांना जेथे सन्मानाने वागविले जाते [पूज्यन्ते] त्या घरी देवता वास करतात. – 'देव तेथेचि जाणावा.'" कुरुकुलाने बायकांची भयंकर विटंबना केली. त्यांची शरिरे व मने दोन्ही चुरगळून टाकली. ते कुल नाशालाच योग्य झाले होते. आणि दुर्दैव असे की, हे सर्व पाप भीष्माच्या हातून झाले होते.

आणखी एक प्रश्न उद्भवतो. भीष्माने स्वतःसाठी काही केले नाही. ज्या दिवशी त्याने राज्याचा व स्त्रीसंगाचा त्याग केला, त्या दिवशी त्याचे स्वतःचे असे कर्तव्यच राहिलेले नव्हते. त्याने जे केले, ते इतरांसाठी. त्या कृत्यांबद्दल त्याला जबाबदार धरता येईल का ? हाच प्रश्न दुसऱ्या तऱ्हेने विचारता येईल. मानवी जीवन संपूर्णतया निरागसपणे घालविता येईल का ? जगायचे ठरविले की, मनात असो वा नसो, हातून पाप घडणारच, अशी तर मानवी जीवनाची घडण नाही ? अंबा ही शाल्वाची, हे माहीत असता तिला रथातून का आणले ? भावाच्या बायका विधवा झालेल्या. स्वतःची शपथ तर पाळायची. पण त्यांच्यासाठी कुरूच्या घराण्यात तरुण पुरुषांची वाण पडली नव्हती. महाभारत स्पष्टच म्हणते की, राणीच्या मनात भीष्म व इतर कुरुपुंगव उभे राहिले. सर्वांना डावलून एक रानटी ब्राह्मणच का सापडला ? ह्याला उत्तर असे संभवते की, राजसभेतील एखादा योद्धा निवडला असता, तर मुलांचा बाप म्हणून त्याला कायमचे स्थान मिळाले असते. त्यापेक्षा ज्याचा पुढे राजघराण्याशी संबंध येण्याचा संभव नाही

असाच पुरुष बरा, असेही सत्यवतीला व भीष्माला वाटले असले पाहिजे. भीष्माच्या पत्रिकेत राजयोग नव्हता, पण अधिकारयोग मात्र भरपूर होता. ह्या अशा तऱ्हेच्या निवडीमुळे भीष्माच्या अधिकारालाही तडा गेला नाही व ब्रह्मचर्याची भूमिकाही शाबूत राहिली. हे झाले राजकारण. पण हे वर्तन मानवी मूल्यांच्या दृष्टीने गर्ह्य ठरते ते ठरतेच.

शिशुपाल भीष्माला शिव्या घालताना 'प्राज्ञमानिन्' – स्वतःला मोठा शहाणा समजणारा – असे विशेषण लावतो. सर्व स्वार्थ नष्ट झालेला, अत्यंत शहाणा, सत्यप्रतिज्ञ व दुसऱ्याची काळजी वाहणारा असा भीष्माचा लौकिक होता. स्वतः भीष्मही हीच भूमिका हिरिरीने पार पाडीत होता. मनुष्य स्वतःसाठी म्हणून जेव्हा काही करीत असतो, तेव्हा त्याच्या कृतीला मर्यादा असतात, त्याच्या कृतींचे मूल्यमापनही जोखून-तोलून होत असते. पण एकदा का त्यागाची भूमिका घेतली, उपकाराची भूमिका घेतली, म्हणजे त्याच्या कृत्यांना सामान्य मर्यादा नाहीशी होते. एरवी चार लोकांचे दडपण असलेला माणूस बेफिकीर वागतो, जुलमी वर्तन करू शकतो. क्रांती करावी, – पददलितांसाठी बंड म्हणून उभारावे व त्यात मानवांचा संहार व्हावा, असे कितीदा तरी घडले आहे. फ्रेंच किंवा रशियन राजांनी केला नसेल एवढा संहार फ्रेंच व रशियन राज्यक्रांतीत झाला. ही हत्या करणारे महात्मे होते, गरिबांसाठी लढत होते. मनुष्य स्वतःसाठी जे करीत नाही ते देशासाठी, समाजासाठी, इतरांसाठी करू शकतो. ध्येयवादी, स्वातंत्र्यवादी देशभक्त, देवभक्त लोक जेवढा अन्याय करू शकतात, तेवढा इतर करू शकत नाहीत. त्यातून तो ध्येयवादी 'प्राज्ञमानिन्', केवळ कुळाच्या कल्याणाची चिंता वाहणारा असा असला, म्हणजे सदसद्विवेक राहत नाही. अशी तर अवस्था भीष्माची झाली नाही ना? आपल्या चांगुलपणाचा, प्रतिज्ञापालनाचा त्याला कैफ तर

चढला नव्हता ना? कैफ चढण्याइतके आत्मविस्मरण भीष्माला झाले नाही, पण चार लोकांच्या देखत जी कठीण भूमिका त्याने घेतली व जी जबाबदारी विशेष कारण नसता मागाहून त्याने स्वीकारली, तीत तो प्रवाहपतितासारखा वाहत गेला, असे म्हणावेच लागते.

आपल्याकडे ह्या तऱ्हेचा विचार दुसऱ्या गोष्टीच्या अनुषंगाने झाला आहे. ती म्हणजे मोक्ष मिळण्यासाठी करावे लागणारे प्रयत्न. यमनियम, प्राणायाम, तप वगैरे साधनांनी मुमुक्षू पुढे जाता-जाता त्याला तपाचे फळ म्हणून ऋद्धि-सिद्धींची प्राप्ती होते. ही पायरी मोक्षमार्गावरच असते, पण ती मोक्षाला जायला एक मोठा अडसर ठरते. ऋद्धि-सिद्धी हे स्वतःच्या महातपाचे दृश्य फल असते व मनुष्य त्या चमत्कारात स्वतःला धन्य मानण्यात मोक्ष विसरून जातो. तशीच परिस्थिती ध्येयवादी माणसाची होते. एका विशिष्ट पायरीवर त्याला मानाचे स्थान व वाहवा मिळते व तो स्वतःला विसरतो. आपल्या हातून काही वाईट व्हायचे नाही, म्हणून तो जपत नाही. इतरांसाठी म्हणून तो धडाक्याने, अविचाराने कृत्ये करतो. तसेच भीष्माचे झाले.

भीष्माने या सर्व प्रकारात सत्यवतीवर सूड उगविला, असे मात्र म्हणता येत नाही. एक तर महाभारतात ही कल्पना मुळीच आली नाही, व दुसरे म्हणजे ज्या गोष्टी घडल्या — विचित्रवीर्याचे मरण, एका राणीचा मुलगा अंधळा निपजणे, दुसरीचा रोगी निपजणे — त्यांचे काही भीष्माला अगोदर ज्ञान नव्हते. गोष्टी घडत गेल्या व भीष्म संसारात गुरफटत राहिला.

धर्माच्या राजसूय यज्ञानंतर अग्रपूजेचा मान भीष्माचा, हा शिशुपालाचा दावा चुकीचा नव्हता. तेथेही भीष्म मागे सरला व त्याने मान कृष्णाला देवविला. अशा भीष्माने सेनापतिपद स्वीकारलेच कसे?

लढाईच्या आधी सर्वनाश होणार, हे जाणून व्यासाने सत्यवतीला

'सुनांबरोबर चतुर्थाश्रम घेऊन अरण्यात जा,' असे सांगितले. त्या निघून गेल्या. भीष्म आपल्या सावत्र आईपेक्षाही वयाने मोठाच; त्यालाही हा मार्ग मोकळा होता. बलराम नाही का तीर्थयात्रेला गेला? मग भीष्मच मागे का राहिला?

मोठा योद्धा म्हणून भीष्माचा लौकिक होता. महाभारतात भीष्म-पर्वाच्या आधी भीष्माने कुठे लढाया मारल्याचे दिसत नाही. अंबेच्या बाबतीत परशुरामाशी झालेले युद्ध वास्तविक झालेलेच नसणार. रामाच्याही आधी होऊन गेलेला परशुराम दर युगात आणलेला आहे, इतकेच. महाभारतात परशुरामाचे कार्य दोन योद्धयांच्या पराभवाला कारण पुरवण्यापुरते ओढूनताणून आणलेले, कथावस्तूला आवश्यक नसलेले असे आहे. हे कल्पित युद्ध सोडल्यास भीष्म लढल्याचा पुरावा नाही. पांडू वयात आल्यावर राजा झाला, व त्याने दिग्विजय केला. त्या वेळी भीष्म पांडूबरोबर गेला नाही. धर्माच्या भावांनी केलेल्या दिग्विजयातही त्याने भाग घेतला नाही. अशा ह्या भीष्माने म्हातारपणी सेनापतिपदाचा हव्यास का धरला? म्हातारपणी विराटाच्या गाई पळविण्याच्या कटात तो सामील होता, पण त्या वेळी एकट्या अर्जुनाने सर्वांनाच — व त्याबरोबर भीष्मद्रोणांनाही — पळवून लावले होते.

भीष्माचे वय भारतीय युद्धाच्या वेळी कमीत कमी नव्वद ते एकशे-एक वर्षांचे होते. वयाचा हिशेब असा : भीष्माचा बाप शंतनू ह्याने मत्स्यगंधेशी लग्न लावले, तेव्हा भीष्म युवराज होता, धनुर्विद्या शिकलेला होता. तेव्हा तो सोळा वर्षांचा होता. त्याचा पहिला सावत्र भाऊ चित्रांगद काही वैयक्तिक भांडणात मारला गेला. त्याच्या खालचा भाऊ विचित्रवीर्य लग्नाच्या वेळेला निदान सोळा वर्षांचा होता असे धरले, आणि तो सत्यवतीला लग्नानंतर दोन वर्षांनी झाला

असे धरले, तर विचित्रवीर्याच्या लग्नात भीष्माचे वय चौतीस वर्षांचे होते. लग्नानंतर लगेच विचित्रवीर्य मेला. कुरुवंशाचा उच्छेद होऊ नये म्हणून भीष्माने लग्न करावे, अशी इच्छा सत्यवतीने दाखविली. पण भीष्माने ते न जुमानल्यामुळे व्यासाचा विचित्रवीर्याच्या राण्यांशी व दासीशी संग होऊन धृतराष्ट्र वगैरे तीन मुले झाली. भीष्माचे वय धृतराष्ट्राच्या जन्माच्या वेळी पस्तीस, व पांडूच्या जन्माच्या वेळी छत्तीस तरी होते. पांडूचा राज्याभिषेक व लग्न ही दोन्ही सोळाव्या वर्षी झाली असे गृहीत धरले, तर भीष्माचे वय त्या वेळी बावन्न वर्षांचे होते. पांडू हिमालयात गेल्यावर त्याला धर्म झाला, तो लगेच एक वर्षाने असे धरून चालले, आणि त्यामागून एक वर्षाने भीम व त्यानंतर एक वर्षाने अर्जुन असे मानले, तर अर्जुनाच्या जन्माच्या वेळी भीष्माचे वय पंचावन्न असले पाहिजे.

अर्जुनाचे वय लग्नाच्या वेळी बाप किंवा आजा यांच्याप्रमाणे सोळा वर्षांचेच नसावे, असे त्याने केलेल्या द्रुपदपराभव वगैरे गोष्टींवरून वाटते. पण तरीही ते सोळा वर्षांचे होते असे समजले, तर त्या वेळी भीष्माचे वय एकाहत्तर येते. द्रौपदीस्वयंवरानंतर पांडव इंद्रप्रस्थाला गेले. तेथून अर्जुन पहिल्या वनवासाला गेला. वनवास सरता-सरता त्याने द्वारकेला जाऊन सुभद्रेशी लग्न केले आणि तो इंद्रप्रस्थाला आला. नंतर त्याचा मुलगा अभिमन्यू याचा जन्म झाला. अर्जुनाचा हा पहिला वनवास बारा वर्षांचा होता, असे महाभारतात म्हटले आहे. त्याऐवजी तो बारा महिन्यांचाच होता असे धरून चालले, तर अर्जुनाला अभिमन्यू अठराव्या वर्षी झाला, असे समजावे लागेल. इंद्रप्रस्थात रायसूय-यज्ञ झाला, त्या वेळी जे वैभवाचे प्रदर्शन झाले, त्यामुळे चिडून दुर्योधनानेही एक यज्ञ केला. तेवढ्याने समाधान न होऊन दुर्योधनाने पांडवांना द्यूतास बोलाविले व ते सर्वस्व गमावून

वनवासाला गेले. त्या वेळी अभिमन्यू तीन-एक वर्षांचा असण्याची शक्यता आहे. वनवास व अज्ञातवास संपल्यावर अभिमन्यूचे उत्तरेशी लग्न लागले, त्या वेळी अभिमन्यू सोळा वर्षांचा, अर्जुन चौतीस वर्षांचा व भीष्म एकोणनव्वद वर्षांचा ठरतो. अभिमन्यूच्या लग्नापासून लढाईच्या सुरवातीपर्यंतचा काळ जेमतेम वर्षाचा होता असे धरले, तर युद्धाच्या वेळी भीष्माचे वय नव्वद वर्षांचे होते; अर्जुनाचा पहिला वनवास बारा वर्षांचा धरला, तर एकशे-एक वर्षांचे होते. ही काल-गणना सगळीकडे कमीत कमी वर्षे धरून केलेली आहे. ह्याच्यापेक्षा भीष्माचे वय कमी धरणे शक्य नाही. सगळ्या कुरूंच्या मध्ये तो वयाने मोठा होता. कुरुवृद्ध आणि पितामह अशी त्याची दोन विशेषणे वारंवार येतात. एवढ्या म्हातारपणी सेनापतिपदाचा हट्ट धरणे हे भीष्माच्या लढाईपर्यंतच्या चरित्राशी विसंगत वाटते.

भीष्माकडे दुर्योधन आला व म्हणाला, "आपण सर्वांत वडील; नामवंत योद्धे. आपण सेनापती व्हावे."

भीष्माने स्वतःसाठी म्हणून जे होते, त्याचा त्याग केला; पण एक मोठी जबाबदारी शिरावर घेतली. ती म्हणजे कुरुकुलाचे रक्षण. हे रक्षण करताना त्याला कोणाशी लढाई द्यावी लागली नाही. पण दोन पिढ्यांचा संसार संभाळावा लागला. त्याने लहानांचा संभाळ केला, अंधळ्या-अपंगांचीसुद्धा लग्ने लावून दिली. पांडव-धार्तराष्ट्र लहान असताना, – तीन पिढ्यांत पहिल्यांदाच हस्तिनापुराच्या राजघराण्यात बरेचसे तरुण राजपुत्र जन्माला आले असताना, – त्यांना वाढविण्याची व शस्त्रविद्या शिकविण्याची व्यवस्था केली. दोन पिढ्या अव्याहत कर्तेपणा गाजविला. त्याच्या अधिकाराला पहिला शह शकुनीच्या येण्यामुळे उत्पन्न झाला. शकुनी आपल्या अंधळ्या मेहुण्याच्या व डोळ्यांवर कातडे ओढलेल्या बहिणीच्या हितास जपत होता. शकुनी

नसता, तर भीष्माने आपल्या अधिकारात राज्याची वाटणी केली असती. पण मुले जशी मोठी झाली, तसतसे भांडण विकोपाला गेले, व शेवटी युद्धाशिवाय भांडण थांबत नाही, असे झाले. खरोखर भीष्माचीच मुले-नातवंडे असती, तर कदाचित तो सत्यवतीप्रमाणे वनात गेला असता. स्वतःसाठी म्हणून जो संसार मांडलेला असतो, त्यातून मन काढून घ्यावे, हा दंडक आहे. पण लोकांच्या जबाबदाऱ्या पत्करल्या की मन त्यात जास्तच गुंतून पडते. म्हातारे झाले की मुले बाजूला सारतात. तेव्हा आपण होऊनच बाजूला सरण्याचा शहाणपणा सुचतो. पण देशाला, संस्थेला, जनसेवेला वाहून घेतलेले लोक वानप्रस्थ स्वीकारताना फारसे दिसत नाहीत. स्वतःचा संसार सोडला नाही, तर लोक म्हणतात, म्हाताऱ्याला लोभ सोडता येत नाही; पण स्वतःच्या संसारावर पाणी सोडून इतरांच्या संसाराचा भार पत्करला, म्हणजे हे बंधन नाहीसे होतेसे दिसते. जिवात जीव असेपर्यंत कुटुंब संभाळलेच पाहिजे, अशी भीष्माची भूमिका होती व सेनापतिपद स्वीकारून, कर्णाला दुखवून बाजूला सारण्यातही हाच हेतू होता.

स्वतःच्या न ऐकणाऱ्या मुलांना राजा शिक्षा करू शकत असे. भीष्माला ते शक्य झाले नाही. सत्यवतीची मुले मेली, तेव्हा तिने 'प्रतिज्ञा सोडून लग्न कर व राज्यावर बैस,' अशी भीष्माला गळ घातली. कुरुकुलाचे एवढे प्रेम होते, तर त्याने ते का ऐकले नाही? शिशुपालाने अगदी हाच प्रश्न केला होता. मागे कर्तव्याबद्दल जे म्हटले, ते येथे लागू पडते. भीष्माने एक फार मोठी प्रतिज्ञा करून बापाकडून व इतरांकडून अतोनात प्रशंसा मिळविली होती. आपले असे एक व्यक्तिमत्त्व तयार केले होते. लोकांच्या मनात स्वतःबद्दल काही अपेक्षा निर्माण केल्या होत्या. त्या सर्व पूर्ण करणे त्याला प्राप्त होते. ब्रह्मचर्याची शपथ घेऊन कॅथॉलिकांच्या मठात शिरण्यासारखा

तो प्रकार होता. मनात घेतलेली शपथ मोडता येते. चारचौघांसमक्ष देखावा उभा केला की त्याला चिकटून बसावेच लागते. त्याचप्रमाणे आपली स्वतःची अशी एक भूमिका तयार झालेली असते, ती 'स्व'ला सोडता येत नाही. आतून व बाहेरून असे दोन्हीकडून भूमिका वठविण्याचे दडपण येते. ज्या कार्यासाठी भूमिकेचा स्वीकार केला, त्या कार्याचा परिपोष होत नाही. नव्हे, सर्वनाश होत आहे, हे दिसत असताही माणूस भूमिका सोडू शकत नाही. गांधारीचे डोळे बांधणे, भीष्माचे ब्रह्मचर्य, रामाचा वनवास ही व अनेक उदाहरणे देता येतील. प्रतिज्ञापालन हा एक मोठा गुण होऊन बसला होता. प्रतिज्ञा कशासाठी केली, ह्याचा विचार सर्वस्वी मागे पडला होता. नवऱ्यामागे सती जाणाऱ्या कित्येकांच्या मागे असेच सामाजिक दडपण असणार. आचारांमागची भूमिका काय, तीत साधले काय, कोठल्या मूल्यांची जोपासना झाली, हा विचार मागून आलेल्या टीकाकाराला करणे सोपे. प्रत्यक्ष त्या काळात ती भूमिका वठविणाऱ्याला ते शक्य नसते. भूमिकांच्या ठामपणात एक प्रकारचे प्रवाहपतितत्व असते. तसे तर भीष्माचे झाले नसेल ना? अशा प्रसंगांमुळेच अतिमानुष व्यक्तीसुद्धा दुबळी वाटू लागते.

दुर्योधनाला लढाईला प्रोत्साहन देणारे, त्याची बाजू घट्ट धरणारे असे तिघे : शकुनी, दुःशासन व कर्ण. पहिल्या दोघांना बाजूला करणे भीष्माला शक्य झाले नाही. पण त्याने युक्तीने कर्णाला बाजूला काढले व दहा दिवस तो लुटूपुटीची लढाई खेळला. कुलवृद्ध म्हणून पांडवांनी त्याला जो मान दिला नाही, तो देण्याचा उपचार दुर्योधनाने केला. भीष्म हा मान नाकारील, असे त्याला वाटले असले पाहिजे. पण भीष्माने ताबडतोब होकार देऊन सेनापतिपद स्वीकारले. भीष्म मरेपर्यंत दुर्योधनाचे हात बांधल्यासारखे झाले. भीष्म कुलवृद्ध

म्हणून पांडवांनाही अवध्यच होता. त्याच्याशी लढणे कठीण नव्हते, पण त्याचे नाते व वय लक्षात घेता ते अशक्य झाले होते. दुर्योधनाला एका बाजूने पेचात टाकून, पांडवांना दुसऱ्या बाजूने पेचात टाकून शक्य तर युद्ध थांबवायचे, असा भीष्माचा प्रयत्न होता. भीष्माने खरोखरच मोठी मुत्सद्देगिरी लढवली होती. पांडव मला मारणे शक्य नाही, हा त्याचा कयास बरोबर होता. दुर्योधन, त्याची भावंडे, मुले, नातवंडे ह्यांना चोपून काढायला पांडवांना काही वावगे वाटलेले दिसत नाही. अर्जुनापुढे मुख्य प्रश्न होता भीष्म-द्रोणांचा. 'कथं भीष्ममहं संख्ये द्रोणं च मधुसूदन। इषुभिः प्रतियोत्स्यामि' हा त्याचा आक्रोश होता. कृष्णाने एवढी गीता सांगितली, ती ह्या एका बाबतीत फुकटच गेली. पांडवांना भीष्म अवध्य होता, पण पांडवांच्या सोयऱ्यांना तो तसा नव्हता. भीष्माच्या वधासाठी शिखंडी जन्माला आला होता, व बापाचा पराभव करून त्याचे अर्धे राज्य हिरावून घेणाऱ्या द्रोणाचा सूड घ्यायला धृष्टद्युम्न जन्माला आला होता. दोघांनीही आपली ठरविलेली कामगिरी बजावली.

भीष्माचा वध अर्जुनाने करावा, म्हणून कृष्णाने प्रयत्नांची पराकाष्ठा केली. महाभारतात असे दाखविले आहे की, तो दोनदा (तिसऱ्या दिवशी व नवव्या दिवशी) स्वतः भीष्मावर चालून गेला. दोन प्रसंगांपैकी पहिला उघड-उघड मागाहून घुसडलेला आहे. नवव्या दिवशी हातात चाबूक घेऊन कृष्ण धावून गेला. अर्जुनाने त्याच्या पायाला मिठी मारून त्याला परतवले व 'मी भीष्माला मारणार नाही, पण रथातून खाली पाडीन,' असे वचन मोठ्या मिनतवारीने धर्म व कृष्ण ह्यांना दिले व दहाव्या दिवशी खरोखरच तसे केले. भीष्माचा योद्धा म्हणून लौकिक होता. आपण पडलो, ते मोठ्या वीराच्याच हातून, हा लौकिक त्याला हवा होता. तो मोठा वीर

अर्जुन होता, व हेच नेमके अर्जुनाला नको होते. पण शेवटी नऊ दिवसांच्या कंटाळवाण्या लढाईनंतर तो मोठेपणा त्याला भीष्माला द्यावा लागला. शिखंडीबरोबर भीष्मावर शरसंधान करावे लागले आणि 'मला हे जे तीक्ष्ण बाण लागत आहेत ना, ते शिखंडीचे नव्हेत, अर्जुनाचे आहेत,' हे म्हणण्याची संधी त्याला द्यावी लागली.

युद्ध अठरा दिवस झाले. त्यांतील पहिले दहा दिवस खरे युद्ध झालेच नाही. हे दहा दिवस भीष्म लढाई थांबवावयाचा प्रयत्न करीत होता, हे त्या दहा दिवसांच्या हकीकतीवरून स्पष्ट होते. प्रतिदिवसाची थोडक्यात हकीकत खालीलप्रमाणे :

पहिला दिवस : कौरवांचे अफाट सैन्य पाहून धर्माला निराशा वाटते. अर्जुन त्याला धीर देतो. पण स्वतःच ऐन सुरवातीला हातपाय गाळतो. कृष्ण गीता सांगून त्याला धीर देतो. धर्म कौरवसैन्यात जाऊन भीष्मद्रोणांना नमस्कार करून येतो. युयुत्सू पांडवांना मिळतो. मोठे युद्ध होते. उत्तर मारला जातो. पहिल्या दिवशी विजयाचे पारडे कौरवांकडे.

दुसरा दिवस : अर्जुन-भीष्म, द्रोण-धृष्टद्युम्न वगैरेंची युद्धे होतात. कलिंगराज व त्याचा मुलगा ह्या दोघांना भीम मारतो. पांडवांना दिवस चांगला गेला.

तिसरा दिवस : भीम दुर्योधनाला बेशुद्ध पाडतो. सारथी दुर्योधनाला रथातून पळवून नेतो. कौरवांचे सैन्य माघार घेऊ लागते. दुर्योधन शुद्धीवर येऊन सैन्याला सावरतो व भीष्माला दोष देतो. भीष्म सांगतो, 'पांडव अजिंक्य आहेत, पण मी शिकस्त करीन.' भीष्म त्याप्रमाणे करतो. कृष्ण अर्जुनाला दोष देऊन, रथातून उडी मारून चक्राने भीष्माला मारू पाहतो. अर्जुन त्याला परत आणतो. एकंदर दिवसात पांडवांचा जय.

चौथा दिवस : दोन्हीकडचे वीर निकराने लढतात. एकंदर दिवस पांडवांना बरा जातो. रात्री दुर्योधन भीष्माला दोष देतो. पांडवांचे– विशेषतः कृष्णार्जुनांचे–दैवी अजिंक्यत्व भीष्म वर्णन करून युद्ध पुरे कर, असे दुर्योधनाला सांगतो.

पांचवा दिवस : नेहमीप्रमाणे युद्धे होतात, कोणाचाच मोठा विजय होत नाही.

सहावा दिवस : पाचव्याप्रमाणेच जातो.

सातवा दिवस : सुरवातीसच दुर्योधन भीष्माला खूप बोलतो. 'पांडव अजिंक्य आहेत, पण मी शिकस्त करीन,' हे ठरलेले उत्तर भीष्म देतो. निकराची लढाई होते. धर्म 'अजून भीष्माला का मारले नाहीस?' म्हणून शिखंडीला बोल लावतो. हाही दिवस सहाव्या दिवसाप्रमाणेच जातो.

आठवा दिवस : निकराचे युद्ध होते. कौरवांकडचे शकुनीचे मुलगे व पांडवांकडचा इरावत मारले जातात. भीम धृतराष्ट्राचे पंधरा-सोळा मुलगे मारतो. निकराचे युद्ध चालले असताच संध्याकाळ होते. रात्री दुर्योधन, दुःशासन, शकुनी आणि कर्ण ह्यांची मसलत होते. भीष्माला युद्धातून काढून लावण्यास कर्ण सांगतो. दुर्योधन भावांबरोबर भीष्माकडे जातो व निर्वाणीची भाषा बोलतो. भीष्म परत एकदा पांडवांच्या अजिंक्यत्वाचा पाढा वाचतो, पण निकराने लढण्याचे वचन देतो.

नववा दिवस : भीष्म पराक्रमाने लढतो. अर्जुनाचे चालत नाही, असे पाहून कृष्ण रागारागाने चाबूक घेऊन भीष्मावर चालून जातो. अर्जुन त्याला परतवतो. युद्ध संपते. एकंदर दिवस कौरवांना बरा जातो. रात्री पांडव मसलत करून भीष्मालाच 'तुझे मरण कसे होईल?' असे विचारतात व 'शिखंडीला पुढे करा,' हा उपदेश

ऐकतात. कृष्ण अर्जुनाचे मन वळवतो. भीष्माला मारू नकोस, नुसते रथातून पाड, असे तो सांगतो. अर्जुन लाजेने व प्रयासाने कबूल होतो.

दहावा दिवस : शिखंडी भीष्मावर शरवर्षाव करतो. त्याच्या मागून अर्जुन बाण सोडून भीष्माचे कवच फोडतो. शेवटी डोक्याला बाण लागून भीष्म रथाखाली बाणांच्या खचावर पृथ्वीला अंग न लागता पडतो. भीष्माच्या रथात किंवा रथाजवळ दुःशासन असतो, व भीष्म शेवटपर्यंत त्याच्याशी बोलत असतो.

लढाई तात्पुरती थांबते. भीष्म परत दुर्योधनाला सांगतो, 'माझ्या मरणाने तुमचे वैर मिटव. तह कर.' शेवटी सर्व गेल्यावर कर्ण भीष्माकडे येतो. भीष्म कर्णाला पांडवांकडे जाण्यास सांगतो, पण कर्ण ते नाकारतो.

एकंदर लढाई अठरा दिवसांची झाली. त्यांतील पहिले दहा दिवस लुटूपुटीची लढाई झाली. लढाईतील बहुतेक दिवशी भीष्म लढाई थांबविण्याची विनंती दुर्योधनाला करीत होता. शेवटी त्याने आपल्या प्राणांचे मोल देऊन युद्ध थांबविण्याचा शेवटचा प्रयत्न केला. तोही व्यर्थ गेला.

ह्या दहा दिवसांच्या वृत्तान्तात काही ठळक विसंगती आहेत. शिखंडीची कथा धर्माला माहीत असली पाहिजे, कारण भीष्माशी शिखंडी दोनदा लढायला आला होता. भीष्म त्याच्याशी लढत नाही, हे सर्वांना माहीत झाले होते. आदल्याच दिवशी 'तू भीष्माला का मारीत नाहीस?' म्हणून धर्माने त्याला छेडले होते. अशा परिस्थितीत भीष्माकडे जाऊन 'तुझे मरण कशात?' हा पोरकट प्रश्न विचारण्याचे कारण नव्हते. भीष्म अजिंक्य आहे, हा समज शेवटपर्यंत टिकविण्यासाठी हा प्रयत्न होता. ह्या अतिवृद्धाला मारावयाचे सर्वांच्या जिवावर

येत होते. मेलो, तर अर्जुनासारख्या पहिल्या प्रतीच्या योद्ध्याच्या हातून मेलो, हा मोठेपणा भीष्माला हवा होता. कौरवांच्या बाजूने भीष्माला बाजूला टाकणे कठीण होते. पांडवांच्या बाजूने देखाव्यासाठी का होईना, अर्जुनाला भीष्माच्या विरुद्ध उभे करणे कठीण होते. दोन्ही बाजूंनी भीष्म एक अडचणच होऊन बसला होता.

तिसऱ्या दिवशी कृष्ण रथातून उडी टाकून सुदर्शन हाती घेऊन धावला, हे प्रकरण मागाहून घुसडल्यासारखे वाटते. नवव्या दिवशी तो चाबूक घेऊन धावला, ते प्रकरण योग्य ठिकाणी आले आहे व सर्व प्रसंगही महाभारताच्या पद्धतीने रंगविलेला आहे. थोडक्यात, – त्या वेळच्या परिस्थितीला अनुरूप असा. तिसऱ्या दिवशीचा प्रसंग काव्यमय, अतिशयोक्त व कृष्णाचे देवपण वर्णन करण्यात बराच भाग खर्च केलेला असा आहे. बरे, कृष्ण एवढा निकरावर आला, पण अर्जुनावर त्याचा परिणाम झाला नाही, असे म्हणावे लागते. कारण तो भीष्माविरुद्ध उभा राहिला, तो तेथून सहाव्या दिवशी! ही विसंगती नवव्या दिवशीच्या प्रसंगाने राहत नाही. मेल्याशिवाय गत्यंतर नाही, हे भीष्माला समजते. मारण्यास उभे राहिलेच पाहिजे, हे अर्जुनाला उमजते. दहाव्या दिवशी भीष्म पडतो.

सर्व भीष्मपर्वच मोठे चमत्कारिक आहे. सुरवातीला भीष्म सेनापती झाल्यावर सर्व मिळून भीष्माला संभाळा, अशी आज्ञा दुर्योधनाने दिली.

लढाईची जी वर्णने आहेत, त्यांवरून असे दिसते की, एका योद्ध्याचे दुसऱ्याशी असे एकास एक युद्ध जसे होत असे, त्याचप्रमाणे बऱ्याच योद्ध्यांचा समूह मिळूनही युद्ध होई. मुख्य लढणारे योद्धे दोन रथांत असत, आणि त्यांना संभाळणारे इतरही पुष्कळ असत. उदाहरणार्थ, शिखंडी लढत असताना त्याच्या संरक्षणार्थ

खालीलप्रमाणे व्यवस्था होती :

अर्जुनाच्या रथाच्या डाव्या चाकाशी युधामन्यू होता; उजव्या चाकाशी उत्तमौजा होता; आणि स्वतः अर्जुन शिखंडीचे रक्षण करीत होता. त्याचप्रमाणे इकडे सर्वांनी मिळून भीष्माच्या रथाचे रक्षण करावे, असे दुर्योधनाने दुःशासनाला बजावले. त्याने सांगितले, "भीष्माचे रक्षण करतील असे रथ तयार ठेवा, आणखी मुख्यत्वेकरून भीष्माचे रक्षण आणि ज्याच्यावर भीष्म शस्त्र चालविणार नाही, त्या शिखंडीचा वध हे तुमचे उद्दिष्ट राहू द्या." दुर्योधनाची मुले स्वतः भीष्माच्या मागच्या बाजूने रक्षण करीत होती, असे एका श्लोकात सांगितले आहे. त्यानंतर निरनिराळ्या देशांचे राजे व सैनिक भीष्माच्या भोवताली राहून त्याचे रक्षण करीत होते, असाही उल्लेख आहे. तेव्हा भीष्म रथात स्तब्ध असून त्याच्यावर शिखंडी बाण सोडतो आहे, किंवा शिखंडीच्या आडून अर्जुन बाण सोडतो आहे, आणि भीष्म त्या बाणांनी घायाळ होऊन प्रतिकार न करता पडला, हे चित्र सर्व वर्णनांशी विसंगत आहे.

शेवटच्या दिवशी भीष्माच्या रथाला आणि भीष्माला संभाळणारे कोणी दिसत नाही. भीष्म शेवटपर्यंत दुःशासनाशी बोलत होता. अशा वेळी दुःशासन काय करीत होता? सर्वांनाच भीष्म नकोसा झाला होता काय?

भीष्म सर्वच दृष्टींनी दुर्दैवी. भीष्म मारला गेला नाही. जखमी होऊन पडला. एक, भीष्म इच्छामरणी होता. त्याला उत्तरायण लागल्याखेरीज मरावयाचे नव्हते. दुसरे, कृष्णाने अर्जुनाला विनविले होते, 'भीष्माला मारायची जरूर नाही; अर्जुना, त्याला नुसते रथावरून खाली पाड.' म्हणजे भीष्मावर जो शरवर्षाव झाला, तो निर्वाणीचा नसून त्याला पाडण्यापुरताच, असे होते.

ज्या कुलाला जपण्याचा भीष्माने जन्मभर प्रयत्न केला, त्यातील अर्ध्या-अधिक कुलाचा नाश झालेला त्याला जिवंत राहून हालचाल न करता पहावा लागला.

भीष्म अजिंक्य नव्हता, पण अवध्य होता. इतर शूरांप्रमाणे ताबडतोबीचे मरणही त्याच्या नशिबी नव्हते. शरशय्येवर पडून उघड्या डोळ्यांनी त्याला संहार बघावा लागला. उघड्या कानांनी कुरुस्त्रियांचे रडणे ऐकावे लागले. ही विटंबना पुरी वाटली नाही म्हणूनच की काय, महाभारतात भर घालणाऱ्या मागाहूनच्या लोकांनी शांतिपर्वाचे चऱ्हाट त्याच्या तोंडून वदविले.

म्हणजे भीष्माने प्रतिज्ञापालनाने साधले काय, हा प्रश्न उरतोच.

मे, १९६५

दोन

# गांधारी

१

डोंगराळ प्रदेश संपून उत्तर-भारताचे न संपणारे, कंटाळवाणे, विस्तीर्ण मैदान लागले होते. मार्गातला अडथळा काय तो नद्यांचा, नाहीतर अधून-मधून लागणाऱ्या अरण्यांचा. कधी रथात बसून, मधूनमधून पायी, किंवा शिबिकेतून राजकन्येचा प्रवास चालला होता. तिच्याबरोबर सखी म्हणून तिच्यापेक्षा वयाने थोडी मोठी

---

या लेखात आलेल्या गोष्टींपैकी फक्त खालील गोष्टी महाभारताच्या संशोधित आवृत्तीत आहेत :

१. नवरा अंधळा म्हणून गांधारीने डोळे बांधले. २. गांधारीला खूप मुले झाली, व ती सगळी युद्धात मेली. ३. गांधारी, धृतराष्ट्र व कुंती वणव्यात मेली. या लेखात दाखविल्याप्रमाणे या तिघांच्या बरोबर न मरता विदुर महाभारतात त्यांच्या आधीच मेलेला आहे.

दासी होती. माहेर सोडताना राजकन्येची समजूत तिनेच घातली. नानातऱ्हेच्या गोष्टी सांगून, मार्गावरील रमणीय स्थळे दाखवून ती गांधारीचे चित्त प्रसन्न ठेवावयाचा प्रयत्न करीत होती. घरची माणसे नव्हती, पण राजपुत्र शकुनी बरोबर आला होता. तोही बहिणीची वास्तपुस्त अधून-मधून घेत होता. गांधाराचे विचार हळूहळू मागे पडून राजकन्येचे मन न पाहिलेले हस्तिनापूर रंगवीत होते. हस्तिना-पुराची मंडळी राजकन्येला मागणी घालायला आली, त्या वेळी त्यांनी आणलेल्या आहेराने सर्वांचे डोळे दिपून गेले होते. त्यांचे रथ, त्यांची अंगावरील वस्त्रप्रावरणे – सर्वच मूल्यवान होते. वागणे-बोलणेही गोड व नागर होते. आत्तासुद्धा बरोबरच्या मंडळीत गांधारापेक्षा हस्तिना-पुराचाच परिवार मोठा होता. प्रवास इतका लांबचा व इतका झपाट्याने चालला होता, की शेवटी-शेवटी तर श्रमांमुळे राजकन्येचे मनही शरिराबरोबर थकले होते. कधी एकदाचा प्रवास संपेल, असे तिला झाले होते.

एकदाचा प्रवास संपला ! हस्तिनापुरातून गांधाराच्या राजकन्येला भीष्म सामोरा आला होता. राजधानीतून जाताना लोक दुतर्फा उभे राहून सत्कार करीत होते. पण या समारंभाकडे लक्ष देण्याइतकी शक्ती राजकन्येस राहिली नव्हती. तिला नेमून दिलेल्या मंदिरात ती येऊन दाखल झाली. दोन दिवस ती म्लानपणे पडूनच होती. पण तिची सखी राजकुलात फिरून येई व कुरूंच्या वैभवाची नित्य नवी वर्णने ऐकवी. गांधार-राजपुत्र शकुनी हा हस्तिनापुरातच कायम राहण्याचे ठरले आहे, ही बातमी ऐकून गांधारी चकित झाली. पण थोरला भाऊ राज्यावर बसणार असल्यामुळे धाकट्या भावाने दुसऱ्या राज्यात राहून कीर्ती व लक्ष्मी मिळविल्याची त्या काळातली पुष्कळ उदाहरणे तिला माहीत होती. इतक्या लांब आली तरी माहेर सर्वस्वी तुटले नाही,

भाऊ तरी बरोबर आहे, असे वाटून तिला जरा बरे वाटले. दासीने येऊन शकुनीच्या नव्या राजवाड्याचे वर्णन केले, तेव्हा तर तिला आपल्या सासरच्या संपत्तीचा अभिमान वाटला. आज ती संध्याकाळी मंदिराच्या एका सौधावर उभी राहून, खाली दिसणारी गजबजलेली राजधानी व त्याच्या पलीकडची यमुनाकाठची विस्तीर्ण अरण्ये बघत होती. गांधारामध्ये एवढा मोठा सपाट प्रदेश तिला दिसलाच नव्हता. तिच्या माहेरच्या राजवाड्याच्या मानाने इथला राजवाडाही खूपच विस्तीर्ण होता. माहेरची आठवण कमी होऊन सासरच्या राणी-पदाच्या वैभवात तिचे मन गुंतले होते. इतक्यात तिची सखी आली. 'वैभवाच्या कोणत्या नव्या गोष्टी ही आज ऐकविणार आहे बरे?' म्हणून गांधारी अपेक्षेने तिच्याकडे पाहू लागली. पण आजचा नूर काही वेगळाच होता. आज दासी नेहमीप्रमाणे हसतहसत, चंचल गतीने येत नव्हती. तिचा चेहरा फिक्कट पडला होता. पावले अडखळत होती. सखी आजारी आहे, असे वाटून राजकन्या दोन पावले पुढे सरकली. तोच तिची सखी धडपडत पुढे आली. तिने राजकन्येचे हात घट्ट धरले आणि तिच्या तोंडून कसेबसे शब्द निघाले, "घात झाला! बिचाऱ्या पोरी, घात झाला! तुझे ज्यांच्याशी लग्न व्हावयाचे, ते राजकुमार जन्मांध आहेत." एक क्षणभर दासीच्या शब्दांचा अर्थच राजकन्येला कळला नाही. दुसऱ्याच क्षणी ती धाडकन जमिनीवर बेशुद्ध पडली.

## २

डोळस बायको अंधळ्याची काठी होईल, अशी काही धृतराष्ट्राची आशा असली, तर ती पार नष्ट झाली. नवरा अंधळा, हे कळल्यावर

गांधारीने आपले डोळे फडक्याने गच्च बांधून घेतले. डोळे बांधले, तरी संसार व्हायचा राहिला नाही. गांधारीला खूप मुले झाली. कौरवपांडवांच्या युद्धात ती सगळी मेली. सगळ्यांत मोठा शेवटपर्यंत राहिलेला दुर्योधन, तोही मेल्याची बातमी दूताने आणली.

## ३

गांधारी आपल्या मंदिरात बसली होती. तिची सखी मागे उभी राहून तिच्या केसांवरून हळूहळू हात फिरवीत होती. स्वतःचे अश्रू पुसता-पुसता गांधारीचे सांत्वन करावयाचा प्रयत्न करीत होती. "धीर धर, राजकन्ये." गांधारी नुसती आईच नव्हे, तर आजीसुद्धा झाली होती. तरीही सखीच्या तोंडी 'राजकन्ये' हे तिचे माहेरचेच संबोधन येई. 'धीर धर,' हे शब्द उच्चारल्यावर तिचे तिलाच वाटले, 'काय वेड्यासारखी सांगते आहे मी. कशाच्या आधारावर तिने बिचारीने आता धीर धरायचा? बाकीची गेली, तरी एका दुर्योधनामुळे ती पुत्रवती होती, सनाथ होती. सर्व दुःखे गिळून तिला मान ताठ ठेवून चालता येत होते. आता ती काय करणार?' सखी म्हणाली, "शांत हो, गांधारी." एक सुस्कारा टाकून गांधारी म्हणाली, "सखे, हृदयाची कालवाकालव व्हायला आता काही कारणच उरले नाही. तुला वाटत होते की, मुले झाल्यापासून एवढ्या मुलांची आई म्हणून आता एकदाचे माझ्या गांधारीला सुख लाभले. पण तसे नव्हते ग! मुलांना काही दुखले-खुपले की माझा ऊर धपापायला लागायचा. त्यांचे रडणे ऐकू आले की माझ्या जिवाची तारांबळ उडायची. रथांच्या रंगणात त्यांनी 'जिंकले नाही,' हे ऐकले की मी उदास व्हायची. ते घोषयात्रेत फजिती पावून आले, तेव्हा त्यांना झाले नसेल इतके दुःख

मला झाले. सीमेजवळील गावात दूरवर पांडवांना पाठविले, तेव्हा ती दीनवाणी पोरे मला नमस्कार करायला आली होती. मी वरवर त्यांना आशीर्वाद दिला, पण पोटातून वाटत होते, बरा निर्वेध झाला माझ्या मुलांचा मार्ग. लढाई जुंपायच्या आधी सभेत जाऊन मुलांना 'भांडू नका,' म्हणून उपदेश केला, तोसुद्धा तुझ्या प्रेरणेने. मला मनातून वाटत होते की, हस्तिनापूरचे राजपद माझ्या मुलांकडेच राहील म्हणून. आणि नंतरचा एकेक दिवस उजाडे, तोच 'आज काय बरं वार्ता कानी पडेल?' अशा धास्तीने मन व्यापून राही. दिवस जाऊ लागे, तसे 'आज किती बरे उरली?' असा प्रश्न मी करी. प्रत्येक मूल हे एकेक दुःख होते. माझा असा जन्मच राहिला नव्हता. त्यांचे सुखाचे क्षण, ते माझ्या सुखाचे क्षण, त्यांच्या दुःखाचे क्षण, ते माझ्या दुःखाचे क्षण; असे सबंध आयुष्य गेले." बोलता-बोलता गांधारी जोरजोराने बोलू लागली होती. सखीला भीती वाटून तिने परत कळवळून म्हटले, "गडे, शांत हो, शांत हो." गांधारीने लगेच उत्तर दिले, "अग, तेच तर तुला सांगते आहे. आज मी अगदी सर्वस्वी शांत झाले आहे. आता माझे मन कोणाच्या विजयाने फुलायला नको, कोणाच्या पराभवाने सुकायला नको. कोणाचे कसे होणार, म्हणून काळजीने वरखाली व्हायला नको. आता कशी अगदी कायम शांतता आहे मनाला. कसली अपेक्षा नको, कसली भीती नको." हे बोलणे चालले असताना धृतराष्ट्र स्वतःचे दुःख गिळून गांधारीच्या सांत्वनासाठी एका प्रतिहारीचा हात धरून मंदिराच्या दाराशी आला होता. दारातूनच त्याने 'गांधारी, गांधारी,' अशी हाक मारली. गांधारीचे शेवटचे वाक्य संपते, तोच तिच्या कानावर ती हाक आली. आपले शब्द किती खोटे आहेत, ह्याचा तिला तत्काळ प्रत्यय आला. आपला अंधळा नवरा जिवंत आहे, तोपर्यंत

आपले मन सुखदु:खांच्या पलीकडे कधी जाणेच शक्य नाही, ह्याची तिला जाणीव झाली. तिरिमिरीने ती उठली, "अगबाई, पण हे –" हे शब्द कसेबसे तिच्या तोंडून बाहेर आले. आयुष्यात दुसऱ्यांदा ती कोसळून धाडदिशी खाली पडली....

राणी बेशुद्ध पडलेली बघून सर्व परिजन घाईघाईने तिकडे धावले. प्रतिहारीसुद्धा राजाचा हात सोडून गांधारीकडे धावली. मंदिराच्या आत दोन पावले आलेला धृतराष्ट्र एकाकी उभा होता; भोवतालचा गोंधळ त्याला ऐकू येत होता. पण काय झाले, ते कळत नव्हते. आपले दृष्टिहीन डोळे सर्वत्र फिरवीत तो केविलवाणेपणे विचारीत होता, "झाले काय? झाले काय?"

## ४

हिमालयाच्या पायथ्याशी असलेली पर्णकुटी सोडून आज सगळी-जणे वर पर्वतात जावयास निघाली होती. ह्या खालच्या पर्णकुटीत त्यांच्या सेवेला दासदासी होत्या. शेजारी निरनिराळ्या तपस्व्यांच्या झोपड्या होत्या. धर्मादी राजपुत्र दोनदा येऊन भेटून राहून गेले होते. एकंदर जीवन संथ व स्वस्थ चालले होते. धृतराष्ट्र आणि गांधारी, विदुर आणि कुंती ह्या चौघांचे दिवसांमागून दिवस चालले होते. विदुर, धृतराष्ट्र आणि इतर तापसी ह्यांचे काही-ना-काही विषयावर संभाषण चाले. गांधारी व कुंती ऐकत असत. ह्या वरवर शांत जीवनात हस्तिनापूरचे पाहुणे आले, की लाटा उसळत असत. राजपुत्रांच्या नव्हे, राजांच्या परिवाराने सारा आसमंत भरून जाई. मुलांनी पायांवर डोके टेकले, म्हणजे प्रत्येकाच्या मनात भिन्नभिन्न भावनांचा पूर लोटे. मुले निरोप घेऊन गेली, की बाहेरचे वातावरण

शांत होई; पण आतली खळबळ निवायला वेळ लागायचा. आजही हस्तिनापुराहून मुले, सुना आल्या होत्या. धृतराष्ट्राने काही निश्चय करून धर्माला सांगितले, "युधिष्ठिरा, हा काही खरा शेवटचा आश्रम नाही. आता आम्हांला चौघांनाच झोपडी बांधून एकान्त जागी राहू दे. राजवाड्यातून बाहेर निघाल्यावर सवय व्हावी, म्हणून येथे रहायला लागल्याला पुष्कळ महिने लोटले. आता वर जाऊन अरण्यात राहिलेले बरे." युधिष्ठिराने व इतरांनी चुलत्याचे मन वळविण्याचा प्रयत्न केला. पण धृतराष्ट्र काही ऐकेना. धर्माने विदुराकडे पाहिले. पण आज विदुरसुद्धा धृतराष्ट्राचे म्हणणे उचलून धरीत होता. "धर्मा, धृतराष्ट्र म्हणतो आहे, ते योग्यच आहे. तू आता आम्हांला निरोप दिला पाहिजेस. तुला धर्म माहीत असता आम्हांला मोहात का पाडतोस? तू मोहात का पडतोस?" कुंतीचे डोळे भरून आले होते; पण तिनेही सध्याची पर्णकुटी सोडण्याचा आपला निश्चय सांगितला. गांधारीला कुणी निराळे असे विचारलेच नाही. धृतराष्ट्राची इच्छा तीच तिची, असे सर्वच धरून चालली होती.

सर्वजण दिवसभर चालत होती. सुना-मुलेच नव्हे, तर तापसी-देखील पोहोचवायला आली होती. नदीचे खोरे अरुंद झाले होते. विदुराने एक प्रशस्त, शांत सावलीची जागा पसंत केली. बरोबर आलेल्या दासदासींनी झोपडी उभी केली; आठ-पंधरा दिवस तरी पुरेल, एवढी सामग्री भरून ठेवली. एक दिवस सर्व तिथेच निजली व दुसरे दिवशी जड मनाने परतली. अगदी एकही दासी किंवा दास धृतराष्ट्राने राहू दिला नाही. विदुराने धृतराष्ट्राचे सर्व करावयाची खात्री दिली. "मी थोरल्या जाऊबाईंचे अतिशय आनंदाने करीन. त्यांची संमती असावी," असे कुंती म्हणाली. काय होत होते, त्याला गांधारीने मनापासून संमती दिली. 'मला दासी नको,' असे तिने

निक्षून सांगितले. शेवटी निरोप घेतला. जाता-जाता धर्माने विदुराला बोलावून सांगितले, "येथून खाली पाव योजन अंतरावर चार-पांच विश्वासू दासांना झोपडी बांधून रहावयास देत आहे. दोनचार दिवसांनी ते येथून काय हवे-नको त्याची विचारपूस करतील. त्यांना 'नको,' म्हणू नका. त्यांना तुमच्याजवळ एरवी येऊ नका, म्हणून सांगत आहे." चार पावले मुलांबरोबर चालत जाऊन विदुरही परत आला. आता फक्त चौघेच त्या एकान्त स्थळी राहिली.

पर्णकुटीमध्ये सकाळची कृत्ये आटोपल्यावर विदुराने हाती धरून धृतराष्ट्राला व कुंतीने गांधारीला आणून फार ऊन लागणार नाही, अशा थंड ठिकाणी बसविले. स्वतः दोघेजण जरा मागच्या बाजूला टेकून बसली. गांधारी स्वस्थ बसली होती. एक खोल उसासा तिच्या तोंडून बाहेर पडला. तो ऐकून धृतराष्ट्र तिच्याकडे तोंड वळवून किंचित उपहासाने म्हणाला, "आता सुस्कारून काय उपयोग? दोन अंधळ्यांचा व्हायचा, तसा आपला संसार झाला." हे वाक्य आणि त्यामागील स्वर ऐकून गांधारी चमकली. एरवी तिने प्रत्युत्तर दिले नसते. पण राजाच्या शब्दातला उपहास तिला बोचला. जरा रूक्षपणे ती उत्तरली, "मी स्वतःच्या दुःखांनी सुस्कारा नाही टाकला, महाराज. इथे आल्यापासून अंगाला भासणारे गार डोंगरी वारे, पायांखाली देवदाराच्या काड्यांसारख्या लांब पानांचा दाट गालिचा, भोवती देवदारांचा मंद वास, प्रत्येक झुळुकीबरोबर सगळे रान जसे सुस्कारे टाकते आहे असा देवदारांच्या पानांचा आवाज, रात्रंदिवस चाललेला नदीचा खळखळाट ही सर्व अनुभवून मला एकाएकी गांधाराची आठवण झाली आणि अगदी नकळत सुस्कारा बाहेर आला. दुसरे काऽऽही नाही." गांधारीच्या शब्दांनी तिला डिवचण्याचा हेतू नाहीसा होऊन धृतराष्ट्र कळवळून म्हणाला, "खरंच गांधारी, अंधळ्याशी

जखडून तुझी दुर्दशा झाली, नाही ? माहेरच्या आठवणींनी तू पोळत असशील, नाही का ?" गांधारी म्हणाली, "मुळीच नाही. माहेरच्यांची आठवण ज्या दिवशी आपल्याशी लग्न झाले, त्याच दिवशी बुजविलेली आहे. आज आठवण झाली, ती गांधाराच्या प्रदेशाची, माणसांची नव्हे. आपल्याला माहीतच आहे, महाराज, की राजवाड्याच्या एका प्रांगणांत राहूनही मी माझ्या भावाशी कधी बोलले नाही." थोडा वेळ स्तब्धतेत गेला. विदुराच्या व कुंतीच्याही तोंडावर आश्चर्य उमटलेले होते. नवराबायकोचे हे भाषण कोणत्या थराला जाणार, अशीच चिंता कुंतीला लागल्यासारखी दिसत होती. आता धृतराष्ट्राची बोलायची पाळी होती. त्याच्या आवाजातला पहिला उपहास गेला होता. थोड्याशा अजिजीच्या स्वराने तो म्हणाला, "तुला फसवून, माझ्या अंधळेपणाची वार्ता न देता इकडे आणून तुझी माझ्याशी गाठ घातली. तुझ्या माहेरच्यांनी व आम्ही तुझे कोटि-कोटी अपराध केले. पण गांधारी, तूही त्याचा कोटि-कोटी बदला घेतलास. अजूनसुद्धा झाल्या-गेल्याची क्षमा करणे शक्य नाही का ?"

अशा तऱ्हेचे संभाषण तिसऱ्याने न ऐकणे बरे, असे वाटून विदुर व कुंती मुकाट्याने उठून जाऊ लागली. पण डोळस माणसांच्या डोळ्यांला जे दिसणार नाही, ते अंधळ्या धृतराष्ट्राच्या कानांला ऐकू येत होते. विदुर व कुंती यांच्या बाजूला डोके वळवून धृतराष्ट्र म्हणाला, "थांबा, कोठेही जाऊ नका. इथेच बसा. आम्हां नवरा-बायकोच्या संबंधात, एकान्तात अशी एकही गोष्ट झाली नाही, यापुढेही होण्याचे कारण नाही. मी वडीलकीच्या नात्याने सांगतो, बसून रहा, जाऊ नका." आपली आज्ञा ऐकून ती दोघेजण बसली ना, एवढे ऐकण्यापुरते तो थांबला, व मग गांधारीकडे वळून रुद्ध पण उत्तेजित स्वराने म्हणाला, "खरोखर, फार मोठी शिक्षा दिलीस,

गांधारी. डोळ्यांला फडके बांधून लग्नाला उभी राहिलीस, त्या वेळी नाही मला इतके वाटले. मला वाटले, मी तुझी विनवणी करीन, माझ्या प्रेमाने तुझा राग विझवीन; पण तसे झाले नाही. रात्रीची शय्यागारात आलीस तीही डोळे बांधून, धडपडत, कोणाचा तरी हात धरून आलीस. मी जन्मांध. मला अंधळेपणाने वागायची सवय होती. पण तू जाणूनबुजून डोळे बांधले होतेस. तुझ्या शरिराला अंधळेपणाने वावरायची सवय नव्हती. कसली ती भयानक रात्र! त्याच वेळी मी तुला मारून कसे टाकले नाही, कोण जाणे!" गांधारीही कडवटपणे उत्तरली, "फार बरे झाले असते तसे होते तर. आयुष्यातील पुढचा ग्रंथ तरी टळला असता." "असे बोलू नकोस, गांधारी," धृतराष्ट्र आवेगाने म्हणाला, "आम्ही कुरुकुलातले पुरुष कितीही नादान झालो, तरी क्षत्रियत्व विसरलो नाही. बायकांना मारण्याचे आमचे पौरुष नाही." असे म्हणून पहिलेच वाक्य जणू अडथळा न आल्यासारखे त्याने चालू केले, "मी माझ्या राजधानीत राजा होतो. तुझ्या डोळ्यांवरचे फडके फाडून काढता आले असते. मला वाटले, अधिकाराच्या बळावर करण्यापेक्षा सावकाशीने करीन. पण तुझ्या मनातली पहिल्या दिवशीची अढी कायमच राहिली. तुला मूल झाले, त्या वेळी मनात आले होते की, 'गांधारी, माझ्यासाठी नाही, पण तुझ्या मुलाचे तोंड पाहण्यासाठी तरी डोळे उघड, ग.' पण माझे मनही त्या वेळेपर्यंत कठीण झाले होते. मुलासाठी तू कदाचित डोळे उघडलेही असतेस; पण ते तुला करू देण्याची माझी तयारी नव्हती. तुला पुत्रमुख पहायला मिळत नाही, ह्याबद्दल मला एक प्रकारे सुडाचा आनंदच झाला. डोळे बांधून घेऊन सतीच्या थाटात तू वावरत होतीस. एकदा केलेल्या कृत्याच्या परिणामात तू जखडली गेली होतीस. तुला स्वतःला डोळे उघडता येणे शक्य नव्हते.

फक्त माझ्या आज्ञेनेच ते तुला करता आले असते. आणि मी ती आज्ञा केली नाही.

" मुलांच्या प्रेमामुळे – अंधळ्या प्रेमामुळे – काय-ते आपण जवळ आलेलो होतो. एरवी कुठल्याही क्षणी तुला माझ्याबद्दल आपलेपणा वाटला नव्हता. आम्ही कुरुकुलातील पुरुषांनी बायकांच्यावर फार अन्याय केले. त्यांचे प्रायश्चित्तही आम्हांला पुरेपूर मिळाले. अंबेच्या रागात भीष्म जळाला; तुझ्या रागात मी जळत आहे. माझी मुले पण जळून गेली. कुंतीचे लग्नसुद्धा अशाच एका व्यंग माणसाशी झाले. पण तिने मात्र पत्नीची -- फार आवडत्या नसलेल्या पत्नीची – भूमिका तर पार पाडलीच; शिवाय, पतीच्या मागे अविरत जागृत राहून मुलांचे हित पाहिले. प्रत्येक माणूस कोणत्या-ना-कोणत्या तरी अन्यायाच्या परंपरेत गुरफटलेला आहे. मी तुझ्यावर अन्याय केला; पांडूने कुंतीवर अन्याय केला. स्वतः मी आणि पांडू ह्यांना आयुष्यात जी विफलता भोगावी लागली, तो अन्याय कोणाचा ? आमच्या आयांचा तळतळाट भोवला आम्हांला, असे म्हणायचे का ? बिचारा विदुर अंगांनी आणि बुद्धीने धड होता. ज्या बापाची आम्ही मुले, त्या बापाचाच तो होता. पण केवळ दासीचा, म्हणून त्याला राज्यावर बसविले नाही. त्यानेही आपल्या आयुष्यातील निराशेचा सूड कोणावर उगवला नाही. आमच्या कुळात अहर्निश जागरूक राहिली, ती विदुर आणि कुंती. तू समजतेस, गांधारी, की तुझीच तेवढी वंचना झाली. पण विचार कर. आमच्या तीन पिढ्यांतली माणसे -- प्रत्येक जण असा वंचित आहे. मी तुला सांगतो आहे, ते फक्त मला क्षमा हवी आहे म्हणून नव्हे, तर आयुष्याशी तुझा झगडा चालला आहे तो मिटावा म्हणून. माझ्यावरचाच नव्हे, तर सर्व आयुष्यावरचाच राग सोड. मी तुझ्यावर अन्याय केला म्हणून आपल्या मुलांबाळांवर, आपल्या संसारावर,

अन्याय करायचा तुला काही अधिकार प्राप्त होत नाही. एका अन्यायाची भरपाई दुसरा अन्याय करून कशी होणार, गांधारी? डोळ्यांवरचे फडके अजून तरी सोड. भोवतालची सृष्टी, माणसे आणि आयुष्यात आतापर्यंत घडलेल्या सर्व गोष्टी ह्यांच्याकडे एकदा निरपेक्ष दृष्टीने पहायला शीक. आपल्या आयुष्याचा शेवट जवळ आला आहे. मरताना तरी डोळे बांधून मरू नकोस." धृतराष्ट्राला पुढे बोलवेना. धृतराष्ट्राने उत्पन्न केलेल्या लाटेत इतरही बुडून गेली होती. बराच वेळ गेल्यावर गांधारी हळूच म्हणाली, "महाराज, मी डोळे सोडले आहेत, पण अजून मला नीट दिसत नाही." आयुष्यात पहिल्यांदा मोठ्या आवेगाने धृतराष्ट्राने गांधारीचे हात धरले, आणि तो लहान मुलासारखा रडला. कुरूंच्या कुटुंबातील सुखदुःखाचे भोक्ते गांधारी व धृतराष्ट्र होते. कुंती आणि विदुर हे साक्षी होते. पण आज साक्षींच्याही डोळ्यांना पाणी आले. पहिला उमाळा ओसरल्यावर धृतराष्ट्र कोमल आवाजात म्हणाला, "गांधारी, एकदोन दिवसांत कुंतीच्या मदतीने तू पहायला शिकशील. ज्या दिवशी तुला नीट दिसायला लागेल, त्या दिवशी हात धरून मला इथे आणून बसव." कोणालाच पुढे बोलवेना. पर्णकुटीत परत गेल्यावरही जो-तो आपल्या विचारात मग्न होता.

दोन दिवस झाले होते. गांधारीला डोळ्यांनी पाहून कृत्ये करावयाची सवय झाली होती. नेहमीच्या बसायच्या जागी राजाचा हात धरून त्याला घेऊन ती आली होती. परत सगळीजणे जवळजवळ बसली होती, – जणू मधले दिवस गेलेच नाहीत, अशा तऱ्हेने मागील संभाषण चालू झाले. धृतराष्ट्राने खाली बसतानाही गांधारीचा हात आपल्या हातातच ठेवला होता. तो पुढे बोलू लागला, "गांधारी, तू माझ्यापेक्षा लहान आहेस. मी गेल्यावरही तुला आता स्वतंत्रपणे

राहता येईल." डोळस बनलेल्या गांधारीने हे शब्द ऐकताच धृतराष्ट्राच्या तोंडावर हात ठेवला, "नाही, महाराज. ते कदापी होणार नाही. मी जो हात धरला आहे, तो सोडण्यासाठी नव्हे. मी जे डोळे उघडले आहेत, ते केवळ माझ्यासाठी नाहीत, आपल्या दोघांसाठी आहेत." धृतराष्ट्राला परत बोलवले नाही. बराच वेळ गेल्यावर मन शांत करून तो परत म्हणाला "गांधारी, तुम्हां डोळसांना जे दिसत नाही, त्याचा मला वास येतो; ते मला ऐकू येते. पहा बरे, रानात वणवा कुठे लागला आहे तो. मला आज सकाळपासून धुराचा वास येतो आहे; भ्यालेल्या पक्ष्यांचे ओरडणे ऐकू येत आहे. मला वाटतेय, आपण नदीच्या ज्या बाजूला आहोत, तिकडेच मागे कोठेतरी रान पेटले आहे. त्याची उष्णता भासण्याइतके ते जवळ आले नाही. पहा बरे." विदुर, कुंती, गांधारी तिघेही उठून बघू लागली. खरोखरच लांबवर त्यांना धूर दिसू लागला. ज्वाळेची लालसर, पिवळसर हलणारी जीभही त्यांना दिसली. तिघेही खाली बसले. गांधारी हलक्या पण स्पष्ट आवाजात म्हणाली, "महाराज, आपले बरोबर आहे. वणवा पाव योजनसुद्धा दूर नाही." त्यावर धृतराष्ट्र म्हणाला, "गांधारी, शेवटपर्यंत माझा हात धरणे तुला वाटते त्यापेक्षा कठीण आहे. मरणाची वाट पाहत आश्रमात रहायचे, दर पाचसहा महिन्यांनी मुले आली, की जुन्या दुःखांना उजळा द्यायचा, परत मन कसेबसे शांत करायचे, ह्या गोष्टी करायला मी कंटाळलो आहे. मी येथेच थांबणार आहे; तुम्हांला नदीपार होऊन वणव्याबाहेर निघता येईल." गांधारीने धृतराष्ट्राचा हात घट्ट धरला. "महाराज, मी आता आपला हात सोडणार नाही. येथे थांबून वणव्याची वाट पाहण्यापेक्षा आपणच त्याच्याकडे जाऊ या ना."

"बरोबर बोललीस, गांधारी." धृतराष्ट्र उभा राहिला. तो व

गांधारी चालू लागली. त्यांच्या मागोमाग कुंती व विदुर चालू लागलेले ऐकून धृतराष्ट्र थबकला. त्याने मागे वळून पाहिले. "तुम्ही पण –" एवढेच तो म्हणाला, व परत वळून चालू लागला.

एक मोठी विचित्र गोष्ट घडत होती. एक पतिव्रता आपल्या जिवंत पतीचा हात धरून सहगमन करण्यास निघाली होती. एक दीर आपल्या थोरल्या भावाच्या विधवेला चितेवरून उठविण्याऐवजी बरोबर घेऊन चितेकडे चालला होता.

जुलै, १९६२

तीन

# कुंती

माणसाच्या आयुष्यात स्वतःच्या हातून घडलेल्या गोष्टी कमी असतात. पुष्कळदा विचार केला, तर वाऱ्याने इतस्ततः भरकटणाऱ्या पानाप्रमाणे आयुष्य वाटते. काही वेळेला आयुष्य सर्वस्वी दुसऱ्याच्या हातात होते, असे वाटते. महाभारतातल्या बायकांचे आयुष्य पराधीन होते त्यांची सुखदुःखे ज्यांच्यावर त्या अवलंबून, त्या पुरुषांच्या हाती. कर्ते-करविते पुरुष. त्यांनी करावे, बायकांनी भोगावे. गांधारी, द्रौपदी, सुभद्रा, सगळ्यांची एक तऱ्हा. पण त्या बायकांनी आयुष्यातल्या काही वेळा तरी वैभव व स्वास्थ्य ह्यांचा उपभोग घेतला, अंधळ्याशी लग्न झाले, तरी गांधारीला हस्तिनापुरात राजवैभवात राहता आले. नवऱ्याला राज्याभिषेक झाला नसला, तरी ती राणीसारखी राहिली. दुर्योधन राज्य करीत असताना राजमाता म्हणून मिरविली. द्रौपदीने दुःखे भोगली, पण तितकेच मोठे वैभवही भोगले. सुभद्रा कधी पट्टराणी

झाली नाही; पण तिचे एकंदर आयुष्य स्वस्थपणे गेले. मुलगा मेला, तरी नातू गादीवर बसला. आणि शेवटी आपल्या व भावाच्या वंशाला तिने राज्यावर बसलेले पाहिले व संभाळले. कुंतीच्या बाबतीत मात्र सुख जवाएवढे तरी होते किंवा नाही, कोण जाणे! दुःखाचे पर्वत मात्र ती जन्मभर उरावर बाळगून होती. जेवढ्या पुरुषांशी तिचा संबंध आला, त्या सर्वांनी आपापल्या परींनी तिला दुःखच दिले.

एके ठिकाणी ती वासुदेवाला म्हणते, "मी तुला कडेवर घेऊन चेंडू खेळत होते, एवढ्या लहानपणी चोरापोरी द्रव्य देऊन टाकावे, तसे माझ्या बापाने मला कुंतिभोजाला देऊन टाकले." उद्योगपर्वातला हा उतारा मागून घुसडलेला असण्याचा संभव आहे, कारण ती कृष्णाला कडेवर घेतले असे म्हणते, ते इतर पुराव्याशी जुळत नाही. ती एक दुःखी, विचारी बाई होती, असे वाचताना वाटते. ती रडली-कढली, पण ती आपल्याला हीनदीन समजत नव्हती. तिच्या दृष्टीने क्षत्रिय स्त्रीने जे मिळवायचे, ते तिने मिळविले होते. सुखी आरामशीर आयुष्याची क्षत्रिय स्त्रियांची अपेक्षाच नव्हती, असे तिच्या उद्गारांवरून वाटते व मनात विचार येतो, – तिची कीव करणारी मी कोण? तिने उघड्या डोळ्यांनी, ताठ मानेने व बऱ्याचशा कृतकृत्यतेने आयुष्य घालविले. माझ्या सुखाच्या कल्पनेने मी तिचे सुखदुःख का जोखावे?

कुंतीचा बाप शूरसेन हा राजा होता. कुंतिभोज हा त्याच्याच कुळातला दुसरा राजा होता. कुंतीबद्दलची सुरवातच पुढील श्लोकांनी झाली आहे :

**पैतृष्वसेयाय स तामनपत्याय वीर्यवान् ।**
**अग्र्यमग्रे प्रतिज्ञाय स्वस्यापत्यस्य वीर्यवान् ॥**
**अग्रजातेति तां कन्यामग्र्यानुग्रहकाङ्क्षिणे ।**
**प्रददौ कुन्तिभोजाय सखा सख्ये महात्मने ॥**

(१·१०४·२-३)

[ श्लोकाचा अन्वय : सः वीर्यवान् सखा स्वस्य अपत्यस्य अग्रे अग्र्यं प्रतिज्ञाय, अग्रजाता इति तां कन्याम् अग्र्यानुग्रहकाङ्क्षिणे पैतृष्वसेयाय अनपत्याय महात्मने सख्ये कुन्तिभोजाय प्रददौ ।

येथे पहिल्या ओळीतील ‘ ताम् ’ व दुसऱ्या ओळीतील ‘ वीर्यवान् ’ ही पदे पादपूरणार्थ मानावी.

अर्थ : त्या शूर सुहृदाने ( शूरसेनाने ) आपल्या अपत्याच्या ( जन्माच्या ) अगोदरच पहिले ( अपत्य देण्याचे ) वचन देऊन, प्रथम जन्मलेली म्हणून ती मुलगी ब्राह्मणांचा अनुग्रह इच्छिणारा अपत्यहीन असा ( आपला ) आतेभाऊ जो थोर सखा कुंतिभोज त्याला देऊन टाकिली. ]

कुंतीच्या जन्माआधीच तिचे भविष्य ठरून गेले होते. तिच्या आधी जर मुलगा झाला असता, तरच ते चुकले असते. माझे मूल तुला देईन, अशी शपथ घेतलेली. पहिला मुलगा असता, तर शूरसेनाने तो खासच दिला नसता. कारण तो राज्याचा वारस झाला असता. पहिली मुलगीच झाली [ कन्याम् ], तेव्हा ती द्यायला काहीच प्रत्यवाय नव्हता. म्हणून ब्राह्मणांच्या अनुग्रहासाठी धडपडणाऱ्या कुंतिभोजाला – आपल्या आतेभावाला – ती दिली. मुलींचे जे नाना उपयोग, त्यांतीलच हा एक. लग्नाने तर ती परघरी जाईच, पण त्याच्या आधीही तिला एखाद्या मित्राला देणे, ब्राह्मणांच्या सेवेसाठी देणे ह्यात विशेष काहीच नव्हते. पुढे पुराणात दशरथाने आपल्या मुलीला अशीच आपला मित्र रोमपाद याला दिली, असे वर्णन आहे. ह्या प्रसंगालाच उद्देशून कुंती पुढे ( उद्योगपर्वात ) म्हणते की, ‘ द्रव्य चोरापोरी द्यावे, तशी माझ्या बापाने मला दिली. ’

कुंतीचे नाव ‘ पृथा ’. बहुतेक ती आडव्या अंगाची, म्हणून हे नाव असावे. कुंती-देशच्या भोजाची मुलगी म्हणून ‘ कुंती ’ नाव

पडले. भोजाने तिला घेतली, ती खाष्ट ऋषीची सेवा करण्यासाठी. तो ऋषी दुर्वास. पुराणे सांगतात की, तो अगदीच वाईट, अपुरे वस्त्र नेसत असे, – कदाचित त्याच्या अंगाला घाणही येत असेल. ह्याखेरीज तो भयंकर कोपिष्ट म्हणून प्रसिद्ध होता. ह्या सुवासा (ऋग्वेद : १०·७१·४) क्षत्रियकन्येने वर्षभर त्याची सेवा (?) केली. एकदाही त्याला राग येऊ दिला नाही. त्याने जाताना प्रसन्न होऊन पुत्रप्राप्त्यर्थ तिला मंत्र दिले. महाभारतात ह्या मंत्रांना व त्यांच्या अनुष्ठानाला 'अभिचार' [अभिचाराभिसंयुक्तम्] असे विशेषण आहे. वेदामध्ये अभिचारमंत्र कुणाचा नाश करावयाचा असल्यास, कुणाचा पाडाव करावयाचा असल्यास किंवा वशीकरण करावयाचे असल्यास उपयोजिले आहेत. ज्या व्यक्तीवर प्रयोग करावयाचा, त्या व्यक्तीला काही क्रिया करणे भाग पडेल, असे करण्याची शक्ती अभिचारमंत्रांत आहे, अशी कल्पना होती. ह्या मंत्रांनी आवाहन केले, की कोणतेही देव कुंतीला वश होतील, असे हे मंत्र होते. पोरबुद्धीने कुंतीने सूर्याला बोलाविले. त्याने तिच्याशी संग केला व तिला ताबडतोब एक सुंदर मुलगा झाला. कुवारपणी मुलगा झाला, ह्या लाजेने कुंतीने त्याला जन्मतःच टाकून दिले. हाच मुलगा पुढे 'कर्ण' म्हणून प्रख्यात झाला.

महाभारतात अद्भुत गोष्टी पुष्कळ आहेत. काहींची मानवी पातळीवर संगती लावता येते, काहींची लावता येत नाही. कुंतीला सूर्यापासून मुलगा झाला व त्याला जन्मतःच कवच व कुंडले होती, ही महाभारतातल्या अद्भुत गोष्टींपैकी एक आहे. हिची काही संगती लावता येईल का ? कुंतीने ऋषीची सेवा केली. 'सेवा' म्हणजे काय ? ह्या सेवेचेच दृश्य फल कर्ण होता का ? तसे असेल, तर त्याचा सूर्याशी संबंध का लावला ? त्याचप्रमाणे सहज (जन्मतःच शरिरावर असलेली)

कवचकुंडले म्हणजे काय? कुंतीने मुलाला टाकले, तेव्हा त्याच्याबरोबर द्रव्य ठेवले. तशीच कवच आणि कुंडले ठेवली की काय? कवच आणि कुंडले ही उच्च वर्णाची, विशेषतः क्षत्रियत्वाची निदर्शक होती का? टाकलेले मूल क्षत्रिय आहे, हे दाखविण्यासाठी कुंतीने कवच-कुंडले मुलाजवळ ठेवली का? असे कितीतरी प्रश्न मनात येतात. मुलगा सूत अधिरथाला सापडला. द्रव्याबरोबर सापडला, म्हणून अधिरथाने त्याचे नाव 'वसुषेण' असे ठेवले. नावही 'सेन'-पदांतक म्हणून क्षत्रिय वळणाचे. त्यावरूनही वाटते की, कवच-कुंडले पाहून असे नाव ठेवले असावे. एवढे खरे की, कर्णजन्म व कवच-कुंडले ह्यांची काही नैसर्गिक उपपत्ती लागत नाही. दुर्वास-ऋषींचा सूर्याशी काही संबंध पोहोचता, तरी अशी उपपत्ती लागली असती. पण महाभारतात तसे कुठे दिसत नाही. कुवारपणात झालेला हा मुलगा म्हणजे कुंतीने जन्मभर पोटात बाळगलेले एक दुःखच होते. एकदा टाकून दिल्यावर तिला तो जवळ करता येईना. मोठेपणी सर्व जन्मरहस्य सांगूनही तो आईचे हे कृत्य विसरू शकला नाही. आईला क्षमाही करू शकला नाही. ह्या मुलाच्या जन्मापासून मृत्यूपर्यंत कुंती त्याला जन्माला घालण्याच्या पापाची व त्याला टाकून देण्याच्या अन्यायाची भरपाई क्षणाक्षणाला करीत होती.

एका बापाने दत्तक दिली, त्यातून हे दुःख निर्माण झाले. दुसऱ्या बापाने लग्न लावले ते एका व्यंग असलेल्याशी. त्यातून उत्पन्न झालेली दुःखे पहिल्या दुःखाच्या जोडीला जन्मभर तिच्या सोबतीला राहिली.

पांडूला राज्याभिषेक झाला. म्हणजे कुंती हस्तिनापूरची महाराणी झाली होती. पण सबंध महाभारतात ह्या राणीपणाचा उल्लेख फक्त तिच्याच तोंडून अगदी शेवटी आला आहे. पांडू राजा झाला, त्याने दिग्विजय केला, आणलेला करभार, रत्ने, नाणे, सर्व धृतराष्ट्राच्या

स्वाधीन केले व तो हिमालयात गेला. त्याच्याबरोबर कुंती-माद्रीही गेल्या. हिमालयात त्या वैभवात राहिल्या असतीलही. पण हस्तिनापूरचे राणीपद कोठे व अरण्यवास कोठे? कुरूंना शिकारीचा षोक होता. ते रानात जात असत. बायका राजधानीतच राहात. त्यामुळेच तर शकुंतला दुष्यंताला व सत्यवती शंतनूला अडकवू शकल्या. पांडू तरुण वयात रानात का गेला? आपण जिवंत असताना आपल्या राण्यांना दुसऱ्याकडून मुले उत्पादन करण्याचा प्रकार त्याला राजधानीत व्हावयास नको होता म्हणून? रानात सगळीच मुले 'देवदत्त' झाली. कदाचित राजधानीत ते साधले नसते. पांडूला रानात गेल्यावर शाप मिळाला, असे महाभारत म्हणते. क्षणभर ते खरे धरून चालले, तरी पांडू इतक्या तरुण वयात दोन्ही बायकांना घेऊन दिग्विजय झाल्याबरोबर रानात का गेला, हे कोडे राहतेच. पुत्रोत्पत्तीही ताबडतोब झाली असली पाहिजे. कारण आपल्यापासून संतती होणे शक्य नाही, हे माहीत झाल्यावर पांडूने कुंतीला नियोगाने पुत्र उत्पन्न करण्यास सांगितले. आपल्याला कुवारपणीच एक मुलगा झालेला आहे, ही गोष्ट या वेळी कुंतीला सांगता आली असती. त्या वेळच्या रूढीप्रमाणे (बीजक्षेत्रन्यायाने) तो मुलगा आपलाच, असे पांडूला अगदी कायदेशीर रीत्या म्हणता आले असते. पण आपल्याला कुवारपणी झालेल्या मुलाचे पुढे काय झाले, तो जिवंत तरी आहे की नाही, हेही कुंतीला माहीत नव्हते. अशा परिस्थितीत कुवारपणची कथा तिने पांडूला सांगितली नाही, यात काहीच नवल नाही.

धृतराष्ट्राचे लग्न झालेले होते, व त्याच्या आधी मुलगा होण्याची आवश्यकता पांडूला वाटली असली पाहिजे. सर्व हुकणारच होते; पण गांधारीला आधी गर्भ राहूनही तिचा मुलगा कुंतीच्या मुलामागून जन्मला, असे महाभारत सांगते.

कुंतीला एकामागून एक तीन मुले झाली. माद्री राजाला म्हणाली, "लोक मला वांझ म्हणतील. माझ्यात काहीही दोष नाही. तुम्ही थोरलीला विचारून मलाही एक मंत्र देववता का?".

राजाने कुंतीची याचना केली व कुंतीने एक मंत्र दिला. माद्रीने अश्विनांना पाचारण केले व तिला जुळी मुले झाली. मुले जरा मोठी झाल्यावर माद्रीने राजाला परत पुत्रप्राप्तीबद्दल विनंती केली. राजाने परत कुंतीजवळ याचना केली. कुंती रागाने जळत होती. "मी वेडी, मला कळले नाही की जुळे होईल म्हणून. आणखी एकदा तिला मंत्र दिला, तर ती काय करील कोण जाणे! तिचाच वरचष्मा व्हायचा सर्व प्रकारे. आता कुणालाच मुले नकोत. तिलाही नकोत व मलाही नकोत."

माद्रीने पहिल्या झटक्यात दोन मिळविली नसती, तर कदाचित आणखीही पांडव जन्माला आले असते!

बिचारी माद्री! सुरेख होती, तरुण होती. पण भीष्माने तिला पांडूची धाकटी पत्नी म्हणून विकत घेतली. राणीपद दूरच राहिले, पण थोरलीच्या मत्सराच्या ज्वाळेत ती जळत होती. एक दिवस न राहवून, तिला एकान्तात गाठून, ती 'नको, नको,' म्हणत असता पांडूने तिच्याशी संग केला व तो ताबडतोब मेला! माद्रीचे रडणे ऐकताच कुंती आली. 'एकटीच ये, मुलांना आणू नकोस,' हे शब्द ऐकून मुलांना लांब राहण्यास सांगून, 'माझा घात झाला!' असे ओरडतच कुंती धावत आली. राजा व त्याच्या शेजारी माद्री पाहून तिचा मत्सर उफाळला. "मी त्याला इतके दिवस संभाळले, पण तू कसे ग जाणून-बुजून असे केलेस? त्याचे रक्षण करायचे सोडून तू एकान्त साधून त्याला भुलविलेस. धन्य आहेस बाल्हीकी! माझ्यापेक्षा कितीतरी पटीने धन्य आहेस! संभोगाचा आनंद ज्या तोंडावर

ओसंडून जात आहे, असे नवऱ्याचे तोंड तुला दिसले!" माद्री काय उत्तर देणार? "मी नको, नको, म्हणत होते," हे ती कसेबसे बोलली. कुंतीने आणखी विष ओकले. "मी थोरली बायको आहे. मला जो मार्ग अनुसरायचा त्यापासून परावृत्त करू नकोस. ही चालले मी नवऱ्यामागून. ऊठ, त्याला सोड. ह्या मुलांचे रक्षण कर."

ह्या एका क्षणात अल्लड माद्री मोठी झाली. एका क्षणात पुढले सबंध आयुष्य तिला दिसले का? आतापर्यंतचे विफल आयुष्य आणखीच हीनदीन होणार, याची तिला जाणीव झाली. सुटकेचा शेवटचा एकमेव मार्ग तिने पत्करला. माद्रीने उत्तर केले, "मीच नवऱ्यापाठीमागे जाते. माझ्यासाठीच त्याने जीव टाकला. माझेही मनोरथ पूर्ण झाले नाहीत. मोठी म्हणून अनुमती दे. तुझ्या मुलांशी मला समभाव ठेवता येणार नाही. तेही पाप माझ्या हातून व्हायला नको. कुंती, तूच माझ्या मुलांना पोटच्या पोरांप्रमाणे संभाळ. मी जाते."

माद्रीने राजाच्या चितेवर स्वतःला जाळून घेतले व कुंती मुलांना व अर्धवट जळलेल्या दोन प्रेतांना घेऊन ऋषींबरोबर हस्तिनापूरला गेली.

कोणाची कीव करायची? कोणाचा तिरस्कार करायचा? सवती-सवती असणे हे त्या वेळच्या बहुसंख्य स्त्रियांचे नशीब. त्या सवती-पणातच वडीलपणा मिळविण्याची केविलवाणी धडपड! कौसल्या आणि कैकेयी, द्रौपदी व सुभद्रा, आणि नंतर एका सहस्रकामागून कालिदासाने रंगविलेली चित्रे – धारिणी, इरावती, मालविका. त्यांमागून कित्येक शतकांनी शिवाजी-महाराजांच्या राण्यांतील व त्यांच्या संतती-मधील स्पर्धा! समाजातील स्थान नवरा व मुलगा ह्यांवर अवलंबून. म्हणून नवऱ्याची पहिली बायको व्हायचे, नाही तर आवडती बायको

व्हायचे; मुलाला संपत्तीचा – राज्याचा – वाटा मिळवून द्यायचा, ही सारी धडपड. हे स्त्रियांचे नशीब. 'आपण एकमेकींना धीर देऊ या,' ही भावना कुठेच दिसत नाही. 'माझ्याकडे कशाला येतोस? ती सात्वतांची लेक आणली आहेस ना, तिच्याकडे जा,' असे रागाने अर्जुनाला बोलून, सुभद्रा पाया पडायला आली तेव्हा तिला उठवून, 'बाई, तुझा नवरा नेहमी विजयी होवो,' असे म्हणून तिला भेटणारी द्रौपदी सवतीविषयी उदार नव्हती, – नवऱ्याच्या मोठेपणाला जपणारी होती. हा नवा संबंध फार फलदायी आहे, हे तिला माहीत होते, म्हणून तिने हा उदारपणा स्वीकारला.

कुंती फार कठीण होती. माद्रीविषयी तिला प्रेम वाटणे शक्यच नव्हते. पण तिने तिला संतान होण्यास मदत केली. ह्यावरून दिसते की, तिच्याजवळ न्यायबुद्धी होती. माद्रीला इतके कठीण बोलायला काही कारणही झाले होते. पांडू जिवंत राहता, तर आज-ना-उद्या हस्तिनापूरला जाऊन राज्य ताब्यात घेता आले असते, व मग तिचा थोरला मुलगा आपोआपच राज्याचा वारस झाला असता. कुंती राजाला सारा वेळ जपत होती, असे दिसते. 'तुला सर्व माहीत असून एकान्तात राजाला भेटलीसच का?' असा तिच्या ठपक्याचा अर्थ होता. अर्थात ह्या सर्व प्रकरणात राजाला बिचारा [दीन] म्हणावयाचे व माद्रीला दोष लावायचा, हे न्यायबुद्धीला धरून नव्हते. कुंतीचा तोल गेला होता.

माद्रीला मरणाशिवाय वाटच नव्हती. तिच्या स्वतःच्या दृष्टीने नव्हती, पुढच्या कथेच्याही दृष्टीने नव्हती. हस्तिनापुरात सत्यवती, अंबालिका अशा आजेसासू व सासू विधवा होत्या. त्यांत ही आणखी. पुरुषांचा सहवास बाजूलाच. ते कधी तिला दिसलेही नसते. त्या मानाने हिमालयातील आयुष्य बरे होते. स्वतःला जाळून घेण्याखेरीज

तिला मार्गच नव्हता. आपल्याकडे कमीपणा घेऊन, कुंतीला मोठेपणा देऊन, अंबेसारखा तळतळाट न करता सुकुमार माद्री मृत्यूच्या स्वाधीन झाली.

कुंतीचे खडतर आयुष्य पुढे सुरू झाले. हस्तिनापुरात रस्त्याच्या दोन्ही बाजूंना उभे राहून नागरिक चर्चा करीत होते की, "ही मुले त्याचीच आहेत का? त्याची कुठली असायला?—हो, त्याचीच बरे." ही चर्चा ऐकून कुंतीला काय वाटले असेल? बरोबर ब्राह्मण व ऋषी होते. पांडू-माद्रीची प्रेते होती. भीष्माने सर्वांचा मान केला. राजाच्या वैभवानिशी पांडूचे व माद्रीचे अंत्य संस्कार केले. हस्तिनापूरच्या राजकुलात व सबंध नगरभर सुतक पाळले गेले. ह्यामुळे पांडूच्या मुलांच्या राजपुत्रत्वाला मान्यता मिळाली व चुलत-भावंडांबरोबर शिक्षणास आरंभ झाला. कुंतीने सुटकेचा निःश्वास टाकला असणार.

पण तो निःश्वास ती टाकते, तो नवी संकटे उभी राहिली. पांडव राजपुत्र गणले गेले, तरी राज्याचे एकमेव वारस म्हणून त्यांचा उल्लेख झाला नाही. राज्याभिषेक न होताच धृतराष्ट्र राजा होऊन बसला. कुंतीची काही वर्षे—मुले जाणती होईपर्यंतची—सुखात नाही, तरी बरी गेली असतील. पण तेव्हाही मुलांची जपणूक असणारच. मुले विद्या शिकायला लागली, तेव्हापासून कुरबुरीला सुरवात झाली. कुंतीचा भीम दांडगेश्वर होता. तो आपल्या चुलत-भावांच्या खोड्या काढी. ती झाडावर चढली, की झाड गदगदा हलवून त्यांना खाली पाडी. मारामारी तर होतच होती. त्यातच शस्त्रविद्या व अस्त्रविद्या—दोहोंतही पांडव आपल्या चुलत-भावांपेक्षा वरचढ ठरले. भीमाखेरीज इतरांचा, विशेषतः थोरल्याचा वागणूक, शहाणपणा ह्यांबद्दलचा लौकिक वाढला. ह्यातही कुंतीचे शिक्षण असलेच पाहिजे. धृतराष्ट्राचे शंभर व पांडूचे पाच असे राजपुत्र होते. धर्म वडील होता. एवढेच नव्हे,

तर शहाणा, देखणा, सुवृत्त, विद्यासंपन्नही झाला, तेव्हा तोच राजा होणार, अशी खात्री वाटल्यामुळे त्यांना राजधानीतून बाहेर घालवून, लोकांच्या दृष्टीआड करावयाचे दुर्योधनाचे व धृतराष्ट्राचे बेत सुरू झाले, व युक्तीने त्यांना व कुंतीला वारणावताला पाठवून दिले. त्यांना लाक्षागृहात जिवंत जाळावयाचा दुर्योधनाचा बेत विदुराच्या शहाणपणामुळे टळला. ह्याही प्रसंगी कुंतीचे असामान्य धैर्य प्रत्ययास येते. रोज ब्राह्मणभोजन घालावयाचे, असा नियम करून तिने पुरोचनाला पुरे गाफील ठेवले. पांडवांनी स्वतःच घराला आग लावली व त्या घरात आपल्याऐवजी दुष्ट पुरोचनाची व त्याबरोबरच एका निरपराध निषादी बाईची व तिच्या पाच मुलांची आहुती दिली. परत या प्रसंगाने प्रश्न पडतो, 'हे कृत्य दुष्ट नव्हे का?' कारस्थानी भावांच्या हातून सहीसलामत सुटावयाचे, हा पांडवांचा हेतू. तो हेतू कुणाला तरी बळी दिल्याशिवाय साध्य होण्यासारखा नव्हता, हे या अध्यायात स्पष्ट केले आहे. उघड युद्धात मरण्याची तयारी होती. पण कपटाने मारवून घेणे ही नामुष्की होती. त्यातूनही महाभारतात इतर ठिकाणी दिसून येणारा आपपरभाव येथेही दिसून येतो. जी बाई दारू पिऊन आपल्या मुलांबरोबर धुंद होऊन रात्रीची तेथे निजली होती, ती एक निषादी होती. सध्याच्या आवृत्तीत एक श्लोक आहे, त्यात म्हटले आहे की, "यदृच्छया मृत्यूने बोलावणे धाडल्याप्रमाणे आलेली कोणी एक निषादी त्या दिवशी तेथे आली व पिऊन धुंद होऊन तेथेच निजली." दोन निरनिराळ्या आवृत्त्यांत असलेले व प्रक्षिप्त ठरल्यामुळे गळलेले श्लोक खाली दिले आहेत. एकांत आहे, 'ती निषादी दुष्ट होती व पुरोचनाच्या विश्वासातली होती!' दुसऱ्या श्लोकात आहे, 'ती दुष्ट [पापा] होती व कुंतीला वरवर मैत्री दाखवीत होती [सखिमानिनी].

हस्तलिखितांच्या तपासणीमुळे व तुलनेमुळे (अर्थामुळे नव्हे,) प्रक्षिप्त ठरलेले हे श्लोक, जुने महाभारत व त्यात मागून घुसडलेले श्लोक ह्यांच्यातील फरक उत्तम दाखवितात  जणू ती निषादी दुष्ट होती, व मारण्यास योग्य होती, असा आभास मागाहूनचे श्लोक निर्माण करतात. मूळ श्लोक परिस्थितीला धरून आहे. अचानक ती आली, – मृत्यूने बोलावल्याप्रमाणे आली, व पांडवांना दुर्योधनाचा डाव पुरेपूर उलटविता आला. ही हकीकत स्वाभाविक वाटते. कदाचित त्या निषादीमुळे त्याच दिवशी पळून जाण्याचा बेत नक्की झाला असेल. पाच मुले व एक बाई अशी सहा कोळसे झालेली, ओळखू न येणारी शरिरे दुसऱ्या दिवशी नागरिकांना सापडली. त्याचबरोबर आणखी एकाचे म्हणजे पुरोचनाचे, त्यांच्या मारेकऱ्याचे शरीर सापडले. म्हणजे पांडव मेले असे सिद्ध झाले व त्यांना कोणाचा ससेमिरा पाठीमागे न लागता वर्षभर लपत-छपत राहता आले. निषादी मरणे ही कथानकाच्या सूत्रातील एक अवश्य बाब होती.

घर आगीत जळण्यासारखे आहे, हे कळूनही तेथे रहाच कशाला, हा मुद्दा भीमाने काढला होता. धर्माच्या उत्तरावरून कळते की, पांडवांनी जे केले, त्यावाचून दुसरे काहीही करणे त्यांना त्या परिस्थितीत शक्यच नव्हते. तो म्हणे, “जणू काही समजलेच नाही, अशा तऱ्हेनेच आपल्याला राहिले पाहिजे. आपल्याला काही शंका आली आहे, असे पुरोचनाला कळले, तर तो दांडगाईने आपल्याला जाळील. आगीच्या भीतीने आपण दूर गेलो, तर दुर्योधन आपल्याला शस्त्रांनी मारवील. त्याला एक विशिष्ट स्थान प्राप्त झालेले आहे. आपणांला स्थानच नाही. त्याच्या बाजूला त्याला उचलून धरणारा पक्ष निर्माण झाला आहे. आपल्या बाजूचे कोणीच नाहीत. तो धनाढ्य आहे, आपण निर्द्रव्य. तो आपल्याला खात्रीने मारू शकेल. गुपचूप रहा.

रोज मृगयेच्या निमित्ताने निसटून जायच्या वाटा माहीत करून घेऊ या. नक्षत्रांचा अभ्यास करून दिशा समजून घेऊ या व आता सुटकेसाठी बीळ खोदू या." पांडवांची दीन पराधीन स्थिती व कौरवांचा व धृतराष्ट्राचा दुष्टपणा येथे प्रत्ययास येतो.

कुंती मुलांबरोबर राहिली. सावधपणे त्यांच्या कृतींना, मसलतींना सर्वस्वी हातभार लावीत राहिली. ज्या रात्री घर जाळले, त्या रात्री अंधारात झपाट्याने अंतर तोडताना बिचारीची त्रेधा झाली. नगर सोडून रानात पोहोचल्यावर वृक्षांच्या निबिडतेमुळे वर नक्षत्रेही पाहता येईनात. खाली झुडुपांमुळे चालताही येईना. तेव्हा भीमाने तिला खांद्यावर घेतले. शेवटी जवळपास जलचर पक्ष्यांचा आवाज ऐकून सर्वांना एका झाडाखाली बसवून भीम पाणी आणायला गेला. तो परत येतो, तो ग्लानीमुळे सर्वांना झोप आली होती. भीम कुंतीबद्दल म्हणाला, "काय आश्चर्य आहे! मऊ बिछान्यावर पडून झोप न येणारी ही आज जमिनीवर गाढ झोपली आहे!" पण जमिनीवर झोपणे हे कुंतीचे दुःख नव्हतेच मुळी! स्वतःच्या स्थानाबद्दल, हक्काबद्दल अत्यंत जागरूक, क्षत्रियत्वाचा अती अभिमान असलेली अशी ती बाई होती. जीवन ही तिच्या मते लढाई होती. लढाईच्या वेळी ती विचलित होत नसे.

पुढील प्रवासात हेच दिसून येते. हिडिंबेबरोबर भीमाने राहण्यास तिने मनःपूर्वक संमती दिली, व खडतर वनप्रवासात मैत्रीण जोडली. याच हिडिंबेचा मुलगा पुढे युद्धाच्या वेळी, अतिशय आणीबाणीच्या वेळी उपयोगी पडला. बकासुराचा वध करावयास तिनेच भीमाला गळ घातली. द्रौपदी पाचांची बायको करण्याचा निश्चयही तिचाच. पाचांचा न फुटणारा एकसंधपणा तिने सांधला. लग्नाआधी ते एका आईचे लौकिकाने होते, पण माद्रेयांना कुंतीपासून फोडण्याचा डाव

दुर्योधनाने पुढे रचायच्या आधीच द्रौपदीमुळे पाचांनाही एकत्र बांधून त्या डावाचा पायाच कुंतीने नाहीसा केला.

लग्नाने तिने पांडवांना जणू द्रौपदीच्या स्वाधीन केले, व ती बाजूला झाली. पण स्वस्थ बसून कौतुक पहायला अजूनही ती मोकळी झाली नव्हती. तिच्या थोरल्या मुलानेच तिच्यावर पराधीन जिणे लादले. या जिण्याची खंत तिला फार वाटली. द्यूतात सर्वस्व हरून पांडव वनवासाला निघाल्यावर विदुराने सांगितले, "कुंती आता तुमच्याबरोबर येणे शक्य नाही. ती सुकुमार आहे; वृद्ध आहे. ती माझ्या घरी राहील." ह्या दुःखात तिला पांडूची व माद्रीची आठवण झाली. 'पांडू नशीबवान. त्याने मुले पाहिली, पण मुलांची ही अवस्था नाही पाहिली.' माद्रीच्या आठवणीत तिच्या स्वतःच्या आयुष्यातील वैफल्याची तीव्र जाणीव परत व्यक्त झाली. "धन्य माद्री! ती ज्ञानी होती. तिला सद्गती प्राप्त झाली 'रती, मती व गती' ह्या. सगळ्यातच तिने माझ्यावर ताण केली. धिक्कार असो माझ्या जीवितप्रियतेला. त्यामुळेच आज मला हे क्लेश भोगावे लागत आहेत." (२·७·१८–२०)

तेरा वर्षांच्या काळात तिला काय क्लेश झाले व तिने काय आशा उराशी बाळगिल्या, हे उद्योगपर्वात प्रत्ययास येते. द्रौपदीने मुलांना माहेरी सोडून नवऱ्यासाठी एक प्रकारचा वनवास स्वीकारला होता. माहेरी न जाता विदुराकडे राहून आपल्या शत्रूंचे वैभव रोज डोळ्यांनी पाहण्याचा वनवास कुंतीने पत्करला होता. कृष्ण जेव्हा शिष्टाईच्या वेळी तिला भेटण्यासाठी गेला तेव्हा ती त्याच्या गळ्यात गळा घालून ओक्साबोक्शी मोठ्याने रडली. लहानपणापासून भोगलेल्या सगळ्या आपदांची पुन्हा उजळणी झाली. हस्तिनापुराहून जाते वेळी कृष्ण तिला परत भेटला, त्या वेळी कुंतीने मुलांसाठी निरोप सांगितला, त्यात

कुंतीचे ह्या वेळचे शल्य, पुढली आशा आणि मनाचा कठीणपणा दिसून येतो. ह्या भाषणात एक वाक्य येते. दुसऱ्याही एक-दोन प्रसंगी जवळ-जवळ म्हणीवजा ह्या वाक्याचा वापर केलेला दिसतो. कुंती म्हणते, "लग्नामुळे मी एका डोहातून दुसऱ्या डोहात येऊन पडले." (ह्रदात् ह्रदमिव) तिच्या मताने एका चांगल्या ठिकाणाहून दुसऱ्या चांगल्या ठिकाणी पोहोचले. राजाची मुलगी होते, ती राजाची राणी झाले. "दुसऱ्यांनी माझ्या आश्रयास यावे, ती मी आज दुसऱ्यांच्या आश्रयास आलेली आहे." पांडूसारख्या दुर्बलाच्या पदरी बांधली, म्हणून आजच्या दृष्टीने तिची कीव येते. पण तिला तसे वाटले नाही. काही झाले, तरी तो राजा होता. तिला दुसऱ्यांकडून मुले धारण करण्याची मुभा होती. पांडू जिवंत राहून हस्तिनापुरास येता, तर ती थोरली राणी राहिली असती व भानगडी कटकटी न होता राजमाता झाली असती. अगदी पहिल्यापासून शेवटपर्यंत 'ह्रदात् ह्रदम्' अशी तिची परिस्थिती राहिली असती. पण तिच्या नवऱ्याने तिला पहिला दगा दिला व त्यातूनही धैर्याने बाहेर पडून राजमातेचे वैभव मिळते न मिळते, तो तिच्या मुलाने तिला दगा दिला. नवऱ्यापासून विषयसुख मिळाले नाही. एकदाच, शेवटचे का होईना, माद्रीला ते मिळाले, म्हणून तिचा जळफळाट झाला. पण ती ते मिळायचे नाही, असे धरूनच चालली होती. ह्या भानगडीत नवरा मेल्यामुळे तिचे राणीपण व मुलाचे राजपद गेले, ही तिच्या दृष्टीने खरी वंचना होती. 'अग, मी त्याला किती जपत होते,' असे ती माद्रीला म्हणाली, त्याचाही अर्थ हाच होता.

राज्य घालवून मुलांनी दगा दिला होताच. आता नवीन संकट उभे राहिले होते. ते हे की, हा थोरला मुलगा व त्याचे आज्ञाधारक भाऊ म्हणून इतर भावंडे तह करू पाहत होती. तो तह क्षत्रियवृत्तीला

न साजेसा व अपमानकारक होईल, ही तिला भीती; म्हणून तिने कृष्णाबरोबर पुढील निरोप पाठविला. कृष्णाजवळ तिने सांगितले, "भीमाला व अर्जुनाला सांग, अपमान विसरू नका."

कृष्णाला तिने निरोप दिला. अर्जुनाला, भीमाला सांगितले, 'अपमान विसरू नका,' पण मुख्य निरोप होता धर्माला. हा थोरला मुलगा, राज्याचा वारस, पण तो युयुत्सूही नव्हता व विजिगीषूही नव्हता. "कृष्णा, राजा युधिष्ठिर धर्मात्मा आहे. त्याला म्हणावे,– बाबा, तुझा धर्म नष्ट होतो आहे. नको ते करू नकोस. मंद, अविद्वान, शब्दजंजाळात गुंतून राहणाऱ्या ब्राह्मणाप्रमाणे तुझ्या बुद्धीला एकच धर्म दिसतो आहे. अरे, ब्रह्मदेवाने क्षत्रियाला उरापासून निर्माण केले, ते बाहुबल दाखविण्यासाठी, प्रजापालन करण्यासाठी. राजा जर धर्म विसरला, तर तो नरकात जातोच; पण सर्व प्रजेलाही नरकात लोटतो. बापाकडून आलेला भाग बुडाला आहे. बाहेर ओढून काढ. आपलासा कर. अरे, शत्रूला आनंद होतो तुझ्या वागण्याने. तुला जन्माला घालून मी लोकांच्या अन्नावर जगावे, यापेक्षा मोठे दुःख नाही रे! राजधर्माने वाग. पितरांना, स्वतःला व धाकट्या भावांना नरकात पाठवू नकोस." एवढ्यावर ती थांबली नाही. एक जुना इतिहास तिने मुलाला ऐकविला. 'विदुरा' किंवा 'विदुला-पुत्रसंवाद' म्हणून तो प्रसिद्ध आहे. विदुला वा विदुरा म्हणजे 'ज्ञानी'. तिचे वर्णन म्हणजे कुंतीचे (व द्रौपदीचे) स्वतःचेच म्हणायचे. ती कशी होती? 'यशस्विनी', 'मन्युमती' (राग येणारी, मानी), 'कुले जाता' (उत्तम कुळात जन्मलेली), 'क्षत्रधर्मरता' (क्षत्रधर्माचे पालन करणारी), 'दीर्घदर्शिनी' (लांबपर्यंत पाहून विचार ठरविणारी), 'विश्रुता राजसंसत्सु' (राजसभांमधून विख्यात असलेली), 'श्रुतवाक्या, बहुश्रुता' (पुष्कळ ऐकलेली) अशी; मुलगा कसा होता – सिंधुराजाने

जिंकलेला, निजून राहिलेला, दुबळ्या मनाचा, निरानंद, धर्म माहीत नसलेला, शत्रूंना आनंद देणारा. अशा पुत्राची विदुलेने जी निर्भर्त्सना केली, ती कुंतीने धर्मराजाला समग्र ऐकविली. तीतला काही थोडाच भाग येथे देते. (उद्योगपर्व : अध्याय १३१ ते १३५.)

"तू प्रेतासारखा निजला आहेस कसा? अरे क्षुद्रा, पराजित स्थितीत निजू नकोस. ऊठ. वीर्याचा प्रभाव दाखव, नाही तर सद्गतीला जा. अरे क्लीबा, ऐहिक कीर्ती व पारलौकिक पुण्य सगळेच तू घालविले आहेस. पुत्राच्या नावाने माझ्या पोटी कलीच आला आहे. कोणाही राजाच्या घरात गाढवाप्रमाणे मोठ्याने ओरडणारा [वाचिवीर] पण कृतीत निर्बल असा पुरुष जन्माला येऊ नये. तुझे 'संजय' नाव ठेवले आहे, ते अन्वर्थ कर. तुझी बायको आणि मी 'आश्रयणीय' (लोकांनी ज्यांच्या आश्रयार्थ यावे अशा) आहोत. तू आम्हांला आश्रित का बनवणार आहेस?"

मुलगा म्हणाला, "सर्व लोखंड गोळा करून तुझे क्रोधाविष्ट, अकरुण, वैरमय हृदय केलेले आहे. हा काय क्षत्रियाचार, की तू आपल्या एकुलत्या-एक पुत्राला असे बोलावेस? मी मेलो, तुझ्या दृष्टीआड झालो, तर पृथ्वीचे राज्य वा अलंकार वा भोग वा जीव तरी तुला हवासा वाटेल का?"

आई म्हणाली, "बाबा, हीच वेळ आहे तुला बोलायची व डिवचायची. ज्या वात्सल्यात सामर्थ्य नाही, व जे सहेतुक नाही, ते गाढवीच्या प्रेमासारखेच. तू क्षत्रिय आहेस. जिंक तरी, किंवा मर तरी."

मुलगा अगदी शेवटचा उपाय म्हणून म्हणाला, "अग, मजजवळ काही द्रव्य नाही. मी लढू कशाच्या जोरावर? सैन्य कसे गोळा करू?"

आई म्हणाली, "असे काही बोल. मजजवळ गुप्त धन आहे. तू लढायला तयार असलास, तर देते."

मुलगा लढला, व त्याने गेलेले राज्य मिळविले.

— कृष्णा, हे आख्यान धर्माला सांग. अर्जुनाला सांग की, क्षत्रिय स्त्री ज्या आशेने मुलाला जन्म देते, ती फलप्रद करण्याचा काळ आला आहे. सर्व जण लढा व थोरल्या भावाला राजा करा. सुनेला सांग, 'बाई, मोठ्या कुळातली आहेस.'

चाबकाने घोड्याला फटकारावे, तसे कुंतीने मुलाला लढायला उद्युक्त केले. भीमाला, अर्जुनाला, नकुल-सहदेवांना, सुनेला जे निरोप आहेत, ते म्हणजे 'धर्मराजाला शरणागती पत्करू देऊ नका,' अशा सूचनाच आहेत. ह्या बाईचे हृदयदेखील 'वज्रायसा'चे (पोलादाचे) होते, यात शंका नाही.

तिच्या ह्या शब्दांपेक्षाही कठीण शब्दांत कर्णाने तिला फटकारले, तिचा धिक्कार केला. कर्णाकडे ती गेली नसती, तरी चालते. पण दुर्योधनाचा डाव हाणून पाडून, फार दिवस सोसलेल्या अन्यायाचे व दुःखाचे तिला परिमार्जन करावयाचे होते, म्हणून हीही लाचारी तिने पत्करली. एखाद्या सामान्य स्त्रीप्रमाणे ती कर्णाकडे गेली. स्वतःचा एक विशिष्ट हेतू साधणे एवढाच तिचा उद्देश होता का? कर्ण कोण, हे सांगून तिने 'पाच भावांत सहावा हो. लढाई खेळू नकोस. तुझे सूतपुत्रत्व जाऊन तू 'क्षत्रिय' पदवीला पोहोचशील,' असे आमिष दाखविले.

कर्णाचे उत्तर चाबकाच्या फटकाऱ्यापेक्षाही तीव्र आहे. पहिल्या सलामीला तो 'क्षत्रिये' हे उपरोधाने भरलेले संबोधन योजतो. "क्षत्रिये, तू म्हणतेस त्यावर माझा विश्वास आहे. माझे यश व कीर्ती ह्यांचा सर्वस्वी नाश करायचे पाप आपण केलेत. क्षत्रिय म्हणून जन्मून

क्षत्रियाचे संस्कार माझ्या जन्मानंतर झाले नाहीत. ह्यापेक्षा माझे जास्ती वाईट माझा कोण शत्रू करू शकणार आहे? त्या वेळी माझ्याबद्दल करुणा दाखविली नाहीस, आणि आता मला आव्हान देते आहेस? त्या वेळी आईप्रमाणे वागली नाहीस, आता आली आहेस, ती केवळ आप्पलपोटेपणामुळे. पूर्वी कधी मला कोणी भाऊ माहीत नव्हता, आता एकदम तो उपटला, तर लोक मला काय म्हणतील? ज्यांनी मला इहलोकातले सर्व दिले, त्या धृतराष्ट्रपुत्रांना मी आता सोडणे शक्य आहे का? एवढे मात्र तुला सांगतो की, तुला पाचच्या-पाच मुलगे राहतील. मी मेलो, तर पाच आहेतच; नाही तर मी अर्जुनाला मारून पाच राहतील."

कुंती दुःखाने त्याला म्हणाली, "बाबा, कौरव सर्व नष्ट होतील. तू म्हणतोस, तसे होऊ दे. दैवापुढे काय इलाज?"

ह्या शब्दांवरून एकदा असे वाटते की, कौरवांच्याबरोबर कर्णाचा नाश होऊ नये, अशी भावना कुंतीची होती का? सर्वस्वी आप्पल-पोटेपणाच होता का?

कुंतीबद्दल तिरस्कार वाटावा असे तिने काही करावे, पण लगेच परत तीच कुंती वेगळ्या स्वरूपात आपल्यापुढे यावी, असे होते. नवऱ्याच्या मृत्यूनंतर माद्रीला दोष देऊन तिचे वाभाडे काढणाऱ्या कुंतीबद्दल संताप येतो, पण तीच कुंती जन्मभर माद्रीच्या मुलांना पोटच्या मुलांप्रमाणे जपते. सहदेवावर तिची व सहदेवाची तिच्यावर विशेष माया होती. द्रौपदी तिघांची बायको करता आली असती, पण ती पाचांची व्हावी, हा हट्ट कुंतीचाच. पाचांत फूट पडू नये, एवढाच का तिचा हेतू असेल? तिच्या वेळोवेळच्या उद्गारांवरून असे दिसत नाही. तिने त्यांना ओटीत घेतले, व शेवटपर्यंत आपले म्हणून अतिशय प्रेमाने वागविले. चुकूनही दुजाभाव दाखविला नाही.

कर्णाच्याही बाबतीत तिचे वर्तन असेच दिसते. कुवारपणी झालेला मुलगा बाळगणे शक्यच नव्हते. मागाहून त्याला आपला म्हणता येईना. हा तिचा अन्याय कर्ण विसरू शकला नाही; तीही विसरली नाही.

सर्व युद्ध आटोपले होते. मेलेल्या वीरांच्या अंत्यसंस्कारांचे काम चालले होते. अशा वेळी कुंतीने धर्माला सांगितले, "कर्ण हा मला कुवारपणी झालेला मुलगा. तो तुझा थोरला भाऊ होता. क्षत्रियाला योग्य असे त्याचे संस्कार कर." जी गोष्ट कर्णाच्या जिवंतपणी झाली नाही, ती तो मेल्यावर करण्यात काय अर्थ, असा प्रश्न पडतो. पण त्याचे उत्तर सरळ आहे. 'क्षत्रियाप्रमाणे माझे संस्कार केले नाहीस; माझे जन्मजात स्थान तू नाहीसे केलेस,' हा कर्णाचा आक्रोश होता. तिच्या व त्याच्या शेवटच्या भाषणात त्यावर कर्णाने भर दिला होता. योग्य क्रिया केली की पुरुष सद्गतीस जातो, हा तिचा दृढ समज होता. आपल्या हातून दुसरे काही झाले नाही; निदान हे तरी दिलेच पाहिजे, असे तिला वाटले असले पाहिजे. त्या क्षणी कुवारपणी घडलेल्या कृत्याला वाचा फोडण्याची काही लौकिक गरज नव्हती. युद्धाच्या आधी तशी गरज कुंतीला व कृष्णालासुद्धा भासली होती, व ती ते दिव्य करावयास तयार होती. पण आता तसेही नव्हते. कुंतीचे मन तिला खात होते म्हणा, तिची न्यायनिष्ठुर बुद्धी तिला स्वस्थ बसू देईना म्हणा, ह्या वेळी तिने सर्व सांगितले. लोक काय म्हणाले असतील, ते निराळेच. पण स्वतःच्या मुलाची निर्भर्त्सना तिला ऐकावी लागली. धर्माने म्हणे फार शोक केला, व शेवटी सर्व भारतीय युद्धाचे टेपर तिच्यावर ठेवून तो मोकळा झाला! "तुझ्या गुपिताने आमचा घात झाला. पांचाल नाश पावले. कुरू नाश पावले. द्रौपदीचे मुलगे गेले. अभिमन्यू गमावला. सर्व ह्यामुळे झाले.

कर्ण आमचा म्हणून पूर्वीच सांगितले असतेस, तर युद्धच ओढवते ना. कर्ण आमच्या बाजूला असता, तर युद्धच झाले नसते."

एवढेच बोलून तो राहिला नाही, तर 'इतउत्तर स्त्रियांच्या पोटी काही गुपीत रहावयाचे नाही.' असा एक आचरट शाप सर्व स्त्रीजातीला देऊन तो मोकळा झाला.

[शाप देण्याचा हा भाग प्रक्षिप्त असण्याचा बराच संभव आहे. कारण स्त्रीपर्वात कर्णाची उत्तरक्रिया धर्माने केली असे येते. पुढे शांतिपर्वात परत एकदा कर्णजन्माची कथा येते, व तेथे धर्माच्या तोंडी शाप घातला आहे.]

कुंतीने शेवटी परत एकदा आपला निश्चयी स्वभाव दाखविला. राजधानीत धर्माच्या राजवाड्यात पंधरा वर्षे राहिल्यावर धृतराष्ट्राने अरण्यवास पत्करण्याचा निर्धार केला. धर्म, कुंती, कुंतीच्या सुना, अर्जुन सर्व धृतराष्ट्राला मान देत. पण भीम व त्याच्या चिथावणीने नकुल-सहदेव येता-जाता धृतराष्ट्राला व गांधारीला ऐकू जाईल, असे घालूनपाडून बोलत असत. धृतराष्ट्र या प्रकाराची कागाळी करणे शक्य नव्हते. आता येथून जाणे बरे, असे धृतराष्ट्राने स्वतःसाठी व गांधारीसाठी ठरविले. विदुर व संजयही बरोबर जाण्यास निघाले. कुंतीनेही त्यांच्याबरोबर जाण्याचे ठरविले. "माझ्या हातून वडिलांची सेवा झाली नाही, आता होऊ दे. मी सासू (थोरली जाऊ गांधारी) व सासरा (थोरला दीर धृतराष्ट्र) ह्यांना संभाळीन," म्हणून ती चालू लागली. पांडवांचा आक्रोश ऐकून धृतराष्ट्राने गांधारीला सांगितले की, "वधूला (कुंतीला – सुनेला) म्हणावे, फार कष्टात दिवस काढलेस; आता चार दिवस मुलांजवळ वैभवाने रहा." पण कुंतीने ऐकले नाही. शेवटी धर्म डोळ्यांत पाणी आणून म्हणाला, "पूर्वी विदुलेची गोष्ट वासुदेवाकरवी आम्हांला ऐकविलीस. तुझे

म्हणणे मनावर घेऊन आम्ही राज्य जिंकले. आता तुझी क्षात्रवृत्ती कुठे गेली की मिळविलेले राज्य, आम्ही मुले, सुना ह्या सर्वांना सोडून रानात चाललीस?" कुंती न ऐकता अश्रू ढाळीत चालूच राहिली आहे, हे पाहून भीम म्हणाला, "मुलांनी मिळविलेले राज्य भोगायचे सोडून कुठे चाललीस? असे जर होते, तर आमच्याकडून पृथ्वीचा क्षय होईल, असे युद्ध का खेळविलेस? माद्रीच्या ह्या दोन मुलांना आणि आम्हांला वनातून हस्तिनापुराला आणलेच कशाला?"

मुले बडबडत होती. द्रौपदी अश्रू ढाळीत मागून येत होती, व ही काही न बोलता चालत होती. मुले काही केल्या पाठ सोडीत नाहीत, हे पाहून तिने अश्रू पुसले व ती म्हणाली, "पांडवा, तू म्हणालास, ते सर्व खरे आहे. तुम्ही खचला होता, म्हणून मी तुम्हांला चाबूक मारून उठवले. द्यूतात राज्य गमावले होतेत. सुखाला पारखे झाला होता. ज्ञाती विचारीत नव्हत्या, तेव्हा मी तुम्हांला वरती काढले. पांडूची संतती नाहीशी होऊ नये, तुमचे यश नष्ट होऊ नये, म्हणून मी तुम्हांला फटकारले. ही माझी लाडकी सून परत अपमान न पावो, म्हणून मी तुम्हांला डिवचून जागे केले. बाबांनो, पांडूची बायको असताना मी राज्याचा उपभोग भरपूर घेतला आहे, बरे. दाने दिली, यज्ञ केले, सोमरस प्याले. माझ्यासाठी काही हवे होते, म्हणून नाही मी वासुदेवाबरोबर निरोप पाठविला. पुत्रांनी मिळविलेल्या राज्याच्य फलाची – वैभवाची – मला मुळीच इच्छा नाही. आता तप करून, सासूसासऱ्यांची सेवा करून मला पुण्यप्रद अशा पतिलोकाला जाऊ द्या. तुम्ही परता."

हे कुंतीचे शब्द ऐकून शरमलेले पांडव द्रौपदीला घेऊन परत फिरले. कुंतीने गांधारीचा हात आपल्या हातात घेतला होता.

धृतराष्ट्राने गांधारीच्या खांद्यावर हात ठेवला होता व ती तिघे जण एका माळेत हस्तिनापूरच्या रस्त्यातून चालत होती.

वनात गेल्यावरही कुंतीच त्यांची सेवा करीत होती व रोज ह्याचप्रमाणे ती त्यांना गंगेवर घेऊन जात होती. मुले एकदा येऊन भेटून गेली. परत सर्व जणे रडली. वनात गेल्यापासून सर्वांआधी विदुर गेला. वनात एकंदर तीन वर्षे लोटल्यावर वणवा लागता असला आधीच होरपळलेल्या या तिघां जीवांची शरिरे आगीत होरपळून गेली. मरतानाही कुंती ताठ मानेने मेली. धृतराष्ट्राने संजयाला सुटून जावयाला सांगितले. वणवा पुढे येत असताना सर्वांनी जमिनीवर बसून श्वास रोधून प्राणायाम केला, व अशा अवस्थेत संजय पाहत असता ती अग्निसात झाली.

सप्टेंबर, १९६६

# पिता-पुत्र

पोरक्या पांडवांचे रक्षण कुणी केले? कुंती जागरूक होती, पण त्यांना मारायच्या ज्या युक्त्या योजिल्या होत्या, त्यांतून त्यांना कोणी निभावून नेले?—विदुराने.

भीष्माने धृतराष्ट्राच्या आणि पांडूच्या मुलांना शिकविण्याची व्यवस्था केली, पण पांडवांच्या रक्षणासाठी खास प्रयत्न केले नाहीत. धार्तराष्ट्रांची व पांडवांची स्पर्धा होती हे त्याला उमजलेच नव्हते, असे तर नाही? तो काही करण्यास असमर्थ होता का? का तो उदासीन होता? जे कुळ निर्वंश व्हायला घातले होते, ते सावरले. एकही नव्हता तेथे दोघे आले, व दोघांचे एकशे-पाच झाले. त्या एकशे-पाचांतले काही गेले, तरी त्याला पर्वा नव्हती. कुरूचा वंश हस्तिनापूरच्या गादीवर असला म्हणजे मिळवली, एवढ्यापुरताच का भीष्म जागरूक होता? तसे म्हणता येत नाही; पण एवढे मात्र खरे की, द्रौपदीच्या

स्वयंवरापर्यंत भावाभावांच्या स्पर्धेची व धृतराष्ट्राच्या दुष्ट हेतूंची त्याने मुळीच दखल घेतली नाही. त्याला त्याची वार्ताही नव्हती, असे दिसते. पांडवांच्या हिताला बापाप्रमाणे जपला तो विदुर. पण विदुर स्वतःच इतका परतंत्र की धृतराष्ट्राचा कावेबाजपणा व दुर्योधनाची असूया ह्यांची जाहिरात होईपर्यंत ही जपणूकही त्याला पहिल्या-पहिल्याने फार सावधगिरीने, कोणाच्या डोळ्यावर येणार नाही, अशा तऱ्हेने करावी लागली. दुर्योधन, शकुनी वगैरे पांडवांना मारण्यासाठी टपले होते. बुडवून टाकणे, सर्पांकडून दंश करवणे, अन्नात विष कालवणे, वगैरे नाना प्रकार त्यांनी भीमाविरुद्ध करून पाहिले. युयुत्सूने दर वेळी त्यांच्या गुप्त मसलती पांडवांना कळविल्या. पांडवही सर्व वैर जाणून, बाहेर काहीही न दाखविता विदुराच्या सल्ल्याप्रमाणे वागले, असे आदिपर्वात म्हटले आहे. विदुराने कुंतीचेही हित पाहिले. सर्व मुले आपापल्या विद्येचे प्रदर्शन करीत असता कर्ण न बोलता तेथे आला. त्याचे आणि अर्जुनाचे युद्ध जुंपणार, असे दिसताच कुंती बेशुद्ध पडणार होती, पण विदुराने तिला धीर दिला, व मोठ्या युक्तीने दोघां मुलांच्या युद्धाचा प्रसंग टाळला.

विदुराचा पांडवांबद्दलचा ओढा सर्वस्वी लपून राहिलेला नव्हता. पांडवांना लांब हाकून देण्याचा डाव धृतराष्ट्राने व दुर्योधनाने रचला, त्या वेळी दुर्योधनाने बापाला सांगितले की, भीष्म आमच्या व पांडवांच्या बाबतीत अगदी मध्यस्थासारखा आहे. त्याला कोणीच जास्त जवळचे नाहीत. द्रोणाचा मुलगा माझ्या बाजूचा आहे. मुलगा नेईल, तिकडे द्रोण, आणि ह्या दोघांबरोबर कृप; पण विदुर मात्र 'आतून' त्यांच्या बाजूचा आहे. तो एकटा आपणांविरुद्ध काही करू शकणार नाही (१·१३०·१६ – १८). हळूहळू धृतराष्ट्राने पांडवांना वारणावताला धाडण्याचा घाट घातला व पुढे मरण दिसत असूनही

धर्मराजाला जावे लागले. सगळ्यांचा निरोप घेताना द्व्यर्थी बोलून विदुराने त्यांना पुढील संकटाची जाणीव दिली व त्यातून पार कसे पडायचे, हा मार्गही दाखविला. पांडव वारणावताला गेल्यावर त्यांच्याकडे आपल्या विश्वासातला एक खणणारा पाठवून भुयार करविले. विदुराने गुप्तपणे त्यांचे रक्षण केले. पांडवांचे द्रौपदीशी लग्न झाल्यानंतर विदुर उघडपणे पांडवांच्या बाजूने धृतराष्ट्राशी बोलू लागला. कारण उघड होते. विदुराची परिस्थिती कौरवांच्या घरी होती, तशीच होती. तो कोणासाठी काहीच करू शकत नव्हता. पण पांडव आता स्वतंत्र झाले होते. त्यांच्या पाठीमागे पांचालांचे सामर्थ्य होते. यादवांचे सामर्थ्य होते. आता गुपचूप राहून कौरवांचे बेत मुकाट्याने हाणून पाडायचा प्रश्न नव्हता. आदिपर्वात परिस्थितीतला हा फरक फारच मार्मिकपणे दाखविला आहे. द्रौपदीला पांडवांनी मिळविली. दुर्योधन आणि त्याचे मित्र हात चोळीत पराभव खाऊन परत आले. हे कळल्याबरोबर विदुर धृतराष्ट्राकडे गेला, आणि त्याला म्हणाला, "कौरवांचे अभिनंदन असो!" पांडव काय किंवा दुर्योधनादी भाऊ काय, सगळे कुरूचे वंशज, म्हणजे कौरव! पांडव लाक्षागृहात जळालेले, त्यामुळे धृतराष्ट्राला वाटले, द्रौपदीला मिळवून आपलाच मुलगा परत आला. आणि तोही मोठ्या आनंदाने "छान, छान," म्हणून "द्रौपदीला आणा", "अरे दुर्योधना, तिला भूषणे आणा," असे म्हणाला. मागाहून विदुराने त्याला खरी हकीकत सांगितली. लहानपणापासून धृतराष्ट्राने पांडवांना छळून शेवटी त्यांना जाळायची मसलत केली होती. त्या सर्वांचे ह्या वेळी विदुराने उट्टे काढले. धृतराष्ट्राने "तेही माझे मुलगेच आहेत; विदुरा, तेही माझे आवडतेच आहेत." असे म्हटल्यावर "बाबा, तुझ्या तोंडात साखर पडो. त्यांच्याविषयी तुझी बुद्धी अशीच कायमची राहो," असे

विदुर म्हणाला. विदुर गेल्यावर दुर्योधन वगैरे परत येऊन पांडवांचा नाश कसा करावा, ह्याबद्दल धृतराष्ट्राकडे येऊन मसलत करू लागले, तेव्हा काळवेळ जाणून आता गुप्त खलबत करण्यात अर्थ नाही, हे ओळखून धृतराष्ट्राने भीष्म, द्रोण, विदुर यांना बोलाविले. सर्वांनी त्याला पांडवांशी सख्य करण्याची विनंती केली. ह्याही वेळी विदुराचे भाषण अगदी तळमळीचे आहे. नंतर विदुराने स्वतः जाऊन पांडव, द्रौपदी व कुंती ह्यांना आणले; आणि धृतराष्ट्राने त्यांना राज्यार्ध म्हणून खांडवप्रस्थ दिले. ह्यानंतर मात्र विदुराने दर वेळी उघडपणे पांडवांची बाजू घेतली.

महाभारतामध्ये व्यक्ती म्हणून विदुराचे एक विशेष असे स्थान व कार्य आहे. त्याशिवाय तो एका विशिष्ट वर्गातला होता. त्या सबंध वर्गाचेही एक विशेष कार्य ह्या कथेत आहे. त्याच्या वर्गाची दुःखे ती विदुराची होतीच, आणि शिवाय त्याची स्वतःची अशीही दुःखे होती. विदुर ‘क्षत्ता’ होता. ‘क्षत्ता’, ‘सूत’ किंवा ‘पारशव’ अशी ह्या वर्गाची नावे होती. त्यांची स्पष्ट व्याख्या करणे कठीण आहे. कर्ण ह्या वर्गातला होता. एका क्षत्रिय-कुमारीचा (कुंतीचा) जन्मताच टाकून दिलेला आणि एका सूताने (अधिरथाने) पुत्रस्थानी मानलेला म्हणून तो ‘सूत’ होता, असे ‘विराटपर्वा’वरून दिसते. म्हणजे पाळलेल्या कर्णाखेरीज अधिरथाला व राधेला इतरही मुले होती व ती सूतवर्गातीलच होती. कर्णाने स्वतः सूतांशीच शरीरसंबंध जोडलेला होता. त्याच्या सुना, जावई सूतच होते. प्रत्यक्ष पाहून सबंध युद्धाची माहिती देणारा संजय सूतच होता. धृतराष्ट्राला वैश्य स्त्रीपासून झालेला युयुत्सू धृतराष्ट्रपुत्र म्हणून माहीत होता, पण तोही क्षत्ता किंवा सूतच होता. अंबिका व अंबालिका ह्यांची कुणी-एक दासी व व्यास ह्यांपासून जन्मलेला विदुरही सूतच

होता. विदुराची बायको "कन्या पारशवी" ही सूतवर्गातलीच होती. सुदेष्णेचा भाऊ, विराटाचा सेनापती कीचकही सूतच होता. नैमिषारण्यात ऋषींना महाभारतकथा सांगणारा उग्रश्रवा रो(लो)महर्षणही सूतच होता. सूत सारथी होते, अस्त्रजीवी होते, पुराण व राजवंश जाणणारे होते. सूत व मागध ह्यांचा उच्चार एका समासात केलेला आढळतो, पण मागधांचे स्थान सूतांच्या बरेच खालचे होते. सूत हे क्षत्रियांना फार जवळचे, आप्त असे वाटत. याचे कारण असे दिसते की, क्षत्रियांना सूत हे बरेच वेळा सावत्र भाऊ असत (विदुर व युयुत्सू). मगध नुसते स्तुतिपाठक, तर सूत बरेच वेळा बरोबरीचे तर कधीकधी डोईजड (उदाहरणार्थ, कीचक) झालेले असत. ते आपल्या क्षत्रिय भावांना व पोशिंद्यांना उपदेश करू शकत (संजय, विदुर). त्यांच्या मसलतीत बरोबरीने बसत (संजय). त्यांच्यातल्या सुरेख मुली 'स्त्रीरत्नं दुष्कुलादपि' ह्या न्यायाने क्षत्रियांशी लग्न करू शकत (उदाहरणार्थ, सुदेष्णा), पण त्यांना क्षत्रियांच्या मुली लग्नात मिळत नसत. दुर्योधनाने कर्णाला राजा बनविले, पण कर्णाशी संबंध केला नाही, हे लक्षात घेण्यासारखे आहे. दुर्योधन कर्णाला मित्र म्हणवीत असे, पण दोघांमध्ये संपूर्ण बरोबरीचे नाते नव्हते,— सेव्यसेवकभाव शेवटपर्यंत दिसून येतो. तशीच अवस्था इतर सूतांची होती. विदुराचीही होती. विदुर आणि त्याचे भाऊ एका बापापासून झालेले; पण पहिल्या दोघांच्या आया क्षत्रियकन्या व मेलेल्या राजाच्या बायका होत्या. ह्याची आई दासी होती व मेलेल्या राजाची बायको नव्हती. तसे नसते, तर विदुर राजाच झाला असता, असे महाभारतात स्पष्टच सांगितले आहे. यादवांच्या भीषण अंतानंतर इंद्रप्रस्थ वज्राला मिळाले, हस्तिनापूर परीक्षिताला मिळाले. पण धृतराष्ट्रपुत्र असूनही सूत म्हणून बिचाऱ्या युयुत्सूला मात्र काहीच मिळाले नाही.

ह्या वर्गाची अवस्था हीच होती. क्षत्रियांना अतिशय जवळचे, क्षत्रियांच्या रक्ताचे, क्षत्रियांना निर्भीडपणे उपदेश करू शकणारे असे हे लोक क्षत्रियांची बरोबरी मात्र करू शकत नव्हते. ते व त्यांची संतती सिंहासनावर बसू शकत नव्हती. धृतराष्ट्र अंधळा होता, म्हणून त्याला राज्य मिळाले नाही. पांडू काही निर्व्यंग नव्हता, पण त्याला राज्य मिळाले. पण सर्व दृष्टींनी योग्य असूनही विदुर मात्र कोरडाच राहिला.

सूतांची घरे राजांगणाच्या जवळच होती, असे दिसते. विदुर काय, संजय काय, आपापल्या घरी राजवाड्यापासून जरा दूर राहत होते, असे दिसते. धृतराष्ट्राचे विदुरावर प्रेम होते. त्यातही एक प्रकारचा हुकमीपणा होता. वेळी-अवेळी गरज लागली, म्हणजे तो विदुराला बोलावणे पाठवी. त्याचप्रमाणे पांडवांकडे काही निरोप घेऊन वगैरे जावयाचे असले, तर विदुरालाच पाठवीत असे. एकदा रागारागाने त्याने विदुराला राजवाड्यातून घालवून दिले होते. पण पश्चात्ताप पावून त्याला त्याने परत बोलाविले, त्याची क्षमा मागितली, त्याला धाकटा भाऊ म्हणून मांडीवर बसविले, असे एक हृदयंगम वर्णन महाभारतात आहे. भाऊ तर खराच, पण अन्नवस्त्राखेरीज कोठच्याही तऱ्हेचा हक्क नसलेला तो भाऊ होता. भीष्म कुलज्येष्ठ, पण पांडव-कौरवांच्या बाबतीत त्याची वृत्ती समान होती. भांडण होऊ नये म्हणून त्यानेही प्रयत्न केले, पण विदुराच्या मनाचा ओढा पांडवांकडे होता. पांडव अतिशय मोठे लढवय्ये, त्यांच्या हातून कौरवांचा नाश होईल, असे भीष्म वारंवार म्हणे. ही गोष्ट विदुरही जाणून होता. पण विदुराच्या बोलण्यात न्यायाची भाषा जास्ती येते. पांडवांच्या पोरकेपणाची कीवही त्यात आहे. असे का? स्वतः असहाय म्हणून हस्तिनापुराला आलेल्या पोरक्या पोरांच्याबद्दल त्याला कणव वाटत

असे, असे तर नाही ना ? आपल्याला राज्याचा अधिकारच नाही; पण ज्यांना तो आहे त्यांचा तरी जाऊ नये, अशी बुद्धी त्यामागे होती का ?

विदुर या शब्दाचा अर्थ 'ज्ञानी' असा आहे; आणि सबंध महाभारतात विदुराचा ज्ञानीपणा जो दिसतो, तो पारमार्थिक आहे. ह्या जगात समभावाने आणि न्यायाने वर्तन असावे; लोभ धरू नये व आत्म्याचे चिरंतनत्व ओळखावे, असा त्याचा आग्रह होता, ज्याच्यापुढे हे ज्ञान त्याने ओतले, तो धृतराष्ट्र दृष्टीने अंधळा होता. स्वतः राज्याचा अधिकारी असूनही ते न मिळाल्यामुळे तो दुखावला होता व आपल्याला मिळाले नाही ते मुलांना तरी मिळावे, ह्या ईर्ष्येने सदसद्विवेक नाहीसा झालेला असा होता. पहिल्या-पहिल्यांदा, म्हणजे पांडव लहान असताना विदुराचे म्हणणे त्याने मनावरच घेतले नाही; आणि मागाहून ऐकले तेव्हा 'मी काय करणार ? मुले आता माझ्या हातात राहिली नाहीत,' असे म्हणून तो उपदेश डावलला. विदुराजवळ शहाणपण होते, पण सत्ता नव्हती. द्रौपदी-स्वयंवरानंतर त्याने एकदाच धृतराष्ट्राला हिणविले; त्यानंतर सर्व युद्ध झाल्यावर तो म्हणाला, "आता रडून काय उपयोग ? पांडव द्यूत हरले, त्या वेळी एखाद्या लहान मुलासारखा विजयाने नाचलास. मी सांगत होतो की, 'बाबा ! हा विजय नाही, हा सत्यानाश आहे.' तेव्हा तू ऐकले नाहीस. आता क्षत्रियासारखा वाग. शोक करू नकोस." ह्या शब्दात हिणविण्याचा प्रयत्न दिसत नाही. जे आपण भोगतो, ते आपल्या कर्माचे फळ असते. तेव्हा आता ते धीराने भोगावे, असाच त्याचा सूर होता.

विदुर स्वतःला काही मिळाले नाही, म्हणून कधी दुःख करताना दिसत नाही. तसा विचार केला, तर महाभारतातल्या इतर

व्यक्तींच्या मानाने त्याचे आयुष्य सुखाचेच गेले. त्याचे लग्न झाले होते. तो स्वतःच्या घरी मनन, चिंतन, पूजन करीत राहिला होता. त्याला मुलेबाळे झाली होती. ज्ञानी म्हणून त्याचा लौकिक होता. पण तरीही त्याचे सर्व आयुष्य एक प्रकारे उदास व विषण्ण वाटते. महाभारतातील प्रत्येक व्यक्ती – पुरुष असो, स्त्री असो, उच्च असो, नीच असो, – कोठच्या-ना-कोठच्या तरी उलाढालीत गुंतलेली आढळते. धृतराष्ट्र आणि पांडू, गांधारी आणि कुंती, दुर्योधन व पांडव, द्रौपदी, सुभद्रा, उत्तर-उत्तरा व त्यांचे मुलगे आणि श्रीकृष्ण व इतर यादव ही मंडळी फार खळबळीचे व उत्कट असे जीवन जगत होती. त्यात चढ होते, उतार होते, प्रेम होते, द्वेष होता, आणि जी काही शांती होती, ती मरणानंतरची किंवा आयुष्याच्या शेवटी जाणूनबुजून मोठ्या प्रयासाने जीवनाचे आघात सहन करून दमल्या-नंतर मिळविलेली. ही शांती खरी शांती वाटत नाही. त्यातही एक प्रकारचा अट्टहास वाटतो. धृतराष्ट्र, गांधारी आणि कुंती ह्यांचा वनवास किंवा पांडव आणि द्रौपदी यांचे महाप्रस्थान हे शांतिदायक किंवा शांतिकारकही वाटत नाही. जी गोष्ट या क्षत्रियांची, तीच त्यांना निकट असलेल्या सूतांची. नुसती लढाईची बातमी सांगणारा संजयसुद्धा भोवताली चाललेल्या झगड्यात अलिप्त राहू शकला नाही, हे वारंवार दिसते. द्रोण, अश्वत्थामा ह्यांच्यासारखीही माणसे मनाच्या व शरिराच्या आत्यंतिक दुःखदायी व्यापारांपासून बचावली नाहीत. ह्या सर्वांशी विरोधाने विदुराचे आयुष्य एक प्रकारे उठून दिसते; एक प्रकारे अजिबात विसरले जाते. तो दासीपुत्र म्हणून जन्माला आला व राज्याला मुकला. अगदी लहान वयातच त्याने आपले वैफल्य गिळून आयुष्याचा एक विशेष मार्ग आखला की काय, असे वाटते. महाभारतामध्ये एरवी सगळ्यांच्या पोटातील विचारांना वाचा

फोडलेली आहे, पण विदुराच्या बाबतीत मात्र महाभारत काहीच सांगत नाही. का तो खरोखरच विदुर आणि ज्ञानी होता? का प्रत्यक्ष यमधर्माचा अवतार होता, म्हणून आयुष्याची खळबळ त्याला शिवलीच नाही? तो सर्वस्वी उदासीन होता, असेही म्हणता येत नाही. तो पांडवांचा कैवारी होता. क्रौर्याचा व अन्यायाचा त्याला तिटकारा होता. पण त्याने आपले स्थान सोडले नाही. लढाईच्या दिवशी दोन्ही सैन्ये एकमेकांसमोर उभी असताना युयुत्सू उघडपणे जाऊन पांडवांना मिळाला. पांडवांना न्याय देण्याबद्दल धृतराष्ट्राशी सारखी कटकट करूनही विदुराने धृतराष्ट्राला सोडले नाही. धृतराष्ट्राची निर्भर्त्सनाही त्याने केली व धृतराष्ट्रावर प्रसंग ओढवला, तेव्हा त्याचे सांत्वनही त्यानेच केले.

धृतराष्ट्र आणि पांडू यांचे जसे लहानपणी भीष्माने पालनपोषण केले, तसेच विदुराचेही केले. विदुर हा मोठेपणी विदुरत्व पावला होता. सभांमध्ये, विशेषतः द्रौपदीहरणाच्या व कृष्णशिष्टाईच्या वेळी विदुराची व त्याचप्रमाणे भीष्माचीही भाषणे दिली आहेत. पण त्या दोघांचे एकमेकांशी संभाषण किंवा विचारविनिमय झालेला दिसत नाही. संभाषणाचा जो एक प्रसंग आदिपर्वाच्या १०३ या अध्यायात दिला आहे, तो उघड-उघड प्रक्षिप्त वाटतो. तो भाग असा: भीष्म विदुराला म्हणतो आहे, "सुबलाची मुलगी (गांधारी), मद्राची राजकन्या (माद्री) व यादवी (कुंती) अशा मुली आपल्याकडे सुना म्हणून आणाव्या, असे मला वाटते आहे. विदुरा, तुझे म्हणणे काय आहे?" विदुर म्हणतो आहे, "आपणच आमचे आईवडील, सर्व काही आहात; जे रुचेल ते करावे." ह्यापुढे गांधारी, कुंती व माद्री ह्यांबद्दलची हकीकत निरनिराळी आली आहे. म्हणजे हे पहिले आठ श्लोक सर्वस्वी निरर्थक आहेत. ह्या वेळी

विदुराच्या दोघां थोरल्या भावाच्या लग्नाचा विचार चालला होता. विदुराचे लग्न व्हावयाचे होते. सर्वजण वीस वर्षांच्या आतलेच असणार. विदुर सगळ्यांत धाकटा. अशा वेळी भीष्म विदुराचा सल्ला विचारणे शक्यच नाही. भीष्माने आपल्या थोरल्या दोघां पुतण्यांचे लग्न झाल्यावर देवक नावाच्या राजाची दासीपुत्री आणून तिचे विदुराशी लग्न लावले, व त्याला चांगली मुले झाली, असे दोन-तीन श्लोक आहेत. त्यानंतर परत विदुरांच्या बायकामुलांचा महाभारतात कुठे उल्लेख नाही. महाभारतात घडलेल्या मानसिक व शारीरिक तुंबळ स्पर्धेपासून विदुराने स्वतःला अलिप्त ठेवले, एवढेच नव्हे, तर आपल्या कुटुंबालाही अलिप्त ठेवले, असे दिसते. तरीही विदुर खोलपणे कुठे गोवला होता की काय, अशी मनाला शंका येतेच.

विदुर पांडवांचा कैवारी असे म्हटले, पण सर्व पांडवांशी त्याचे संबंध सारखे नव्हते. त्याचा आणि धर्माचा अगदी निकटचा संबंध होता. वारणावताला जाताना त्याने पुढील संकटाची सूचना धर्माला दिली होती. कुंतीने धर्माला विचारले, "विदुर तुजजवळ काय बोलला, ते आम्हांला सांगतोस का?" तेव्हा विदुराने काय सूचना दिल्या, ते धर्माने सर्वांना सांगितले. कौरवांच्या राजसभेतून तो आला, म्हणजे दरवेळी त्याचे बोलणे धर्माशी होई. कृष्ण आणि अर्जुन, कर्ण आणि दुर्योधन ह्यांच्या मैत्रीप्रमाणे उघड-उघड जगाला दिसेल अशी मैत्री, असा हा संबंध नव्हता. बरोबरीच्या मैत्रीचे ते नाते नव्हते. धर्मराज म्हणतो त्याप्रमाणे विदुराने बापाच्या नात्याने पांडवांचे रक्षण केले, पण इतर पांडवांपेक्षा धर्मच त्याला जास्त जवळचा होता. धर्मात आणि विदुरात काही विलक्षण साम्य आहे. विदुर नीतिज्ञ, धर्मज्ञ म्हणून 'विदुर' ह्या नावाने प्रसिद्ध, तर धर्म हा

त्याच्या स्वतःच्या पिढीत विद्वान, विचारशील व धर्मज्ञ म्हणून प्रसिद्ध. त्याच्या शहाणपणाची परीक्षा अरण्यपर्वात यक्षप्रश्नाच्या वेळी झाली. परत महाप्रस्थानपर्वात झाली. पांडूचा, म्हणजे राज्याभिषेक झालेल्या राजाचा तो थोरला मुलगा. वंशपरंपरागत राज्य त्याला मिळावयाचे. पण त्यातही भानगडी व कटकटी निर्माण झाल्या. लहानपणीच शत्रूच्या घरी काही न बोलता दीनपणे त्याला रहावे लागले. आपण राज्याचे अधिकारी, ही गोष्ट क्षणमात्र विसरता येण्यासारखी नव्हती. किंबहुना, त्याच्या धाकट्या भावाने व आईने त्याला ही गोष्ट क्षणभरही विसरू दिली नसती. भीम, अर्जुन ह्यांच्यासारखा धर्म लढाऊ वृत्तीचा नव्हता. ब्राह्मण मंडळी जमवावी; त्यांच्याकडून यज्ञ करवावे, त्यांना दक्षिणा द्याव्या, लोकांचा दुवा घ्यावा, धार्मिक गोष्टींबद्दल उहापोह करावा, जुन्या राजांची चरित्रे ऐकावी, मजेत सोंगट्या खेळाव्या, हा त्याचा स्वभाव. वाट्याला आयुष्य आले, ते मात्र धकाधकीचे. जे काही मिळाले, तेही इतरांच्या पौरुषामुळे. अतिसुंदर बायको व द्रुपदासारखे बलाढ्य श्वशुर मिळाले, ते अर्जुनामुळे; दोन्ही वेळच्या वनवासामध्ये संरक्षण झाले, ते भीमाच्या बळाने; इंद्रप्रस्थाचे राज्य व मयसभेसारखी अप्रतिम सभा मिळाली, ती कृष्णार्जुनांच्यामुळे; शेवटचे युद्ध जिंकले, तेही भावांचा पराक्रम व कृष्णाची बुद्धी ह्यांच्या जोरावर! हे होत असतानाही युद्धात एकदोनदा भावांपुढे त्रागा करण्याचा प्रसंग उद्भवला. जे शेवटी हाती आले, त्याची किंमतही इतकी जबर द्यावी लागली की, तोंड विजयाने उजळायच्याऐवजी विषादाच्या राखेने मात्र भरल्यासारखे वाटत होते. धर्माचे आयुष्यही पहिल्यापासून शेवटपर्यंत विषादाने भरलेले. ह्या बाबतीतही तो विदुराच्या जवळचा वाटतो. मिळायची पात्रता असतानाही मिळाले नाही, म्हणून विदुराची विषण्णता; व अधिकारप्राप्य

गोष्टी दुष्प्राप्य होऊन मिळाल्या, त्याही जबर किंमत देऊन, म्हणून धर्माची विफलता! विदुराच्या विफलतेला महाभारतात तोंड फोडलेले नाही. पण धर्माची विफलता वेळोवेळी त्याच्या तोंडून वदवली गेली आहे. धर्म एवढा विवेकी, पण शेवटच्या क्षणी द्रौपदी खाली पडून मेली, तेव्हा तिचे प्रेम अर्जुनावर जास्त होते, ह्या दीनवाण्या शब्दांनी त्याने आपले मुख्य शल्य प्रकट केलेच. एकदा असे वाटते की, द्यूत खेळायला बोलाविले असताना आपले राज्य, आपली भावंडे, आपली बायकोसुद्धा जणू उन्मादात पणाला लावण्यात धर्माने परत एकदा आपली मनोव्यथाच प्रकट केली. जे स्वतःच्या श्रमाने मिळाले नाही, ते असे उधळण्यात धर्माने मोठा पुरुषार्थ केला का? की ते मला तुच्छ आहे, हे दाखवून दिले? धर्म सगळ्या वडील माणसांचा मान ठेवीत असे, पण विदुराबद्दल त्याला एक आतला जिव्हाळा होता, असे वाटते.

हे सर्व लक्षात घेतले, म्हणजे विदुराचे आणि धर्माचे पितापुत्रांचे तर नाते नव्हते ना, अशी शंका मनात डोकावते. ह्या शंकेला पोषक असे महाभारतात पुष्कळच आहे. महाभारतात कोणाचेही कसलेच गौप्य लपविलेले नाही. कुंतीला कुवारपणी झालेला मुलगासुद्धा त्यात आलेला आहे. मग कुंतीला विदुरापासून धर्म झाला, ही गोष्ट का लपवून ठेविली असावी? कदाचित ही गोष्ट झालीच नसावी. सर्व कुंतीपुत्र हे निरनिराळ्या देवतांपासून झालेले दाखविले आहेत. पांडू जिवंत असताना ही सर्व मुले झाली असल्यामुळे व पांडूने ती आपली स्वतःची असे मान्य केल्यामुळे बीजक्षेत्रन्यायामुळे ती पांडूचीच होतात. त्यात एखादे मूल विदुरापासून झाले असते, तर त्याला कुठचाही कमीपणा आला असता, असे वाटत नाही. एक शंका मनात येते. धृतराष्ट्राचा मुलगा हा क्षत्रिय राजकन्येपासून

झालेला होता, व स्वतः धृतराष्ट्रही एका राजघराण्यातील सर्वांत वडील राजपुत्र होता. ह्याउलट कुंती जरी राजकन्या असली, तरी विदुर हा सूत होता. सूतापासून झालेला मुलगा म्हणून वडील असूनही धर्माचा हक्क दुर्योधनापुढे कमी ठरला असता का, असा एक प्रश्न उरतो. त्याला काही महाभारतात उत्तर नाही. आदिपर्वात ज्या वेळेला, कोणातरी देवतेला बोलावून पुत्र उत्पन्न करावयाचा असा बेत ठरतो, त्या वेळेला नेमकी यमधर्माचीच आठवण व्हावी, हे मोठे चमत्कारिक वाटते.

ह्या पहिल्या मुलाचे नाव 'युधिष्ठिर'. त्याचे 'धर्म' नाव पडले त्याला कारणे पुष्कळ आहेत. यमधर्माचा मुलगा, म्हणून त्याचे नाव 'धर्म'. अतिशय धार्मिक वृत्तीचा, म्हणूनही त्याचे नाव 'धर्म'. ह्याखेरीज विदुराचा असल्यामुळेही त्याला 'धर्म' नाव पडण्याचा चांगला संभव होता. विदुर म्हणजे शापित यमधर्मच होता. (अणिमांडव्य ऋषीची गोष्ट पहा.) विदुर हा कुंतीचा धाकटा दीर, या नात्याने नियोगाला सर्वस्वी योग्य असा होता. धर्माच्या आज्ञेप्रमाणे झालेले मूल म्हणूनही युधिष्ठिराला 'धर्म' नाव पडण्याचा संभव होता. ह्यावरून धर्म विदुराचा मुलगा असावा, असे वाटते.

दुसऱ्याही ठिकाणी दोन प्रसंग असे आहेत की, त्याने या तर्काला पुष्टी येते. धृतराष्ट्र, गांधारी, कुंती आणि विदुर ह्यांनी अरण्यवास स्वीकारला. धर्म व इतर पांडव त्यांना भेटायला वनामध्ये जात असत. अशा एका वेळी विदुर दिसला नाही, म्हणून धर्माने त्याची चौकशी केली. धृतराष्ट्राने सांगितले, "विदुर घोर तप करतो आहे. तो काही खात-पीत नाही. कधीकधी अरण्यात इकडे-तिकडे भटकताना तो लोकांना दिसतो." धृतराष्ट्र हे सांगत असतानाच अस्थिपंजर मात्र उरलेला, सर्व अंग धुळीने माखलेला, उघडा-नागडा असा विदुर लांबून जातो

आहे, असे लोक म्हणाले. हे ऐकून धर्म "विदुरा, थांब. अरे, मी तुझा आवडता युधिष्ठिर," असे ओरडत-ओरडत त्याच्यामागून धावला. असे एका-पाठोपाठ धावत असताना एके ठिकाणी अगदी दाट अरण्यात एकान्त स्थळी विदुर एका झाडाला टेकून उभा राहिला. "मी युधिष्ठिर," असे म्हणून परत एकदा धर्माने आपली ओळख दिली. तेव्हा विदुर पापणी न हलविता, आपली दृष्टी राजाच्या दृष्टीत मिसळून त्याच्या गात्रागात्रात योगबलाने शिरला. आपले प्राण, इंद्रिये, तेज सर्व काही विदुराने राजाला दिले.

मरणसमयीचे हे वर्तनही पितापुत्रांना योग्य असेच आहे. एका उपनिषदात मरायला टेकलेल्या पुरुषाने काय करावे, याचे वर्णन आहे. आपण जमिनीवर निजावे, पुत्राला आपल्या अंगावर घ्यावे; मी माझी इंद्रिये तुला देतो,' असे पित्याने म्हणावे. 'घेतो,' असे पुत्राने म्हणावे. ह्याप्रमाणे शक्ती, ऐश्वर्य, बुद्धी सर्व काही पित्याने पुत्राला द्यावे, व पुत्राने घ्यावे, असा एक विधी सांगितला आहे. महाभारतातील विदुर व धर्म यांच्या शेवटच्या भेटीत हीच क्रिया थोडक्यात वर्णिली आहे. पुढे दोन अध्यायांनंतर व्यास सगळ्यांना भेटायला आल्यावर तो विदुराबद्दल असे सांगतो, "पूर्वी विचित्रवीर्याच्या दासीच्या ठायी माझ्यामुळे साक्षात धर्म योगबलाने जन्माला आला आणि त्याने योगबलाने कुरुराज युधिष्ठिराला जन्म दिला. जो धर्म, तोच विदुर – जो विदुर, तोच पांडव! आणि हे धृतराष्ट्रा, ज्याप्रमाणे तुझा तो भाऊ तुझी चाकरी करीत होता, तसाच युधिष्ठिर धर्म तुझी करीत आहे." म्हणजे कुंतीने आपल्या धाकट्या दिरापासून धर्मराजाला उत्पन्न केले, ही गोष्ट सर्व युद्ध संपेपर्यंत गुप्त ठेवून त्याचा महाभारतात अशा ठिकाणी उच्चार केलेला आहे की, शेवटी विदुराचे व धर्माचे ऐक्य हे पितापुत्राचे ऐक्य होते, की दोघेही साक्षात यमधर्माचे मुलगे

म्हणून होते, हा संदेह उरतोच. कुंतीला फक्त एकच मुलगा विदुरापासून झाला. इतर का नाही? असा विचार केला, तर नियोगाने एखाद्या पुरुषाशी संग केला, तर तो फक्त एकदाच पुत्रप्राप्तीकरता करावा, अशी भावना असल्यामुळे विदुराचा व कुंतीचा संयोग परत झाला नाही व तिला दुसऱ्या पुरुषांना बोलवावे लागले, असे वाटते. एवढे मात्र खरे की, ह्या शेवटच्या क्षणापर्यंत विदुराच्या आणि धर्माच्या नात्याचा व एकमेकांविषयी वाटणाऱ्या जिव्हाळ्याचा, इतर बाबतीत अतिशय स्पष्टवक्ते असणाऱ्या महाभारतात कोठेही स्पष्ट उल्लेख नाही. विदुराचे व धर्माचे पितापुत्रांचे नाते असण्याची शक्यता आहे असे मानले, तर सबंध महाभारताच्या गोष्टीला एक निराळेच वळण लागते, अगदी निराळाच अर्थ प्राप्त होतो. धर्म हा विदुराचा औरस व पांडूचा क्षेत्रज मुलगा असेल, तर भारतीय युद्ध हे फक्त दोघा भावांच्या मुलांचे युद्ध न राहता तिन्ही भावांच्या मुलांतील युद्ध होते. पण तिहेरी लढाई होत नाही, याचे कारण एक जण दोघांचा मुलगा म्हणून! आपल्या क्षेत्रज मुलांचे बाप कोण, हे कोणासही कळू नये, म्हणून पांडू लांब हिमालयात गेला. त्याच्या मुलांचे बाप कोण, हे कोणाला कळले नाही. व्यासाप्रमाणे पितृत्व कधी उघड झाले नाही. विदुर मुलासाठी म्हणून कसल्याही कारस्थानात पडला नाही. शेवटपर्यंत तो उदासीन व अलिप्तच राहिला. मुलगा राजा झाल्यावरही राजाचा बाप म्हणून धृतराष्ट्राप्रमाणे त्याला मिरविता आले नाही. विदुराची खिन्नता धर्माच्याही वाट्याला आली. जे हक्काचे, ते सर्व मिळाले. पण इतक्या हानीने की सर्व मिळूनही धर्म शेवटपर्यंत नुसता उदासीनच नव्हे, तर अकृतार्थही राहिला.

ऑक्टोबर, १९६५

पाच

# द्रौपदी

द्रौपदी आणि सीता भारतातील दोन महाकाव्यांच्या नायिका. पण केवळ दोन आदिग्रंथांच्या नायिका याच्याखेरीज इतरही साम्य खूप आहे. दोघीही एका प्रकारे भूमिकन्याच. एक यज्ञासाठी भूमी नांगरताना सापडली, तर दुसरी प्रत्यक्ष यज्ञकुंडातून निपजली. दोघींचेही लग्न पण लावून झालेले. एकीचा वनवास चौदा वर्षे, तर एकीचा तेरा वर्षे. ह्या-ना-त्या कारणामुळे दोघींचे आयुष्य विफल ठरलेले. पण ही साम्ये धरूनसुद्धा जितका जास्त विचार करावा, तितकी भिन्नताच अधिक प्रत्ययाला येते. ह्या भिन्नतेचे एक कारण म्हणजे ज्या ग्रंथांच्या त्या नायिका आहेत, त्या ग्रंथांच्या स्वरूपातील जमीन-अस्मानाचा फरक.

आजकालच्या काळात विशेषतः इंग्रजी वाङ्मयातील मूल्यांना

ह्या लेखात फुल्यांपर्यंतचा भाग आहे, तो महाभारताच्या संशोधित आवृत्तीवर आधारलेला आहे. त्यानंतरची ‘ नरोटी ’ माझी.

अनुसरून ह्या दोन्ही ग्रंथांना महाकाव्ये म्हणावयाचा प्रघात पडला आहे. आपल्या परंपरेप्रमाणे महाभारत हे काव्य नसून एक इतिहास आहे. झालेल्या गोष्टींची नोंद इतिहास करतो. घडेल ते सांगायच्या अनुषंगाने महाभारतात राजधान्या, अरण्ये, नद्या यांचीहि वर्णने येतात. पण ती तितक्यापुरतीच. ज्या प्रमाणावर एकंदर गोष्ट रंगविलेली आहे, ते प्रमाणही स्थल, काल आणि व्यक्ती ह्या सर्वांच्याच बाबतीत खूप मोठे आहे. इतिहास सांगण्याच्या ओघात शूर आणि भ्याड, दुष्ट आणि सज्जन, उतावळे आणि संथ, सुंदर आणि कुरूप अशा कितीतरी स्त्री-पुरुषांची चित्रे त्यात आली आहेत. ह्यांपैकी कोणतेही सर्वस्वी एकाच रंगात रंगविलेले नाही. सर्व सद्गुण एका बाजूला व सर्व दुर्गुण एका बाजूला, असे चित्रण जवळ-जवळ नाहीच. लोकांसमोर काहीतरी आदर्श ठेवावयाचा, ह्याही बुद्धीने ते लिहिले गेले नाही. ह्याउलट रामायण हे एका आदर्श पुरुषाचे चरित्रगायन आहे. जे-जे काय म्हणून जगात चांगले असेल, त्याचा पुतळाच असा एक पुरुष श्रीरामचंद्र होता, व त्याचे चरित्र जगाला कळावे, म्हणून वाल्मीकीने हे काव्य लिहिले. जसा राम हा पुरुषांचा आदर्श, तशी सीता ही स्त्रियांचा आदर्श. सगळे रामायण मुळी आदर्शांनीच भरलेले आहे. आदर्श भाऊ, आदर्श सेवक, आदर्श प्रजाजन आणि आदर्श खलपुरुषसुद्धा. महाभारतात असामान्य व्यक्तींचे चित्रण नाही, असे नाही. असामान्य व्यक्तीचे चित्रण असूनसुद्धा त्या व्यक्तींच्या सामान्यत्वाचा कधी विसर पडत नाही. रामायण ही केवळ दोन, नव्हे, एकाच व्यक्तीची कथा मुख्यत्वेकरून आहे. बाकीच्या ज्या काही व्यक्ती आलेल्या आहेत, त्या ह्या व्यक्तीला पार्श्वभूमी म्हणून, उठाव मिळावा म्हणून. रामाशेजारी दुसरी व्यक्ती सीता. सीतेला माहेर होते, सासर होते. तिचे माहेर नावापुरतेच माहेर. सासरच्या

व्यक्तींशी संबंध थोडे जास्ती दाखविले आहेत, पण त्यांतही सासरच्या व्यक्तींना पुरेसा उठाव मिळालेला नाही. सीता वनवासाला गेली; सीतेला गर्भारपणात रामाने टाकून दिली; सीतेला पृथ्वीने गिळली. हे सर्व सीतेला होत असता तिच्या माहेरची नाववार्तासुद्धा ऐकू येत नाही. जणू काही सीता म्हणजे अनाथाश्रमातून आणलेली मुलगी. जनकाच्या मोठेपणाचे वर्णन आहे, पण प्रत्यक्षात रामाला किंवा सीतेला त्याचा उपयोग झाला नाही. अगदी ह्याउलट द्रौपदीची कथा. द्रुपदाला शूर मुलगा हवा होता, म्हणून त्याने यज्ञ केला व त्या यज्ञातून त्याला एक मुलगा व मुलगी अशी चांगली जाणती मुले मिळाली. त्यांतील मुलगा धृष्टद्युम्न व मुलगी द्रौपदी. ती माहेरची किती लाडकी होती, ते नावावरूनही समजते. सीतेला स्वतःचे नाव 'सीता'. जनककुळाने स्वीकारली, म्हणून 'जानकी'. विदेहाची राजकन्या, म्हणून 'वैदेही'. द्रौपदी वर्णाने सावळी, पण ज्या यज्ञकुंडातून निघाली, त्यातील ज्वालेसारखी तेजस्वी. तिचे स्वतःचे नाव 'कृष्णा'. द्रुपदकुळातली, म्हणून 'द्रौपदी'. पांचालांची राजकन्या, म्हणून 'पांचाली'. यज्ञसेन द्रुपदाची मुलगी, म्हणून 'याज्ञसेनी'. सीतेच्या बापाचे तर नावच माहीत नाही. द्रौपदी आणि द्रौपदीचा भाऊ मोठेपणी यज्ञातून आली, त्यांना आपल्याबद्दल काहीच वाटावयाचे नाही, अशा भीतीने द्रुपदाची राणी पृषती[१] हिने अग्निदेवाची प्रार्थना केली की, 'देवा, ह्या मुलांना आपल्या खऱ्या जन्माचा विसर पडून मीच त्यांची आई आहे, असे वाटावे.' म्हणून द्रौपदीला 'पार्षती' असेही आईवरून आणखी एक नाव आहे. द्रुपदाला शूर मुलगा हवा

१. यज्ञसेन द्रुपदाच्या आजोबाचे (की पणजोबाचे ?) नाव 'पृषत' असे होते. म्हणून सर्व घराणे 'पार्षत'. म्हणजे द्रुपदाची बायको त्यांच्याच घराण्यातली होती. दशरथाची कौसल्याही अशीच त्याच्या घराण्यातली होती.

होता, त्याप्रमाणे मुलीच्या पणाच्या सौद्यात कुशल धनुर्धर जावई हवा होता. कृष्णेच्या माहेरामुळे पांडवांना प्रतिष्ठा मिळाली, दुर्योधनाशी लढावयाला सेना मिळाली व धृष्टद्युम्नासारखा सेनापतीही मिळाला.

महाभारतकथेत एका मोठ्या थोरल्या कुटुंबाचे तीन-तीन पिढ्यांचे नातेवाईक आले आहेत. बळेच अंधळेपण स्वीकारलेल्या गांधारीचा भाऊ जे धृतराष्ट्राला मिळाले नाही, ते दुर्योधनासाठी मिळवावयाला पाहत होता. मुलांच्या लहानपणी त्यांच्यावर जागता पहारा ठेवणारी कुंती, तिच्या माहेरची माणसे; अर्जुनाची सून उत्तरा व तिच्या माहेरची माणसे; आज्याच्या पिढीतली माणसे, भीष्म, शंतनू,— ही सर्व येऊन गेली आहेत. सक्खा-सावत्र, लहान-मोठे, जावा-जावा; भावंडे, चुलते-पुतणे — सर्व कौटुंबिक नाती व त्यांतील गुंतागुंतीचे संबंध, सर्व काही महाभारतात आहे. ह्यामुळे द्रौपदीचे चित्र अधिक भरीव व अनेकांगी झाले आहे. कौटुंबिक गुंतागुंतीच्या मागे त्या वेळची सर्व राजकीय गुंतागुंतही उभी केलेली आहे. यादव, कौरव, द्रुपद, विराट, मगधाचा जरासंध, शल्य, शाल्व ह्या व इतर अनेक राजघराण्यांचे एकमेकांशी आलेले संबंध व त्यांमुळे कौटुंबिक व वैयक्तिक संघर्षाला चढलेली धार, असे हे चित्र आहे. महाभारतातील लढाई हा कौटुंबिक व राजकीय सत्ता-स्पर्धेचा परिपाक आहे. ह्याच्या उलट रामायणामध्ये जनकाचा काय, किंवा केकयांचा काय, नुसता उल्लेख आलेला आहे. आणि ज्या रावणाशी लढाई झाली, तो रावण तर रामाच्या जगाच्या बाहेरचाच म्हणावयाला हरकत नाही. अगदी आधुनिक प्रणयकथेप्रमाणे दोन व्यक्तींचे व त्यांच्या अंतर्मनांचे चित्रण. ज्यामुळे त्या व्यक्तींची अंतर्मने घडली, त्या कौटुंबिक व सामाजिक शक्तींचे दर्शन जवळ-जवळ नाहीच. द्रौपदीच्या लग्नाच्या दिवसापर्यंत पांडव बापुडवाणे व अनाथ होते. एका दुष्ट कारस्थानातून

ते जिवानिशी कसेबसे बाहेर पडले होते. आपण जिवंत आहोत, हा सुगावाही शत्रूंना लागू नये, म्हणून लपत-छपत आज ह्या गावी, तर उद्या त्या गावी, असे हिंडत होते. द्रौपदीस्वयंवराला ते आले, तेही ब्राह्मणांच्या वेषाने, आपण कोण, हे इतरांना कळू न देण्याची खबरदारी घेऊन. द्रुपदांच्या राज्यामध्ये त्यांना द्रौपदीच मिळाली असे नव्हे, तर पराक्रमी, वैभवशाली मित्र, पाठिराखे मिळाले. बायकोचे माहेर द्रुपद व आईचे माहेर यादव यांच्या संयुक्त पाठबळाने त्यांना प्रकट होऊन बेधडकपणे हस्तिनापुराच्या राज्याचा वाटा मागता आला. द्रौपदीशी लग्न केल्यामुळे पांडवांना नुसती सुंदर बायकोच मिळाली असे नव्हे, तर प्रतिष्ठा मिळाली व राज्य मिळाले.

रामायणकथेतही पण जिंकणारा राजपुत्र ब्राह्मणांच्या मध्ये बसलेला दाखविला आहे; पण तो एक योगायोग होता, इतकेच. हा राजकुमार दशरथाचा मुलगा राम, हे सर्व सभेला माहीत होते. या लग्नाने प्रतिष्ठा मिळाली जानकीला. रामाला एक सुंदर व त्याच्यावर प्राणांपलीकडे प्रेम करणारी सहचरी मिळाली, यापलीकडे काही नाही. ज्या दृष्टीने रामायण लिहिले आहे, त्या दृष्टीने रामाला दुसऱ्या कशाची गरजही नव्हती.

द्रौपदी पांडवांची झाली. तिच्या माहेरी राहूनच पांडवांनी राज्याच्या भागाची वाटणी मागितली. पांडवांचे पारडे इतके जड झाले होते की, धृतराष्ट्राला ही मागणी डावलता येईना. इंद्रप्रस्थाला धर्माबरोबर द्रौपदीलाही अभिषेक झाला व ते राज्य द्रौपदीमुळे मिळाले, असे म्हटल्यास अतिशयोक्ती होणार नाही. द्रौपदी पांडवांची प्रतिष्ठा होती; त्यांच्या एकत्वाची, अभेद्यतेची चालती-बोलती खूण होती.

पांडव शूर होते, पण एकाला द्यूताचे व्यसन, एक आडदांड, एक लढाऊ पण राज्यावर मन नसलेला, धाकटे दोघे जुळे भाऊ,

वडील भाऊ करतील त्याला साथ देणारे असे होते. पांडवांनी स्वतंत्रपणे काही राजकारण केले नाही. त्यांचे राजकारण श्रीकृष्णाने केले व त्यांची जपणूक दोन बायांनी केली. पांडू मेला, माद्री सती गेली, व ही लहान-लहान पाच मुले घेऊन कुंती हस्तिनापुराला आली. त्या दिवसापासून त्यांचे लग्न झाले त्या दिवसापर्यंत कुंतीने रात्रंदिवस मुलांवर पहारा केला. पांडवांना गंगेच्या काठी लांबच्या गावाला पाठविले, तेव्हा कुंतीला राजधानीत राहता आले असते, पण ती त्यांच्याबरोबर गेली. लाक्षागृहातून सुटल्यावर त्यांच्याबरोबर राहिली. पांडवांचे आईवरचे प्रेम हेही एक कारण ह्या घटनेला देता येईल, पण तिचे जागृत मातृत्व हेच कारण ह्याच्या पाठीमागे मुख्यत्वे होते.

द्रौपदी पहिल्याने सासूकडे आली, तेव्हाचा प्रसंग विचार करण्यासारखा आहे. सासू म्हणाली, "काय आणलं आहे, ते पाचांनी वाटून घ्या." मग बघते, तो एक सुंदर मुलगी. ही कशी पाचांनी वाटून घ्यायची? धर्माने अर्जुनाला सांगितले, "बाबा, तू हिला जिंकलेस, तू हिच्याशी लग्न कर." अर्जुन म्हणाला, "तुम्ही व भीम वडील असता मी धाकट्या भावाने लग्न करण्याचे पाप कसे करू? तुम्हीच मोठेपणी हिच्याशी लग्न करा." कुंतीच्या मनात होते, ती सर्वांची व्हावी. ही गुंतागुंत सुटावी कशी?

थोरल्या भावाआधी लहानाने लग्न करणे हे काही फक्त शिष्टाचाराविरुद्ध होते असे नव्हे, तर खरोखरी असे करणे पाप आहे, अशी फार जुनी समजूत होती. वेदांमध्ये व ब्राह्मणग्रंथांतही ह्याला स्पष्ट पुरावा सापडतो. थोरल्याच्या बायकोवर खालच्या भावांचा अधिकार असे; पण उलट मात्र होऊ शकत नसे. धाकट्याने लग्न आधी केले, तर तो धाकटा व थोरला भाऊ, एवढेच नव्हे, तर अशा लग्नाला संमती देणारे आईबापही पापाचे धनी होत. पूर्वीच्या काळी थोरल्या

मुलाला वंशपरंपरा अधिकाराचा व द्रव्याचा वारसा मिळत असे. आईवडिलांचे श्राद्ध व गृहस्थपणाची सर्व कर्तव्ये बजावण्यासाठी त्याला लग्न आवश्यक असे. खालच्या भावाने लग्न करणे म्हणजे थोरल्याचे सामाजिक, कौटुंबिक व धार्मिक अधिकार हिरावून घेण्यासारखे होते, म्हणून थोरल्याआधी लग्न करणे पाप होते. द्रौपदीच्या बाबतीत तर अर्जुनाने एकट्यानेच तिच्याशी लग्न केले असते, तर वरच्या भावांना इतक्या तोलाच्या राजघराण्यातील मुलगी मिळणे जड झाले असते. अर्जुनाने जिंकलेल्या मुलीचे धर्माशी लग्न होणे शक्य होते. त्यांच्या आजोबांच्या पिढीत भीष्माने आपल्या भावांकरिता मुली जिंकून आणल्या होत्या. द्रौपदीबद्दल बोलणी होत होती, तेव्हा सर्व भावांच्या नजरा तिच्यावर खिळल्या होत्या, व सर्वांच्या मनात तिच्याबद्दल अभिलाषा उत्पन्न झाली होती, असे महाभारतकारांनीच एका श्लोकात सांगून टाकले आहे. ही गोष्ट कुंतीच्या नजरेतून निसटलेली नसणार. तिच्या शहाणपणाने व व्यासांच्या मखलाशीने सर्व पेच सुटून द्रौपदी पाचांची बायको झाली. एकाची झाली असती, तर जी कलहाची बीजे पेरली गेली असती, त्या सर्वांचा मुळातच नायनाट झाला व पांडवांची एकी अभेद्य राहिली. अगदी हीच गोष्ट कर्णाने दुर्योधनाला सांगितली. लाक्षागृहातून वाचून परत येऊन प्रकट झालेल्या पांडवांचे आता काय करावे, ह्या उहापोहात दुर्योधन म्हणाला, "कुंतीच्या मुलांना माद्रीच्या मुलांपासून फोडून वेगळे करावे, किंवा द्रुपदाला व त्याच्या मुलांना द्रव्याचा लोभ दाखवून पांडवांचा त्याग करायला लावावे किंवा त्यातल्या त्यात भीमाचा काटा काढावा." कर्णाने ह्या सर्व उपायांचा फोलपणा दाखविला : "इथे आपल्या राजधानीत पांडव अनाथ पोरे असताना जे साधले नाही, ते आता तर अशक्य आहे. आता त्यांना पक्षपाती मित्र आहेत, ते दुसऱ्या देशात आहेत. द्रुपद

आर्यवृत्त राजा आहे. धनाचा लोभी नाही. द्रुपदाच्या मुलाच्या बाबतीत म्हणशील, तर तो पांडवांचा भक्त आहे. द्रौपदी सर्वांची मिळून बायको झाली आहे. आता त्यांच्यात फूट पडणे कदापि शक्य नाही." आणि द्रौपदी जिवंत असेपर्यंत त्यांच्यात कधीही फूट पडली नाही. द्रौपदी मेल्यावर जी फूट पडली, ती शरिराची.

कुंतीने पांडवांचे जतन केले, ते त्यांच्या जिवाची काळजी घेऊन. द्रौपदीने त्यांना सर्वनाशापासून वाचविले. ह्या तिच्या कृत्याचा मोठेपणा महाभारतात परत कर्णाच्याच तोंडून वदविला आहे. धर्माने द्यूतामध्ये सर्वस्व गमावले. एवढेच नव्हे, तर आपल्या बायकोला पणाला लावली. कौरवांच्या सभेत होऊ नये, तशी तिची विटंबना झाली. त्या वेळी, झाला एवढा दुष्टावा पुरे, गोष्टी पुढे जाऊ दिल्या तर परिणाम बरा होणार नाही, या भीतीने धृतराष्ट्राने द्रौपदीला तीन वर मागायला सांगितले. एका वराने तिने धर्माला दास्यातून मुक्त केले. दुसऱ्या वराने इतर चौघांना मुक्त केले. "नवरे शस्त्रास्त्रांसह मुक्त झाले, एवढे मला पुरेसे आहे," असे म्हणून तिने तिसरा वर मागितलाच नाही. वर मागण्याची तिची तऱ्हा, अभिषिक्त राजा म्हणून धर्माला आधी मुक्त करण्याची तिची तत्परता, बाकीच्यांना शस्त्रांसह मुक्त करणे एवढेच मागून बाकी कशाचाही लोभ न धरणे, यांनी तिने आपल्यालाच नव्हे, तर पांडवांनाही अप्रतिष्ठेतून बाहेर काढले. या प्रसंगाला उद्देशून कर्ण जे म्हणाला, ते लक्षात घेण्यासारखे आहे. "जगात सुंदर बायकांच्या बाबतीत आत्तापर्यंत ऐकले होते. पण हिने जे केले, त्याला तोड नाही. इथे पांडव आणि कौरव रागाने जळत होते. ह्या आगीच्या डोंबात काय झाले असते, कोण जाणे! पण या कृष्णेने शांती प्रस्थापित केली. खोल समुद्रात गटंगळ्या खाणाऱ्या, अप्रतिष्ठेमध्ये बुडून गेलेल्या पांडवांना पांचालीने एखाद्या

नावेप्रमाणे तीराला आणून पोहोचविले." स्त्रीमुळे आपली प्रतिष्ठा वाचली, हे शब्द भीमाला झोंबले. पण पांडवांना राग यावा, हा जरी त्याचा एक उद्देश असला, तरी कर्ण म्हणाला, ते काही खोटे नव्हते. पांडवाचे लहानपणचे आयुष्य कुंतीने रक्षिले होते, मोठेपणचे द्रौपदीने. द्रौपदी उभी होती, तोपर्यंत पांडव उभे होते, – द्रौपदी खाली पडली, तेव्हा धर्माखेरीज इतरही पडले.

द्रौपदीचा आणि सीतेचा वनवास ह्या दोहोंत नावांखेरीज काही साम्य नाही. द्रौपदीला वनवास घडला, नवऱ्याच्या द्यूतावरील प्रेमामुळे. शत्रूच्या मसलतीचा जय, नवऱ्याची व्यसनाधीनता, ह्या सगळ्यांचे ते प्रतीक होते. पंचनद्यांचा प्रदेश शक्य झाल्यास मिळावा, अशा तऱ्हेचा धर्माचा डाव होता, असे एकदाच वनपर्वात आले आहे. हे बोलणे म्हणजे स्वतःच्या बचावार्थ दिलेली एक सबब ह्यापलीकडे काही वाटत नाही. द्यूताने कुरु-पांचालांच्या ताब्यात नसलेला पंचनद्यांचा प्रदेश तो कसा मिळविणार होता, हे कळतच नाही. सीतेचा वनवास हा रामाच्या ध्येयजीवनातील परमोच्च बिंदू होता. त्याच्या वनवासामुळे मुलाला राजपद देण्याचा कैकेयीचा डाव फसला. खुंटा हलवून घट्ट करावा, तशी रामाचा राज्याभिषेक ही गोष्ट अटळ झाली. भरताच्या राज्य-त्यागामुळे रामाला वनवासात राहण्याचे व्यावहारिक कारण उरलेच नव्हते. केवळ बापाने दिलेले एक वचन पुरे करण्यासाठी त्याने वनवास पत्करला. पांडवांचा वनवास मात्र अटळ होता. कौरवांच्या – शत्रूंच्या – राजधानीत, वडीलधाऱ्या माणसांसमोर उघड-उघड पण झाला होता, त्याप्रमाणे वागण्याखेरीज गत्यंतर नव्हते. वनवासाच्या आरंभी द्रुपदाचा मुलगा व कृष्ण पांडवांना भेटण्यास आले होते, तेव्हाही झालेल्या गोष्टींबद्दल हळहळ व्यक्त करण्याखेरीज त्यांना काही करता येत नव्हते. त्या वेळी युद्धाला उभे राहणे म्हणजे यशाला कायमचा डाग लागला

असता, व कदाचित मित्रही मिळाले नसते. सत्यप्रतिज्ञ राहणे हे वर्तन नुसते ध्येयपूर्णच नव्हे, तर शंभर टक्के व्यावहारिकही होते.

पांडवांना राज्य मिळण्याला जशी द्रौपदी थोडी-फार कारण झाली, त्याचप्रमाणे त्यांचे राज्य घालविण्यातही तिचा वाटा होता. त्यांचा वनवास तो तिचाही वनवास होता. केवळ त्यांची सावली म्हणून ती त्यांच्याबरोबर वनवासात गेली, असे नव्हे. नवऱ्यांचे वैभव व मोठेपणा भोगायचा तिचा अधिकार, तशीच त्यांच्या कष्टांची व अपमानाचीही तीच वाटेकरीण होती. पांडवांच्या इतर बायका आपल्या मुलांना घेऊन माहेरी गेल्या. द्रौपदीने फक्त आपली मुले माहेरी पाठविली. त्यांचे सर्व शिक्षण व्हावयाचे होते. त्यांना रानात बरोबर ठेवून चालणार नव्हते. ती किती यातना भोगीत होती, ह्याचे वर्णन अधून-मधून येते. झाले-गेले बिनबोलता भोगले, हा मुळी तिचा धर्मच नव्हता. तिने कडकड बोटे मोडली, शिव्याशाप दिले. ती संतापाने जळली. धृष्टद्युम्न व कृष्ण वनवासात भेटायला आले, तेव्हा अविरत वाहणारे अश्रू पुशीत-पुशीत त्वेषाने ती म्हणाली, "मला मुळी नवरे, मुलगे, भाऊ, बाप नाहीतच. असते, तर माझा असा अपमान त्यांनी सहन केला असता का?" एवढ्यावरच ती थांबली नाही. सर्व माणसे निघून गेल्यावर पुन्हा तोच विषय काढून कौरवांचे उट्टे फेडण्यास धर्मराजाचे मन वळविण्याचा तिने प्रयत्न केला. पण ते शक्य झाले नाही. बरे, वनवासात असल्यामुळे गृहिणीपदाच्या जबाबदाऱ्या कमी झाल्या म्हणावे, तर तेही नाही. धर्मराजाचा पुरोहित त्यांच्याचबरोबर होता. शेकडो लोक—बहुतेक ब्राह्मण—त्यांच्याकडे येऊन पाहुणचार घेऊन जात होते. द्रौपदी उठल्यापासून निजेपर्यंत काम करी, त्याचे वर्णन सत्यभामा-द्रौपदीसंवादात आले आहे.

वनवासातही थोरा-मोठ्या राजाची लेक, सून व बायको ही तिन्ही नाती तिला सुटली नाहीत. जी माणसे पाहुणचारासाठी येत, त्यांचे सेवाधर्माने करावयाचे, हा झाला ध्येयाचा भाग; पण अशा करण्यामध्ये परत राजकारण व व्यवहार होताच. धर्म करीत असलेली अनुष्ठाने व ब्राह्मणशुश्रूषा आज आपल्याला भाकड वाटली, तरी त्या वेळच्या सर्वांचा त्यांवर अगदी दृढतम विश्वास होता, आणि ही सर्व अंगे द्रौपदीला संभाळावी लागत. त्यांत कमी पडू देण्याची, दैन्य दाखवायची सोय नव्हती.

ह्या वनवासात राजवाड्यात मिळेल, तेवढाही एकांत नव्हता. तेवढे ऐश्वर्य नसूनही आल्या-गेल्यांची व आश्रितांची वर्दळ होतीच. त्याशिवाय येईल-जाईल, त्या ऋषीने सांगितलेल्या कंटाळवाण्या कथा ऐकाव्या लागत. ती सारखी कष्टी होती, ह्याचे पुरावे तर जागोजागी आहेत. कृष्णाने निरोप घेताना सांगितले, "बाई, ह्या सर्व अपमानाचे उट्टे निघेल बरे." सत्यभामेने मिठी मारून निरोप घेतला, "कृष्णे, रडू नकोस. ज्या तुला हसल्या, त्या कौरवस्त्रियांना तू रडताना पाहशील. अगदी निष्कंटक निर्वैर राज्याचा उपभोग घेशील. थोडे सहन कर." तिला तिळभराची उसंत नव्हती, हे एका अर्थाने बरेच होते. नाही तर कृष्णा द्यूताच्या दिवसाच्या आठवणी काढून-काढून झुरली असती.

सीतेच्या वनवासात कुठच्याही तऱ्हेचे वैर, शल्य काही नव्हते. एक तपावरचा काल प्रणयाच्या वर्षावाचा होता. अयोध्येला ती युवराज्ञी होणार होती; दासदासींचा गजबजाट होता; सासरा, तीन सासवा अशी वडील मंडळी होती. अनिर्बंध प्रणयाला मुळी वावच नव्हता. शहरवासियांची रानाबद्दल जी रम्य कल्पना असते, तसल्या स्वप्नसृष्टीतला हा वनवास होता. तिथे हरणे होती, हंस होते, गोदावरीचा रम्य प्रवाह होता, लांबवर पसरलेले वाळवंट होते.

ऋषींच्या तुरळक-तुरळक वसाहती होत्या. अधून-मधून गोड शहारे अंगावर येण्याइतपत क्रूर श्वापदे व राक्षस होते. अपमानाची शल्ये नव्हती. मुलांची ताटातूट नव्हती. पाहुण्यांची वर्दळ नव्हती. ह्या सुंदर पार्श्वभूमीवर एका मुग्धेचे प्रणयिनीत रूपांतर झाले. वाल्मीकीने आपली काव्यशक्ती ह्या कांडात ओतली आहे. हा काळ इतका रम्य होता की, पुढे सीतेला डोहाळे लागले, तेही वनात जाण्याचेच.

वनवास संपल्यावर द्रौपदीला अज्ञातवास फारच दुःखाचा गेला. रानात ती पांडवांची बायको, एका वेळची राणी अशी होती, पण ज्या दासीपणातून तिने द्यूताच्या वेळी स्वतःला मुक्त करून घेतले होते, तसले दासीपण तिला अज्ञातवासात आले, व जवळ-जवळ तसलीच विटंबना व्हावयाची वेळ आली होती. सीतेला दुःखात दिवस काढावे लागले, पण रावणाच्या बलात्काराचे तिला भय नव्हते. तिच्या भोवती राक्षसिणी होत्या, त्या अक्राळविक्राळ होत्या. त्या तिला म्हणत, "सीते, आम्ही तुला खाऊन टाकू." रावण संपन्न, विद्वान राजा होता. त्याच्या पदरी माणसे खाणाऱ्या राक्षसी असाव्या, हे विचित्रच. राम-रावणांचा संबंध अद्भुताचा. वानरे, अस्वले ही त्यांची सेना, — त्यातच राक्षस. सर्व कथाच अद्भुत, रम्य व लोकोत्तर. राम आदर्श पुरुष. सीता आदर्श स्त्री. राम पितृभक्त, सत्यपरायण, एकपत्नी. तो शूर होता, हे दाखविण्यासाठी लढाईची जरुरी होती. नायिकेवर संकटे यावी लागतात; त्यांतून नायकाला तिची सुटका करावयाची असते. धीरोदात्त नायक — साध्वी नायिका. प्रणयाचे सर्व प्रकार. प्रारंभीचा प्रणय, प्रौढेचा प्रणय, मग विरह, व विरही प्रेमाचे वर्णन, — सर्व कसे अगदी संस्कृताच्या 'काव्य'परंपरेत बसणारे! लढाईसुद्धा त्यातलीच. एवढी लढाई झाली, पण तिचा संबंध अयोध्येशी नाही. अयोध्या अलिप्त राहिली. रामाला राज्य देण्याच्या क्षणाची वाट

पाहत बसलेली. तो क्षण आला, तशी राज्य रामाला मिळाले. भाऊ भावांना भेटले. मुलगे आयांना भेटले. सून सासवांना भेटली. युद्धाची झळ अयोध्येला लागली नाही. ते फक्त कथेत राहिले.

द्रौपदीवरची संकटे मानवी, ह्या जगातल्या माणसांनी आणलेली व नवऱ्यांनी स्वतःवर ओढवून घेतलेल्या निष्क्रियतेमुळे आलेली. आदिपर्वात धृतराष्ट्राचे भाषण दिले आहे. त्यात व तिथपासून जवळ-जवळ प्रत्येक पर्वात द्रौपदीची विटंबना वर्णिताना दोन शब्द वारंवार येतात. 'नाथवती अनाथवत्'. पाचांची असून अनाथासारखी. माहेर श्रीमंत असून अनाथासारखी. शूर पाठिराखे असताना अनाथासारखी. तिच्या दैन्याची खरी जखम हीच आहे. तिची विटंबना दर वेळी तिचे नवरे व सासरे मुकाट्याने पाहत होते. काही प्रतिकार करणे त्यांना शक्य नव्हते. एका विटंबनेतून दैवी चमत्काराने ती वाचली; दुसरीतून भीमाने गुप्तपणे तिला सोडविली; वनपर्वात जयद्रथाने तिला पळविली. तो प्रकार मात्र काव्यतंत्राला थोडासा धरून होता. धर्म-भीमार्जुन घरी नव्हते, अशा वेळी ती पकडली गेली. त्यांनी पाठलाग करून तिला सोडविली. सीतेच्या बाबतीत मात्र काव्याचा आदर्श प्रत्येक वेळी पाळला गेला आहे. रानावनात तिघे हिंडत असताना सीतेला पळवून नेणे शक्य नव्हते. नुसता रामच नाही, तर एकटा लक्ष्मणसुद्धा तिचे संरक्षण करण्यास पुरेसा होता. दोघेही नव्हते, व तेही सीतेच्या हट्टामुळे दूर गेले असतानाच सीताहरण झाले. सीतेच्या हरणाचा दोष सीतेकडे, राम-लक्ष्मणांकडे नव्हे. सीतेच्या दुःखांचे स्वरूपच निराळे. तिच्यावर आपत्ती कोसळतात, पण त्यांचे निवारण होते. प्रत्येक आपत्तीतून ती, राम व त्यांची माणसे सुखरूप बाहेर पडतात. आपत्तीमुळे जास्तच थोर, जास्तच दैवी होऊन बाहेर पडतात. त्या आपत्तींची योजनाच मुळी त्यासाठी झालेली आहे.

द्रौपदीला दुखावणारी माणसे होती. जवळची माणसे होती. प्रत्येक प्रसंगाने दुःखात अपमानाची भर दोन्ही बाजूंनी पडत होती. द्वेषाग्नीला सारखे इंधन मिळत राहिले. युद्ध खरोखरीच्या युद्धासारखे झाले. जित व जेते दोघेही दुःखी झाले. द्रौपदीची कर्ती मुले गेली, माहेर धुऊन निघाले. दुर्योधनाने मरता-मरता म्हटल्याप्रमाणे धर्मराज व त्याच्याबरोबर ती ह्यांनी विधवांवर राज्य केले. पूर्वी हस्तिनापूरचे राजकुल वृद्ध राजपुरुष, अवखळ तरणेबांड राजपुत्र, लहान मुले, नातवंडे, आज्या, आया, सुना, मुली ह्यांनी गजबजलेले असायचे. धर्म राज्यावर आला, तेव्हा ते वैराण झालेले होते. मुलांची लग्ने झालेली नव्हती, म्हणून सती जाणाऱ्या सुना नव्हत्या. पण विधवा उत्तरा व तिचा एकुलता-एक बापामागून जन्मलेला मुलगा, एवढीच तरुण मंडळी होती. कुल पुरते निर्वैर झाले होते, पण राज्य जोडताना जोडलेली वैरे शमली नव्हती, हे आपल्याला महाभारतात दिसते. इंद्रप्रस्थ वसविताना खांडववन जाळले. त्या वेळी दुखावलेला तक्षक अर्जुनाचा सूड घेण्यासाठी टपून बसला होता. ते वैर अर्जुनावरती उगवता आले नाही, पण पांडवामागून परीक्षितावर – अर्जुनाच्या नातवावर – ते उगवले गेले. विजयाचा आनंद तर नाहीच, पण राख मात्र तोंडात भरून राहिली. श्रीकृष्णासारख्या युगपुरुषाचा जो जन्मभर आधार होता, तोही अगदी दुःसह रितीने गेला. कृष्णाचा व त्याच्या सबंध मातबर कुलाचा हृदयद्रावक अंत झाला. महाभारताचा शेवट एकट्या द्रौपदीच्या आयुष्याचा किंवा पांडवांच्या आयुष्याचा किंवा कुळाचाही नव्हता. हा युगान्त होता. ह्या युगान्ताची प्रत्येक यातना द्रौपदीने भोगली. मुले मारली गेली, तेव्हा ती शेवटचे रडली; तिने शेवटचा तळतळाट केला. त्यानंतर तिचे शब्द ऐकायला येत नाहीत.

द्रौपदीमुळे युद्ध झाले, अशी एक निराधार कल्पना कित्येकांच्या मनात आहे. महाभारतानंतर पुराणांतरी, विशेषतः जैन महाभारतात ही कल्पना विशेषेकरून दिसते. एका आचरट पुराणात तर असा श्लोक आहे की, "कृतयुगात रेणुका कृत्या, सत्ययुगात सीता कृत्या, द्वापरात द्रौपदी व कलियुगात घरोघर कृत्या आहेत." ज्या बायकांमुळे मोठी युद्धे झाली, किंवा रक्तपात झाला, त्यांची नावे ह्यात दिली आहेत. हैहयाने गाय व रेणुका दोघींना पळविले होते. परशुरामाने हैहयाशी युद्ध केले, ते हैहयांच्या दांडगाईबद्दल होते, जे जमदग्नीच्या हक्काचे होते, – गाय व रेणुका – ते हिसकावून घेतल्याबद्दल, केवळ रेणुकेवरून नव्हे. रावणाशी युद्ध झाले, ते केवळ सीतेमुळे. सीता परत मिळाली असती, तर युद्ध झाले नसते. राम-रावणांच्या युद्धाचे सीता हे एकमेव कारण होते. द्रौपदी युद्धाचे कारण, – निदान मुख्य कारण तर खासच नव्हती. ज्या दिवशी अंधळ्या धृतराष्ट्राला तो थोरला मुलगा असतानाहि वगळून पांडूला गादीवर बसविले, त्याच दिवशी युद्धाची बीजे पेरली गेली. अगदी ल्हानपणापासून धृतराष्ट्राच्या मुलांचे आणि पांडूच्या मुलांचे वैर होते. द्रौपदीचे लग्न होण्याआधीच पांडवांना नाहीतसे करण्याचे प्रयत्न झाले होते. उद्योगपर्वातील मसलतीवरूनही हीच गोष्ट प्रामुख्याने मनात ठसते. पांडव कौरवांजवळ आपला वाटा मागत होते. द्रौपदीच्या अपमानाची त्यात भाषा नव्हती. पाडवांनी आपला पुरेपूर वाटा मागितला असता, किंवा कौरवांना चिडविण्यासाठी, डिवचण्यासाठी अवास्तव मागणी केली असती, तरी पांडवांना अपमानाचा सूड उगवायचा होता; काही झाले, तरी लढाई करायची होती, असे म्हणता आले असते. पण धर्मादिकांची भाषणे वाचून तर खात्री पटते की, सर्व भाषा आहे युद्ध टाळून वाटा मिळवावयाची. जो भीम द्रौपदीसारखाच अपमानाने जळत असे, तोही सांगतो की,

" त्यांना म्हणावे, ' बाबांनो, सर्वनाश करून घेऊ नका. जे काय थोडेसे धर्म मागतो आहे, ते देऊन टाका.' " कृष्णालासुद्धा ह्या बोलण्याने हसू आले. " अरे, नेहमीचा भीमच ना तू ?" असे त्याला म्हणावे लागले. द्रौपदी काय-ती सांगत होती, " कृष्णा, माझे केस ज्याने ओढले, ज्यांचे पापी हात माझ्या केसांना लागले, त्यांची गय करू नका.', कुंतीने असाच निरोप धर्माला सांगितला, पण पांडवांनी व त्यांच्या वतीने कृष्णाने युद्ध टाळण्याची शिकस्त केली. केविलवाणेपणाने भीक मागावी, तशी पाच गावे मागितली, " सुईच्या अग्राखाली मावेल एवढीही भूमी मी देणार नाही," असे दुर्योधन म्हणाला, तेव्हा युद्ध करावेच लागले. युद्ध होता-होता जुनी उट्टी फेडली गेली. त्यातच द्रौपदाची उट्टी फेडली, फक्त भीमाने. कर्णार्जुनांचे वैर व स्पर्धा जुनी होती. त्यांच्या युद्धाला कोणी दुसरे निमित्त नव्हते. वडिलार्जित संपत्तीच्या वाटणीवरून एकत्र कुटुंबात जी भांडणे भारतात अतिप्राचीन कालापासून चालत आली, त्यातले हे एक मोठे भांडण झाले, द्रौपदीमुळे ते नव्हे. द्रौपदीला युद्ध हवे होते, पण पांडव पितृप्रधान भारतीय संस्कृतीचे सच्चे वारस होते; ते काही बायकोच्या इच्छेप्रमाणे झुलणारे नव्हते !

शिष्टाईच्या वेळी कर्णाला फोडण्यासाठी कृष्णाने त्याला राज्याची व द्रौपदीचीसुद्धा लालूच दाखवली. ह्या हीन सौद्याची वार्ताही द्रौपदीला नव्हती. महाभारताने कुठचीच भूमिका आदर्श रंगविलेली नाही. वास्तव चित्रणात प्रत्येकासंबंधी बऱ्यावाईट गोष्टी आल्या आहेत. द्रौपदीच्या मनात पाच पांडवांव्यतिरिक्त इतर कोणाबद्दल विचार आला असता, तर त्याचे दर्शन महाभारतात खात्रीने आले असते. कर्णाकडे तिने कधी ढुंकूनही पाहिले नव्हते. तिच्या स्वयंवराच्या वेळी कशामुळे ते कोण जाणे, – दुर्योधनाच्या प्रीतीमुळे असेल, – कर्णाने पण जिंकण्याचा

प्रयत्नसुद्धा केला नव्हता, असे संशोधित आवृत्तीवरून दिसते. सबंध महाभारतात तिचा व कर्णाचा संबंधच आलेला नाही. कर्णावर तिचे मन जडले, ही अती मागाहून आलेल्या जैन पुराणातील कथा आहे, महाभारतातील नव्हे. महाभारतातील द्रौपदी चडफडली, जळली, पण शेवटच्या क्षणापर्यंत पतिपरायण राहिली. तिच्या सबंध आयुष्यात आळ येण्यासारखी परिस्थिती कधी उत्पन्नच झाली नाही.

तशा तऱ्हेची परिस्थिती यावी व आळही यावा, हे सीतेचे खरेखुरे दुःख. महाभारतात जी रामकथा सांगितली आहे, ती राम अयोध्येला परत आला व सर्वजण एकमेकांना भेटून, राज्याभिषेक झाल्यावर सुखाने राहिले, रामाने पुष्कळ यज्ञ केले, एवढ्यावरच थांबते. सीतात्यागाची गोष्टच नाही. महाभारतातील ही व सावित्रीची, नळाची वगैरे गोष्टी द्रौपदीवर कोसळलेल्या आपत्तीच्या अनुषंगाने आलेल्या आहेत. सीतेवरची खरी आपत्ती नवऱ्याने तिला टाकली ही. ती खरोखर यावयास पाहिजे होती, पण आली नाही. त्यावरून मूळ रामायणात ही कथा नव्हतीच, असे वाटते. ते कसेही असो, सीतात्यागाचा प्रसंग खरा धरून चालले, तर सीतेला खरेखुरे दुःख शेवटी भोगावे लागले, असे दिसते. त्या दुःखाची तऱ्हाही थोडीशी संस्कृत काव्याच्या धर्तीची आहे. खोटा आळ येणे, त्याचे परिमार्जन होणे व शेवटी मीलन, अशी कथानकाची शाकुन्तलात दाखविल्याप्रमाणे बांधणी असावयाची. पण सीतात्यागाचा शेवट सीतेच्या आत्मनाशात झाला. लोकांची खात्री पटावी, असे दुसरे एखादे दिव्य करून तिला आनंदात राहता आले असते. पण तिने तसे केले नाही.–का? ह्या प्रश्नाची उत्तरे अनेक आहेत. त्यांत शिरण्याचे कारण नाही. पण ती नष्ट झाली, आणि तिच्या कृत्याचा चटका सर्व भारतीय माणसांना लागून राहिला. ही आपत्ती तिच्यावर ओढवून आणण्यात ग्रंथकर्त्याचा एक हेतू असावासे वाटते : रामायणकथाच

अशी आहे की, नायक सर्वांगीण उत्तम पुरुष होता, त्याचे वर्णन 'मर्यादापुरुषोत्तम' असे करावयाचे; नायक सर्व प्रसंगांतून तावून-सुलाखून निघालेला. पण अजून एक दिव्य राहिले होते. स्वतःचे प्रेम की प्रजेची इच्छा, असा झगडा उत्पन्न करून राजा म्हटला की प्रजेसाठी वाटेल तो 'स्वार्थ'त्याग करायची त्याची तयारी पाहिजे, आणि तशा तऱ्हेचा राजा राम होता, हे ह्या प्रसंगाने सिद्ध करावयाचे. पण दुर्दैवाने रामाने अंगिकारिलेला मार्ग उत्तम होता, हे निरपवाद ठरले नाही. 'स्वार्थ'त्याग म्हणजे एका निरपराध जीवावर अन्याय का? रामाला राज्य सोडता नसते का आले? सीतेचा त्याग ही गोष्ट कांही चांगली झाली नाही, असे कालिदास, भवभूती वगैरे महान कवींनाही वाटले. म्हणजे त्या एका प्रसंगाने रामाच्या यशाला गालबोट लागले. आणि जी सीता केवळ रामाची छाया होती, तिला स्वतंत्र व्यक्तिमत्त्व, स्वतंत्र दुःखे, अपमान व त्यांचे स्वतंत्रपणे निराकरण करण्याची संधी लाभली.

ह्या प्रसंगाला द्रौपदीच्या आयुष्यात तोड नाही. द्रौपदीची सर्व दुःखे व अपमान वास्तव व त्यांचे निराकरण व त्यात पडलेली भर ही सर्व व्यवहारच्या पायरीवरील, – ओढूनताणून आणलेली नव्हत, – काव्य रंगविण्यासाठी घातलेली नव्हत. सीता भूमिकन्या, कारण पृथ्वीतून निघालेली; पण द्रौपदी खरीखुरी भूमिकन्या, कारण तिचे पाय भूमीवर, तिचे हृदय संसारात, माहेरात, सासरी, राजवाड्यात असे होते. तिचा बाणेदारपणा, तिचा स्वार्थत्याग, तिची पतिपरायणता – सर्वच वर्तन ती ज्या देशात, ज्या काळात व ज्या कुळात जन्मली, वावरली, त्यांना योग्य असे होते. ती असामान्य होती; पण ही असामान्यता सामान्यांच्या मूल्यांतूनच जन्माला आलेली होती.

द्रौपदी आणि सीता या दोघींच्याहीकडून होऊ नयेत, त्या गोष्टी

घडल्या आणि त्यांचे प्रायश्चित्तही दोघींना भरपूर मिळाले. सीतेला संभाळायला भावाला सांगून राम हरणापाठीमागे गेला. रामाची हाक ऐकून सीतेने लक्ष्मणाला त्याच्या मदतीस जाण्यास सांगितले. लक्ष्मण तिला सोडून जाईना. तेव्हा अती वाईट संशय घेऊन ती त्याला बोलली. ह्याचा परिणाम म्हणजे रावण तिला पळवू शकला. कांचन-मृगाचा सबंध कटच तिला पळविण्यासाठी रचलेला. पाठीमागे गेले, तर शूर्पणखेला हसून तिची चेष्टा तिने केली होती, त्याचाही हा परिणाम म्हणता येईल. द्रौपदी दुर्योधनाला चारचौघांत हसली होती. पाणी तिथे कोरडी जमीन, जमीन तिथे पाणी, असे वाटून दुर्योधन मयाने बनवलेल्या अद्भुत राजवाड्यात फजीत झाला होता. सर्वांत जास्त अपमान झाला, तो द्रौपदीच्या असंस्कृत हसण्याचा!

कीचकवधानंतर द्रौपदीनेच त्याच्या वधाची बातमी मोठ्या दिमाखाने रक्षकांना सांगीतली. गुपचूप लोकांच्या दृष्टीआड बसून असायचे; ते सोडून ती कीचकाची प्रेतयात्रा पाहत उभी राहिली; त्याच्या भावांच्या दृष्टीस पडली, व त्यांनी तिला बांधून कीचकाबराबर जाळण्यासाठी स्मशानात चालविले. हा अनर्थ द्रौपदीने स्वतः आपल्यावर ओढवून घेतलेला होता, आणि तोही वागू नये तसे वागून. आपला शत्रू गेला, त्याच्या प्रेताकडे पाहून डोळ्यांचे पारणे फिटू दे, असे वाटणारी द्रौपदी भूमिकन्याच.

सुभद्रेवर व अर्जुनावर जळणारी द्रौपदीही अगदी मानवी. असले दुःख तर सीतेला भोगावेच लागले नाही. तो असामान्यपणा. द्रौपदीचे हे दुःख त्या जमान्यात फारच सामान्य,—पण एकत्र वागण्यात दाखविलेला संयम असामान्य. रोजच्या आयुष्यात द्रौपदीने सवतीमत्सर दाखविला, असे कुठेच दिसत नाही.

सगळ्यात द्रौपदीचे चुकले कुठे? धर्म द्यूतात हरला, त्या वेळी

एका क्षुद्र दासाकडून दुर्योधनाने तिला सभेत बोलावणे पाठविले. त्या वेळी द्रौपदीने त्याच्याबरोबर निरोप पाठविला, "जा, सभेत विचारून ये. माझा पण लावायच्या आधी धर्मराज स्वतः पण लावून दास झाले होते का नाही ते." दुर्योधनाने सांगितले, "सभेत ये, तुझ्या प्रश्नाचे उत्तर मिळेल." ती सभेत आली नाही. तेव्हा दुःशासनाने तिला ओढीत आणली. सभेत तिने रडत पण त्वेषाने तोच प्रश्न विचारला. त्या प्रश्नावर चर्वितचर्वण झाले. भीष्मालासुद्धा उत्तर देता आले नाही. कदाचित द्रौपदीच्या विरुद्ध गेले असते, म्हणून त्याने उत्तर द्यावयाचे टाळले असेल. कारण पांडवांची बाजू घेऊन त्याने कित्येकदा धृतराष्ट्राशी व दुर्योधनाशी भांडण केले होते. ह्या वेळी तो गप्प बसला, तो मिंधेपणाने नसून ह्या वादात शिरण्यात अर्थ नाही म्हणून, असेच वाटते. द्रौपदीचे म्हणणे होते की, एकदा धर्मराज दास झाला, स्वातंत्र्य गमावून बसला, म्हणजे ज्यावर त्याने स्वामित्व गाजवावे, असे काही राहिलेलेच नव्हते. कारण दास हा "'अ-स्व', स्वतःचे काही नसलेला," असा असतो. ह्या पायरीवर आलेल्या मनुष्याला पणाला लावायला काही उरलले नसते. मग तो मला पणाला लावणार कसा?" एका बाजूने हे बोलणे सयुक्तिक दिसले, तरी दासालासुद्धा बायको असते, व तो दास म्हणून त्याचा बायकोवरचा अधिकार नाहीसा झालेला नसतो, हेही खरे. एखाद्याचा दास म्हणून राहूनही दासाचा स्वतंत्र धनार्जन करण्याचा थोडासा हक्क फार प्राचीन काळापासून मान्य झालेला होता. मालकाचा दासावर हक्क व दासाचा बायकोवर हक्क, असा गुंतागुंतीचा प्रश्न होता.

द्रौपदीचा प्रश्नच वेडगळ होता – नव्हे, भयानक होता. त्याचे काहीही उत्तर आले असते, तरी तिला ते उपकारक ठरणारे नव्हते. "तुझ्या नवऱ्याचा तुझ्यावरचा हक्क नाहीसा होत नाही. तो दास

झाला, तरी तू त्याची बायको म्हणून तुझ्यावर त्याची सत्ता राहते. तो तुला पणाला लावू शकतो," असे भीष्म बोलला असता, तर तिचे दासीपण पक्के झाले असते. "दासपणामुळे तुझ्या नवऱ्याचा तुझ्यावरचा हक्क नाहीसा होत नाही," असे भीष्म बोलता, तर तिचे हाल कुत्रा खाता ना! द्रौपदी 'नाथवती अनाथवत्' अशी होती. तिची नाथवत्ताच मग नाहीशी झाली असती. म्हणजे ती सर्व बाजूंनी अनाथ झाली असती. पतीने टाकले, म्हणजे दीनपणे पितृगृही राहणाऱ्या स्त्रियांचा ऋग्वेदातही उल्लेख आहे [भार्यापत्त्यानुत्तेव ज्योक् पितृषु आस्ताम्]. पण जिने आपणहून नवऱ्याचे नवरेपण झिडकारले, अशी बाईच तेव्हा माहीत नव्हती. अशा बाईला मानाचे राहोच, पण दीनवाणे स्थानही माहेरी मिळणे शक्य नव्हते. ह्या प्रश्नाने तिने सर्वांना पेचात टाकले होते. भीष्माला मान खाली घालावी लागली. धर्मही शरमेने मेला. ह्या प्रश्नात पांडित्य नव्हतेच, पण पांडित्यापेक्षाही श्रेष्ठ असा शहाणपणा, प्रज्ञा नव्हतीच नव्हती. जे चालले होते, ते इतके हिडीस होते की, सासऱ्यांनी व दिरांनी भरलेल्या सभेमध्ये वधू म्हणून द्रौपदीने हंबरडा फोडला असता, तर गोष्टी या थराला कदाचित जात्या ना! स्वतःची सून भर सभेत ओढून आणीत असता प्रतिकार न करणे, पुरुषांच्या सभेत स्वतःच्या कुळातील वधूचा अपमान करणे ही कृत्ये मानव्याच्या व अलिखित सर्वमान्य नीतिनियमांच्या इतकी विरुद्ध होती की, त्या प्रसंगी कायदेबाजपणा हा अतिशहाणपणाच ठरता. शेवटी दुर्योधनाने सांगितले, "तुझ्या नवऱ्याला हा प्रश्न विचार. धर्मराजाच्या शहाणपणावर व न्यायबुद्धीवर आमचा इतका विश्वास आहे की, त्याने दिलेला निवाडा आम्ही मान्य करू."

द्रौपदीचा प्रश्न, दुर्योधनाचे हे मानभावी उत्तर ह्यांनी बिचाऱ्या धर्माचा जेवढा मर्मच्छेद झाला, तेवढा दुसऱ्या कशानेही झाला नसता.

प्रश्नाचे उत्तर देणे शक्यच नव्हते. द्रौपदीचे वस्त्र फेडले गेले व नवी वस्त्रे तिला मिळत गेली. महाभारताच्या संशोधित आवृत्तीत कृष्णाचा धावा नाही. जे होत होते, ते इतके वाईट होते की, विश्वातील शक्ती जागी होऊन तिने एका बाईचे रक्षण केले, असेच म्हणावे लागते. दुःशासन थकून, लाजून बाजूला झाला. सभागृह अशुभ, अपशकुनी आवाजांनी भरून राहिले. विदुर कळवळून उठला. अंधळ्या धृतराष्ट्राला म्हणाला, "ह्या दुष्कृत्याने भयंकर उत्पात होत आहेत. मध्ये पड, व कुळाला वाचव." धृतराष्ट्रही झाल्या प्रकाराने घाबरला. त्याने द्रौपदीला मोकळी करून वर दिले. तिने दोन वरांनी आपल्या नवऱ्यांची सुटका केली. पण शहाणपणाचा दिमाख दाखवून तिने जो प्रश्न विचारला, तो सभेत कोणालाच विशेष आवडला नाही. धर्मराजाला तर हे शल्य जन्मात विसरणे शक्य नव्हते. अरण्यात असतानाही धर्मापुढे आपले शहाणपण दाखविण्याचा तिने प्रयत्न केला. पण पांडित्यात धर्म तिच्यापुढे हार जाणे शक्य नव्हते. त्याने तिला गप्प बसविलेच. आपल्या आयुष्यात तिने लहान-मोठ्या चुका केल्या होत्या, त्या क्षम्य होत्या. पण भर सभेत पांडित्याचा आव आणून धर्माला तिने पेचात आणले होते, त्याचा अजाणता अपमान केला होता. अजाणताच,—कारण तिला ज्या वेळी घालून-पाडून बोलावयाचे होते, त्या वेळी ती सरळ-सरळ बोलायची. पण अजाणता अपमान म्हणून तो क्षम्य नव्हता. आधी सभेमध्ये तरुण वधूने बोलू नये, हे तिला समजायला पाहिजे होते. ते करून वर शहाण्यां-शहाण्यांना जे कळले नाही ते मला कळले, हा पंडिती थाट! ह्या दोन्ही गोष्टी धर्मराजाला झोंबल्या. त्यामुळे तिच्या यशात भर पडली नाही. पण ह्या सर्व प्रसंगाने तिच्या पार्थिवतेची, आडदांड निरागसतेची जाणीव होते. अरण्यपर्वात तिला 'पंडिता' हे विशेषण लाविलेले

आढळते. स्त्रियांनी पंडिता असावे, हे महाभारतकालीन क्षत्रियांना मोठेसे रुचत असावे असे दिसत नाही. गांधारी, कुंती पुत्रांना उपदेश करतात. त्या वृद्ध, केल्या-सवरल्या स्त्रिया होत्या. त्यांनी मुलांना चार गोष्टी सांगणे अपेक्षित होते. तरण्या-ताठ्या बाईने वडील माणसांपुढे शहाणपण दाखविणे हे अगदीच चुकले. आपल्या हातून चूक झाली, हे द्रौपदीला उमजलेच नसावेसे दिसते. राजाने त्या चुकीमुळे आपल्याला झालेली जखम तिला कधी उघडी करून दाखविली नाही. राजाने तिला जाणीव दिली, ती दुसऱ्याच एका जखमेची, व ती इतकी उघड होती की, इतर सर्वांनाच नव्हे, तर खुद्द प्रांजळ बुद्धीच्या द्रौपदीलाही ती पटावी.

यादवांच्या – विशेषतः श्रीकृष्णाच्या – अंतानंतर पृथ्वीवर राहणे पांडवांना शक्य नव्हते. सर्व आवरासावर करून पांडव शेवटच्या यात्रेला निघाले. अर्थात् द्रौपदीही त्यांच्याबरोबर होतीच. गंगेचे खोरे ओलांडले, हिमालयाचा प्रदेश ओलांडला, व एका निर्वृक्ष माळावर ती येऊन पोहोचली. इतस्ततः दगड पसरलेले होते. दुसरे काही नाही. महिने-न-महिने एकामागून एक सहा जणे चालली होती. एकाएकी द्रौपदी खाली पडली. भीम थांबला. त्याने वेड्यासारखा प्रश्न विचारला, "ही का बरे पडली ?"

इतके चालल्यावर तिने का पडू नये ? सहा जणे जिथे चालली होती, तिथपर्यंत सर्व जणे पोहोचणार, अशी भीमाची कल्पना होती का ?

"बघ रे, – ही पडली, रे!" भीम म्हणाला, "का बरे ती अशी पडली ?"

"भीमा, पुढे चल. ती पडली, कारण तिने सर्वांत जास्त प्रेम अर्जुनावर केले." धर्माने पुढे जाता-जाता मागे न पाहता उत्तर

दिले, व आयुष्यभर मनात बाळगिलेली खोल जखम उघडी करून दाखविली.

द्रौपदी पडली, तिच्या पाठोपाठ दहा-पाच पावलात इतर पडले. एकटा धर्म कुत्र्याबरोबर पुढे गेला.



द्रौपदी पडली खरी, पण कोसळून मरून पडली नाही. तिला भयंकर ग्लानी आली होती. पाऊल पुढे उचलेना. पडल्यावर तिने भीमाची व धर्माची प्रश्नोत्तरे ऐकली. हे महाप्रयाण होते. या प्रवासात कोणी कोणासाठी थांबायचे नसते. आयुष्याची संगत संपलेली होती, डोक्यावर हात ठेवून ती मरणाची वाट पाहत होती. पण तिला शुद्ध होती. धर्माच्या शब्दांनी विचारांची चक्रे फिरू लागली. वर्षानुवर्षे जगलेल्या आयुष्याचा चित्रपट शेवटच्या काही क्षणांत तिच्या डोळ्यांसमोर उभा राहिला.

धर्माच्या वाक्यातील जखम तिला जाणवली. धिक्कारही जाणवला. आयुष्यात प्रथमच मनापासून तिला राजाची कीव आली. पुष्कळदा, विशेषतः अरण्यवासात, तिने राजाच्या दैन्यावस्थेबद्दल हळहळ बोलून दाखविली होती. त्या हळहळीच्या शब्दांत काहीतरी नव्या वादाची सुरवात होती. दैन्याकडे बोट दाखवून राजाच्या लढाऊ वृत्ती जागृत करण्याचा तो प्रयत्न होता. एक प्रकारचे डिवचणेच होते ते. राजाने त्या प्रयत्नांना कधीही दाद दिली नव्हती. शक्य तितक्या सौम्य शब्दांनी तो तिचे बोलणे खोडून काढी. आज मात्र एका वाक्यात त्याच्या आयुष्यातील वेदनेला वाचा फुटली होती. कधीही शब्दाने न दुखावणाऱ्या राजाने तिच्या मरणाच्या क्षणी त्याच्या मताने तिच्या वर्तनातील उणीव दाखविली. राजाच्या वैफल्याची जाणीव होऊन

द्रौपदीला क्षणभर वाईट वाटले, पण क्षणभरच. राजाच्या धिक्काराची जाणीव होऊन ती चमकली, पण तेही क्षणभरच. ती मनात हसली. तिला स्वयंवराच्या दिवसाची आठवण झाली. अर्जुनाने पण जिंकल्यावर एकापाठोपाठ एक ह्याप्रमाणे पाच जणांशी तिचे लग्न लागले, तेव्हा आपल्याला काय वेदना झाल्या, हे राजाला कळले नसेल, असे थोडेच? आपण मन मारले. कृतीत तरी पाचांत कधीही भेदभाव केला नाही. मन कधीच पूर्ण मारता येत नाही. कृती समतोल ठेवता येते. पण मनातून पाचांवर अगदी मापून सारखे प्रेम करणे शक्य होते का? अर्जुनावर जास्त प्रेम केले, तर त्यात नवल काय?

मन क्षणभर थांबले....प्रेम केले, म्हणजे काय? जन्मभर त्याच्यासाठी झुरले हेच ना? पण माझ्या प्रेमाला कधी प्रतिसाद मिळाला होता का? उलूपी, चित्रांगदा, सुभद्रा – अर्जुनाने किती स्त्रियांवर प्रेम केले!....हे तरी खरे का? अर्जुनाने कोणा तरी स्त्रीला आपले हृदय दिले होते का? स्त्रियांनी अर्जुनावर प्रेम केले, पण अर्जुनाचे हृदय कृष्णाला दिलेले होते. अगदी पूर्वीपासून, इंद्रप्रस्थ वसविण्याच्या आधीपासून तिला माहीत होते की, अर्जुन आणि कृष्ण तास-न्-तास बोलत बसायचे. त्यांच्या बोलण्यात कधी एखादी नवीन कल्पना – शहर वसविण्याची – असेलही. पण ते बोलत ते मित्र ह्या नात्याने. एकमेकांचे हृद्गत एकमेकांना सांगण्यासाठी, एकमेकांचे शब्द ऐकण्यासाठी. अर्जुनाचे मन कोणीही बाई जिंकू शकली नाही. प्रेम असेच असते का? प्रेम नेहमी एकांगीच असते का? प्रतिसाद न मिळताही मी कुणासाठी तरी झुरावे, कोणीतरी माझ्यासाठी जीव टाकावा.... एकदम धक्का बसल्यासारखे मन थांबले. ज्याने जन्मभर द्रौपदीसाठी जीव टाकला, त्याच्या प्रेमाची जाणीव वीज लखलखावी, तशी अंतःकरणात घुसली. द्रौपदीने नव्या जाणिवेचा निःश्वास टाकला.

निराळीच चित्रे डोळ्यांपुढे आली. स्वयंवरमंडपाच्या बाहेर अर्जुनाच्या बरोबरीने शत्रूंशी लढाई करणारा भीम, सभेमध्ये द्रौपदीला आणली, तेव्हा थोरल्या भावाचे हात जाळायला निघालेला भीम, संताप आवरेनासा झाल्यामुळे अर्जुनाने हात धरून ठेवलेला भीम, द्रौपदी दमली की कळवळणारा भीम, द्रौपदीसाठी सुवासिक कमळे आणायला धावलेला भीम, दुःशासनाचे रक्त पिणारा भीम, रक्ताने माखलेल्या हातांनी द्रौपदीची वेणी घालणारा भीम, कीचकाचा वध करणे अर्जुनालाही शक्य होते, पण ते काम करणारा भीमच. एक-ना-दोन – किती गोष्टी आठवाव्या? खादाड भीम, दांडगा भीम, संतापी भीम, धृतराष्ट्राला आणि गांधारीला सारा वेळ घालून-पाडून बोलणारा भीम. द्रौपदी ज्या अर्थाने पार्थिव होती, त्या अर्थाने तोही पार्थिव होता. ती भूमिकन्या होती, तसा तो भूमिपुत्र होता....

द्रौपदीला काहीतरी फरपटल्याचा, मोठ्याने श्वासोच्छ्वास घेतल्याचा आवाज आला. तिचे सर्वांग भीतीने शहारले. ती स्वस्थपणे मरणाची वाट पाहत होती. – कोठचे क्रूर जनावर येत असेल बरे? तरस का? इतके दिवस चालताना ह्या माळावर जनावरे दिसली नव्हती. अंगाचे लचके न तोडता ते जनावर नरडीचा घोट एकदम घेईल, तर बरे. तिने डोळे घट्ट मिटले. नवे अनामिक संकट कोसळण्याच्या क्षणाची वाट पाहताना एकदम तिच्या डोळ्यांवर छाया आली. सूर्यामध्ये नि तिच्यामध्ये काहीतरी पडदा आला होता. मंद खोल आवाजात हाक आली, "द्रौपदी!" तो भीमाचा आवाज होता. द्रौपदीने आश्चर्याने पण कष्टाने हात बाजूला केले व डोळे उघडले. भीम तिच्या तोंडावर आपल्या शरिराची सावली करून होता. तोच फरपटत, धापा टाकीत, कष्टाने मधली दहा-पंधरा पावले ओलांडून तिच्यापर्यंत आला होता. वाटेत अर्जुन, नकुल, सहदेव मेलेले दिसले,

तेव्हा द्रौपदीही त्याच अवस्थेत दिसणार, असे त्याला वाटले होते. पण डोळे मिटून स्वस्थ पडलेली द्रौपदी त्याच्या येण्याने घाबरली, — शहारली. ही तिच्या जिवंतपणाची निशाणी त्याने आपल्या डोळ्यांनी टिपली. "काय करू तुझ्यासाठी?" त्याने अडखळत विचारले. नेहमीचाच आयुष्यभर विचारलेला, पण ह्या परिस्थितीत अगदी निरर्थक, गैरवाजवी प्रश्न होता तो. द्रौपदी प्रसन्न हसली. भीमाचे तोंड आपल्या तोंडाजवळ आणून आपल्या शेवटच्या श्वासाने ती म्हणाली, "पुढल्या जन्मी पाचांतला थोरला भाऊ हो, भीमा! तुझ्या आसऱ्याखाली आम्ही सारी निर्भयपणे आनंदात राहू."

ऑक्टोबर, १९६३

सहा

## मयसभा

कांही वास्तू मोठ्या थाटात सुरू होऊन अपशकुनी व दुर्दैवी ठरतात. आतून उद्ध्वस्त झालेला, फुटलेल्या बुरुजातून आतले मातीचे भरताड दाखवीत असलेला शनिवारवाडा हे माझ्या डोळ्यांसमोरचे सर्वांत अर्वाचीन उदाहरण आहे. वाडा बांधणाऱ्याला व त्याच्या मागाहून येणाऱ्या कर्त्या पुरुषांना त्या वाड्यात सुख लाभले नाही व मूळ वास्तूही हीन-दीन अवस्थेत कशीबशी तग धरून आहे. पण ह्या वाड्यात निदान पाच पिढ्या नांदल्या. ह्याहीपेक्षा वैभवशाली, अपशकुनी व क्षणभंगुर वास्तू आज महाभारत वाचताना डोळ्यांपुढे उभी राहते आहे. ती म्हणजे इन्द्रप्रस्थ किंवा खांडवप्रस्थ नगरातील मयसभा व खुद्द ते नगरही. पांडवांनी आपल्या संपत्तीचे नेत्रदीपक पण हृदयदाहक प्रदर्शन ह्या सभेत केले. ते प्रदर्शन क्षणभंगुरच ठरले. सभा बांधल्यावर पांडव तेरा-चौदा वर्षेही इन्द्रप्रस्थाला राहिले

नाहीत. क्रौर्यात मयसभेचा जन्म झाला, फाशांच्या उन्मादात तिचा अंत झाला.

महाभारतात मयसभेच्या जन्माची कथा सांगितलेली आहे ती अशी : द्रौपदीच्या लग्नानंतर पांडवांचे पारडे एकदम जड झाले. पांडवांना मारायचा घाट घातला होता, पण तो फुकट जाऊन ते नव्या जोमाने प्रकट झाले. अशा वेळी त्यांना राज्याचा वाटा देणे धृतराष्ट्राला भाग पडले. त्याने धर्माला बोलावून त्याला एक वाटा दिला व खांडवप्रस्थाला जाऊन रहा, म्हणून सांगितले. वंशपरंपरा आलेली कुरूंची राजधानी धर्माला मिळाली नाही. राज्याच्या एका सीमेवर मोठ्या अरण्याशेजारी वसलेले एक गाव त्याच्या वाट्याच्या हिश्श्यात त्याला मिळाले. तोवर खांडवप्रस्थाचे नावही महाभारतात आलेले नाही. खांडवप्रस्थाला गेल्यावर धर्माने त्या लहानशा गावाचे राजधानीत रूपांतर करावयास आरंभ केला. निरनिराळे उद्योगधंदे करणारे लोक येऊन तेथे स्थायिक झाले. श्रीमंत व्यापारी तेथे येऊन राहिले. धर्माने निरनिराळ्या हरहुन्नरी लोकांना आग्रहाने आणून वसविले. धर्माने खांडवप्रस्थाचे राजधानीत रूपांतर केले. पण ही राजधानी नवीनच, म्हणून हस्तिनापूरच्या मानाने लहानच असणार. ह्या खांडवप्रस्थाचेच ‘इन्द्रप्रस्थ’ असेही दुसरे नाव वारंवार येते. तेथेच नारदाने घालून दिलेल्या नियमाचा भंग झाल्यामुळे अर्जुनाला वनवासास जावे लागले. वनवासात असतानाच त्याचे सुभद्रेशी लग्न झाले. वनवास संपवून तो इन्द्रप्रस्थाला परत आला, व यादव हे सुभद्रा आणि खूप संपत्ती, दास-दासी, रथघोडे वगैरे आंदण बरोबर घेऊन मोठ्या लवाजम्यानिशी मागोमाग आले. राजधानीत कित्येक दिवस मोठा उत्सव झाला. दिवस उन्हाळ्याचे होते. अशा वेळी अर्जुनाने मनात आणले की, वनविहाराला जावे. एका दिवसाचा वनभोजनाचा

बेत झाला. धर्माची परवानगी घेऊन वडील मंडळींना न घेता कृष्णार्जुन वनविहाराला गेले. त्यांच्या बायका व दासदासी ह्यांखेरीज इतर मंडळी नव्हती. सर्वांनी खूप खाल्ले, खूप दारू प्याली. बायका कोणी नाचत होत्या, कोणी गात होत्या. वृक्षांच्या दाट सावलीने ऊन मुळीच भासले नाही. कृष्णार्जुनांनी एकत्र बसून पुष्कळ गप्पा मारल्या. एकमेकांना युद्धातील व प्रेमातील पराक्रम [ विक्रान्तानि रतानि च ] ऐकविले. ते असे बसले असताना एक ब्राह्मण त्यांच्याकडे आला व म्हणाला, "मी भुकेला आहे. मी खूप खाणारा आहे. नेहमी अमाप खातो. माझी तृप्ती करा." त्यांनी त्याला अन्न देऊ केले असता त्याने आपले अग्निरूप प्रकट करून सांगितले, "मला आतील सर्व प्राण्यांसकट खांडववन खाण्यास द्या. ते मला जाळू द्या. जेव्हा-जेव्हा मी ते जाळण्याचा प्रयत्न करतो, तेव्हा-तेव्हा इन्द्र पाऊस पाडून माझा प्रयत्न हाणून पाडतो." कृष्णार्जुनांनी हे काम पार पाडण्याचे कबूल केले, पण अशी अट घातली की, उत्तम रथ व शस्त्रे अग्नीने पुरवावी. एक दिव्य रथ, पांढरे शुभ्र व वायुवेगाने धावणारे घोडे व गांडीव धनुष्य अग्नीने अर्जुनाला दिले, आणि कृष्णाला चक्र व इतर आयुधे दिली. अरण्य जळत असताना दोघांनी रथात दोन बाजूंकडून एवढा कडेकोट बंदोबस्त ठेविला की, आगीने भिऊन पळणाऱ्या प्राण्यांना निसटून जाण्यास छिद्रच सापडेना. भोवती रथ पिटाळून त्यांनी भयंकर संहार केला. ज्यांना आत पिटाळले, ते प्राणी होरपळून मेले. जे बाहेर आले, ते ह्या दोघांच्या शस्त्रांना बळी पडले. नागराज तक्षक कुरुक्षेत्राला गेला होता, म्हणून वाचला. त्याचा मुलगा मोठ्या युक्तीने स्वतःचा प्राण देऊन आईने वाचविला. तक्षकाच्या आसऱ्याने तक्षकाच्या घरी राहणारा 'मय' नावाचा असुर 'अर्जुना धाव,' अशी हाक मारीत

आला. त्याला अर्जुनाने जीवदान दिले व एका ब्राह्मणाची शार्ङ्गी नावाच्या पक्षिणीपासून (?) झालेली मुले वाचविली. तक्षकाच्या घराण्यातील तेथे असलेले 'नाग' व इतर पशुपक्षी सर्व मारले गेले. इंद्र व देव अरण्याचे रक्षण करावयास धावले, तेव्हा कृष्णार्जुनांनी त्यांचा पराभव करून त्यांना हाकलून लाविले. "तुझा मित्र तक्षक वाचला आहे," असे सांगून देवांनी इंद्राला निकराचे युद्ध करू दिले नाही. रान आठवडाभर जळत होते, व सारा वेळ अर्जुन आणि कृष्ण भोवती हिंडून प्राण्यांचा संहार करीत होते. आतील यच्चयावत् प्राण्यांचे मांस व चरबी खाऊन अग्नी तृप्त झाला व दोघां वीरांचा निरोप घेऊन निघून गेला. प्राण वाचविले, त्याची परतफेड म्हणून नाना देशांतून साहित्य आणून मयाने इन्द्रप्रस्थ राजधानीत मयसभा बांधली. ही सभा बांधल्यावर धर्माच्या भावांनी चारी दिशांस जाऊन सर्व राजांना जिंकले, आणि मग धर्माने राजसूय यज्ञ केला. हस्तिनापूरच्या नातेवाइकांनाही मोठ्या आग्रहाने यज्ञाचे निमंत्रण दिले. त्या वेळच्या सर्व राजांसमोर पांडवांच्या वैभवाचे व विक्रमाचे प्रदर्शन झाले, पण सर्वांत दाहक प्रदर्शन झाले ते चुलतभावांपुढे. मयसभा अशी बांधली होती की, पाणी आहे तेथे साधी जमीन वाटावी, व जमीन आहे तेथे पाण्याचा प्रवाह वाहतोसे वाटावे. दार म्हणून पलीकडे जायला पहावे, तो डोके भिंतीवर आपटावे. रत्नांचे पशुपक्षी, झाडे इतकी सुंदर बनविली होती की, खऱ्याचा भास व्हावा. दुर्योधन पाय घसरून भिजला, त्याचे डोके भिंतीवर आपटले, व पांडव आणि द्रौपदी त्याची ही फजिती पाहून खदखदा हसली. पांडवांनी नुसते आपले वैभवच दाखविले असे नाही, तर जाणून-बुजून दुर्योधनाचा सर्वांदेखत अपमानही केला.

लौकरच फासे उलटे पडले. पांडव सर्वस्व हरले व तेरा वर्षे वनात

गेले. परत येऊन युद्ध जिंकल्यावर ते वाडवडिलांपासून आलेल्या हस्तिनापुरात राहिले; इन्द्रप्रस्थाला गेले नाहीत. यादव-वंशाचा नाश झाल्यावर ज्या उरल्या-सुरलेल्यांना घेऊन अर्जुन आला, त्यांत कृष्णाचा नातू वज्र होता. पांडव महाप्रस्थानाला गेले, तेव्हा परीक्षिताला हस्तिनापूर देऊन वज्राला इन्द्रप्रस्थाचे राज्य दिले. परत इन्द्रप्रस्थाचे नाव ऐकू येत नाही, व मयसभेचे वर्णन एकदा सभापर्वात येऊन गेल्यावर परत तिचा उल्लेखही नाही.

ही झाली खांडव जाळण्याची कथा. तीत विचार करावयाला लावण्यासारख्या अनेक गोष्टी आहेत. एवढे मोठे वन का जाळले? आतील सर्व प्राणी, नाग, पक्षी वगैरे निःशेष का मारले? स्वतःला 'बीभत्सु'[१] म्हणविणाऱ्या अर्जुनाने ही क्रूर शिकार का केली?

यमुनेच्या काठी मजेत वनविहार करावयास गेले असताना अरण्य जाळण्याची कल्पना निघालीच का? महाभारतात म्हटले आहे की, अग्नी ब्राह्मणाचे रूप घेऊन आला, आणि त्याने खाद्य मागितले. ब्राह्मणाला 'नाही' कसे म्हणावयाचे, म्हणून ह्या वीरांनी खांडव जाळले. जाळले ते कसे? तर दोघांनी दोन बाजूंनी रथ व धनुष्यबाण असे चालविले की, एकाही प्राण्याला बाहेर निघता येऊ नये. नुसती झाडेच जाळली नाहीत, तर रानातला प्रत्येक प्राणी टिपून मारून किंवा मागे हाकून रानात जाळला. तूप खाऊन कंटाळलेल्या अग्नीने रुचिपालट म्हणून रानातली जनावरे खाण्यास मागितलीं व अशा प्रकारे कृष्णार्जुनांनी ती दिली. ह्या कथेत दोन पर्याय संभवतात :

१. 'बीभत्सु' ह्याचा अर्थ अतिशय क्रूर कर्म करणारा असा आहे. अर्जुन स्वतः असे सांगतो की, "मी लढत असताना कधीही बीभत्स कृत्य करीत नाही, म्हणून मला 'बीभत्सु' हे नाव पडलेले आहे." अर्जुनाने आपल्या स्वतःच्या सहा नावांचे स्पष्टीकरण केले, त्या वेळचा विराटपर्वातील हा प्रसंग आहे. (४.३९.१६.)

पहिला, कृष्णार्जुनांनी खांडव जाळले नाही, ते आपसूख जळाले, व त्याचा मोठेपणा कृष्णार्जुनाला दिला गेला. दुसरा, खरोखरच कृष्णार्जुनांनी वन जाळले. पहिला पर्याय खरा धरला, तरी एवढे मोठे रान प्राण्यांसकट जाळणे हे मोठे शौर्याचे व यशोदायी कृत्य समजले गेले असले पाहिजे, हे तर निर्विवादच. महाभारतात म्हटल्याप्रमाणे खरोखरच त्यांनी खपून – पाऊस पडला तरीही पुन्हा-पुन्हा आग लावून – हे वन जाळले, असे गृहीत करण्यास काही प्रत्यवाय दिसत नाही. पण ते का जाळले ?

गुरे-ढोरे बाळगणाऱ्या, नांगराने शेती करणाऱ्या 'आर्य'-जमातींच्या इतिहासात वन जाळण्याची वा कापण्याची घटना आढळते. सबंध उत्तर हिंदुस्थानात दाट अरण्ये होती. त्यांचे वर्णन वेदांत येते; महाभारतात येते. काही प्रसिद्ध वनांचे वर्णन बौद्धवाङ्मयातही येते. एवढेच काय, पण ऐतिहासिक काळातील शिलालेखांत ते येते. महाभारतातली राज्ये फार लहान होती. आजचा पंजाब व दिल्लीच्या भोवतालचा भाग एवढ्या प्रदेशात कुरु, दक्षिण व उत्तर पांचाल, त्रिगर्त, मत्स्य एवढी राज्ये होती. ती एकमेकांना लागून नव्हती. एक राजधानी, भोवती शेती असलेली खेडी व त्यांभोवती अरण्ये असे राज्याचे रूप होते. काम्यकवन, द्वैतवन, खांडववन अशा कितीतरी वनांची वर्णने येतात. महाभारतानंतर बौद्धकालात – सुमारे पाच-सहाशे वर्षांनी – पश्चिमेकडच्या वनांची वर्णने येत नाहीत. पण पूर्वेकडे वेळूवन, जेतवन वगैरे लहान-लहान वनांची नावे व वर्णने येतात. हजार-दोन-हजार वर्षांत जवळ-जवळ सर्व राने नाहीतशी होऊन सिंधूपासून गंगासागरापर्यंत एक सपाट शेत झाले आहे. विलायतेतही मोठाली अरण्ये होती. ती जाऊन त्यांच्या जागी शेते झाली. जेव्हा विलायतेतील लोक दक्षिण व उत्तर अमेरिकेत

गेले, तेव्हा त्यांनी राने तोडली वा जाळली, व सपाट मैदान करून शेती केली. धर्म खांडवप्रस्थाला आला, तेव्हा त्याने आपल्या नव्या राजधानीत वाणी वगैरे लोक आणून वसविले. प्रत्येक राजधानीच्या भोवती शेते असत व शेताच्या पलीकडे राने पसरलेली असत. तशाच तऱ्हेचे पांडवांचे राज्य होते. खांडववनाशेजारी 'इक्षुमती' ही लहान नदी व शेजारी यमुना नदी. खांडववनाचे नावही लक्षात ठेवण्यासारखे आहे. 'खाण्डव' हा शब्द 'खण्डु'-शब्दापासून बनलेला. 'खण्डु' म्हणजे जाड खडीसाखरेसारखी साखर, काहीतरी गोड पदार्थ, एवढे खरे. शेजारी 'इक्षुमती' नदी. इक्षू म्हणजे ऊस. 'इक्षुमती' हेसुद्धा नाव काहीतरी गोड पदार्थ नदीकाठी होता, असे दाखविते. कृष्णाच्या बाळलीला जेथे वर्णन केल्या आहेत, त्याचे नावही 'मधुवन' होते. तेही यमुनेशेजारचेच. 'इक्षुमती', 'खाण्डव', व 'मधुवन' ह्या शब्दांनी असे वाटते की, ह्या वनात काहीतरी गोड पदार्थ उत्पन्न होत होता. तो मध का? कदाचित असेलही. हली मध्यभारतातील रानातून एक रम्य, विशाल वृक्ष आढळतो. त्याला 'मोह' किंवा 'महुवा' म्हणतात. ह्याचे संस्कृत नाव 'मधुक' असे आहे. मोहाचे झाड हे वन्य लोकांची एक कामधेनूच असते. झाडाची पाने पत्रावळीसाठी वापरतात. गोड सुवासिक मधाने भरलेल्या फुलांपासून दारू करतात. फुले वाळवून खातात. आतील चिकट रसात वळलेले लाह्याचे लाडू मधुर असतात. कदाचित खांडववन अशा तऱ्हेच्या वृक्षांनी भरलेले, म्हणूनही त्याला 'गोड' असे नाव असेल. पण त्याची गोडी, त्याची पारख, तेथल्या सुंदर विशाल मधुर वृक्षाची खरी किंमत आत राहणाऱ्या आर्येतर लोकांना; आर्यांना नव्हती. वाणी व हरहुन्नरी नागर लोक राजधानीत असत, तर शेतकरी राजधानीच्या बाहेर गावांतून असत. रान जाळणे, किंवा तोडणे व

शेतकऱ्यांना ते वसाहतीला देणे हे राजाच्या कर्तव्यांपैकीच एक होते. तेच कृष्णार्जुनांनी केले. पण हे वन जाळण्यास मोठा विरोध होता, असे दिसते. हा विरोध कोणाचा? एकंदर वर्णनावरून असे दिसते की, खांडववन म्हणजे काही निर्मनुष्य अरण्य नव्हते. कोणाचीच मालकी नाही, अशी भूमी नव्हती. तेथे 'तक्षक' नावाच्या नागाचा परिवार होता. त्याच्याच घरी 'मय' नावाचा मोठा कारागीर राहत होता. शार्ङ्गी नावाची पक्षिकुलाचे नाव असलेली व एका ब्राह्मणाशी लग्न झालेली बाई तेथे राहत होती. ह्या नाव असलेल्या व्यक्तींखेरीजही इतर खूपच व्यक्ती होत्या. त्यांची नावे सर्पांची, पक्ष्यांची अशी होती. त्याशिवाय पशूही होते. हे खरोखर पशू होते, का पशुकुलाचे नाव असलेली (उदाहरणार्थ : लांडगे, वाघ, मोरे वगैरे) माणसे होती, हे कळणे शक्य नाही. रान जाळताना त्या सर्वांना कृष्णार्जुनांनी मारले. वर सांगितल्याखेरीज इतर कोणालाही जिवंत सोडले नाही. परत प्रश्न मनात येतो, 'हा संहार का?' रान जाळून जमीन वहितीला द्यावयाची असेल, तर त्या जमिनीला कोणी मालक असता कामा नये, म्हणून त्या भूमीत वंशपरंपरा राहणाऱ्या सर्वांचा संहार करावा लागला, असे तर नव्हे? अरण्यात वंशपरंपरा दीर्घकाळ राहणारे लोक मुख्यत्वे 'नाग' नावाचे होते. महाभारतकथेत आलेले 'शेष', 'वासुकी', 'धृतराष्ट्र', 'ऐरावत', 'एलापत्र, 'तक्षक' व 'कर्कोटक' हे निरनिराळ्या नागकुलांचे मुख्य होते, व त्यांना नागराज असे विशेषण दिलेले आढळते. आर्य ज्या भूमीत पहिल्याने आले (पंचनद्यांचा प्रदेश), तोच ह्या नागकुलांचा प्रदेश होता. मात्र नाग नदीकाठाने अरण्यात राहत असत, तर आर्य उघड्या माळावरती वसती पसंत करीत. वासुकी भोगावतीकाठी होता. ऐरावत इरावतीकाठी होता. तक्षक यमुनेकाठी कुरुक्षेत्राजवळ होता. एलापत्र हे ऐरावत शब्दाचेच

प्राकृत रूप आहे. ज्या ठिकाणी नाग राहत, ते त्यांच्या मालकीचेच होते. आर्य-राजाला आपल्या प्रजेसाठी रान जाळून शेतजमीन द्यावयाची, तर आधीच्या मालकाला नष्ट करण्याची कोशीस करावी लागे का? दुसरा विचार मनात येतो की, रानातली माणसे व जनावरे ही सर्वच शिकारीला योग्य, अशी कृष्णार्जुनांची भूमिका होती का? कृष्णार्जुनांनी केलेल्या प्राणिसंहाराचे रसभरित वर्णन ह्या तर्काला जुळते आहे.

क्षत्रियाचे ब्रीद शरणागताचे रक्षण, क्षत्रियाचे ब्रीद बरोबरीच्यांशी युद्ध, क्षत्रियाचे ब्रीद निरुपक्रोश, (=कोणाचा तळतळाट न घेणे). हे सर्व ह्या संहाराच्या प्रसंगी कोठे नाहीसे झाले होते? शरणागताचे रक्षण, बरोबरीच्यांशी युद्ध, निरुपक्रोश हे सर्व नियम स्वतःच्या समाजापुरते होते. आपल्या समाजाबाहेरचा जो असेल, त्याला अशी मूल्ये लावावयाची नाहीत, असा ह्या कृतीच्या मुळाशी दंडक असणार. परत एकदा ऐतिहासिक घटनांची आठवण होते. जी आपल्या समाजातील नव्हेत, अशा माणसांचा क्रूर संहार तैमूरलंग, चेंगीझखान ह्यांनी नाही का केला? एकोणिसाव्या शतकात जनावरांची करावी तशी शिकार गोऱ्या लोकांनी टॅस्मेनियातील वन्य माणसांची केली, असा अगदी ताजा इतिहास आहे. नीतिनियम सामाजिक असतात. ते बहुधा त्या-त्या समाजात समाजांतर्गत व्यक्तींपुरते मर्यादित असतात. समाजातल्या समाजात परत त्या-त्या वर्गाचे, जातीचे, कुटुंबाचे, असे वागण्याचे नियम असतात. स्वकीय-परकीय, आपण-इतर असे नेहमीचे व्यवहाराचे विश्व असते. स्वकीय वा आपला समूह ह्यांशी वागण्याचे नियम परकीयांना लागू पडत नाहीत. विश्वकुटुंब वृत्तीचे लोक अपवादात्मक आणि कृष्ण व अर्जुन, खासच त्यांपैकी नव्हेत. ते दोघेही निरनिराळ्या अर्थांनी त्या वेळच्या क्षत्रियांत गाजलेले

होते. एक मुत्सद्दी म्हणून, दुसरा योद्धा म्हणून. ह्या अचाट संहाराने त्यांचे मन हेलावलेले दिसत नाही. महाभारतात एक 'मृगस्वप्नभय' म्हणून प्रकरण आहे. पांडव एका वनात राहत होते. रानातसुद्धा पांडवांचा परिवार मोठा होता. सर्वांचे पोट भरण्यासाठी व मजा म्हणूनही पांडव रोज खूप शिकार करीत. एकदा धर्मराजाच्या स्वप्नात जनावरे (हरिणे?) आली व त्यांनी सांगितले, "राजा, तुम्ही जनावरांचा एवढा संहार चालविला आहे की, लौकरच आम्ही नष्ट होण्याच्या मार्गाला लागणार आहोत. तुम्ही दुसऱ्या वनात जा, आम्हांला थोडी उसंत मिळू द्या, आमची वीण वाढू द्या, मग परत या." हे ऐकून धर्म भावांना घेऊन दुसऱ्या वनात गेला. ज्या पांडवांना जनावरांचा निर्वंश होऊ नये, अशी समज होती, त्यांनी खांडववनात इतका क्रूर संहार कसा केला? खांडववनात संहार कृष्णार्जुनांनी केला, धर्माने नव्हे, असे एक उत्तर व जनावरांचा निर्वंश न करण्यामागे दया नसून धोरण होते, हे दुसरे कारण.

जगात सर्व समाजांतून जनावरे व पक्षी अशा वन्य प्राण्यांच्या शिकारीविषयी काटेकोर नियम आहेत. जनावरांची पैदास ज्या ऋतूत होते, त्या ऋतूत जनावरे मारू नयेत; गाभण मादीला मारू नये, लहान-लहान जनावरांना मारू नये; –एक-ना-दोन, अगणित नियम आहेत. हरिणांच्या शिकारीचा हंगाम एक, तर तित्तिरपक्षी मारण्याचा दुसराच. अशाच तऱ्हेचे नियम महाभारतकालापासून किंवा त्याच्या पूर्वीपासून आपल्याहीकडे असावेत, असे दिसते. गाभण मादी मारू नये, असा नियम होता. ज्या क्रूर कृत्यामुळे कळवळा येऊन वाल्मीकीला काव्य स्फुरले, तेही कृत्य नुसते पक्षी मारण्याचे नव्हते, तर विणीच्या दिवसांत एकमेकांशी क्रीडा करणाऱ्या जोडप्यांपैकी एकाला मारण्याचे [यत् क्रौञ्चमिथुनादेकमवधीः काममोहितम्।] कृत्य होते. हे सर्व मृगयेचे

नियम होते; पण आपल्यापैकी नव्हेत अशा माणसांना मारण्याबद्दल नियम नव्हते. जनावरांना आज जिवंत ठेविले, तरी इच्छेला येईल तेव्हा मारता येते. पण माणसांना जिवंत ठेविले, दास म्हणून जरी जिवंत ठेविले, तरी माणसां-माणसांच्या व्यवहारात दासाचे म्हणून काही क्षुद्रतम का होईना, पण अधिकार निर्माण होतात. अरण्य ज्यांच्या मालकीचे, त्यांना जिवंत ठेवणे तर जास्त धोक्याचे. जितांना दास म्हणून ठेवणे म्हणजेही धोका मोठा. म्हणून जेव्हा एका जमातीने इतरांवर मात केली, तेव्हा शक्य-तो त्यांच्या निष्पात करण्याचे धोरण तिने पत्करले.

खांडववनात ज्यांची कत्तल झाली, त्यांपैकी मुख्य होते तक्षकनागाचे घराणे. तक्षक कुरुक्षेत्राला गेला होता, म्हणून वाचला. पण त्याची बायको व इतर परिवार जळाला. ह्या तक्षकाच्या निमित्ताने महाभारतात गुंफिलेली एक उपकथा आपल्याला सापडते. खरोखर ही उपकथा नसून महाभारताच्या मुख्य कथेइतकीच महत्त्वाची व तीन पिढ्यांचा इतिहास व दोन मानववंशांचा झगडा सांगणारी ती एक जोडकथा आहे. महाभारताच्या सुरवातीलाच ही कथा येऊन जाते. कर्णपर्वात हीतील एक प्रसंग येतो. पण एकदा आदिपर्वात तिचा विस्तार झाल्यावर महाभारताच्या कथानकात ती डोकावत नाही. उत्तंकाच्या कथेत असा उल्लेख आढळतो की, तक्षक कुरुक्षेत्री इक्षुमती-नदीच्या काठी राहत होता. खांडवदाह-प्रकरणात आपल्याला कळते की, खांडववन हे तक्षकाचे राहण्याचे अरण्य होते. इक्षुमती ही यमुनेला मिळणारी एखादी लहान नदी असावी. खांडववनात तक्षक तर मेला नाहीच, पण त्याचा निर्वंशही झाला नाही. पण ह्या प्रयत्नामुळे नुसते तक्षकाचेच नव्हे, तर एकंदर 'नाग' नावाने ओळखिल्या जाणाऱ्या लोकांचे व पांडववंशाचे वैर जडले. हे वैर अर्जुन, अर्जुनाचा नातू

परीक्षित व परीक्षिताचा मुलगा जनमेजय असे तीन पिढ्या टिकले. कर्णार्जुनयुद्धाच्या वेळी तक्षकाच्या मुलाने अर्जुनाला मारण्याचा निकराचा प्रयत्न केला. तो साधला नाही. पण अर्जुनाचा नातू परीक्षित ह्याला तक्षकाने मारले. त्याचा सूड परत एकदा सर्पसत्राच्या निमित्ताने भयंकर हत्या करून जनमेजयाने घेतला.

हे 'नाग' नावाचे लोक काही त्या वेळच्या क्षत्रियांच्या दृष्टीने परके नव्हते व जंगलीही नव्हते. कुरूंची जी वंशावळ सांगितली आहे, तीत निरनिराळ्या दोन राजांनी तक्षकाच्या 'ज्वाला' नावाच्या मुलींशी लग्न केल्याची नोंद आहे, व ह्या दोन ज्वालांची मुले राज्यावर बसली, असाही उल्लेख आहे. म्हणजे कुरुवंशात – निदान शंतनूपर्यंत तरी – नागवंशाचे बीज निःसंशय होते. नागवंशाच्या ज्या मुलींशी लग्ने झाली, त्या राण्या झाल्या, व त्यांचे मुलगे गादीवर आले. म्हणजे क्षत्रिय त्यांना आपल्या समान मानीत असत, असे दिसते. नाग-राजांची जी यादी आढळते, तीत तक्षकाच्या वंशाचे नाव नेहमी असते. तक्षकाच्या मुलाचे नाव 'अश्वसेन' हेही इतर क्षत्रिय-नावांसारखेच आहे. अर्जुनाने ज्या उलूपी नावाच्या नाग-कन्येशी लग्न केले, ती कौरव्यकुलातली (!) होती. त्या कुलात 'ऐरावत' व 'धृतराष्ट्र' या नावांचे राजे होते. नागवंशातील एका कुलाचा पूर्ण नाश करण्याचा असा क्रूर प्रयत्न कृष्णार्जुनांनी का केला ?

'ब्राह्मणाने दान मागितले, आम्ही दिले,' असे उत्तर समाधान-कारक वाटत नाही. ब्राह्मणाने – प्रत्यक्ष द्रोणाने – द्रुपदाचा पराभव करण्याचे दान मागितले होते व अर्जुनाने द्रुपदाला बांधून आणले, पण सर्व द्रुपदांचा काही नाश केला नाही. आपल्या विजेत्याला आपली मुलगी देताना द्रुपदाला दुःख झाले नाही. क्षत्रियांशी युद्धाची काही नीती होती. पण खांडवदाह-प्रकरणात कुठल्याच तऱ्हेचे विधिनियम दिसत

नाहीत. नागांचा संहार हेच एक उद्दिष्ट दिसते. कृष्णाने लहानपणी यमुनेच्या डोहात राहणाऱ्या कालियनागाचा पराभव करून त्याला यमुनेतील राहण्याचे ठिकाण सोडावयास लाविले होते. कृष्णाच्या निरनिराळ्या हेतूंपैकी यमुनेच्या प्रदेशातून नागांची हकालपट्टी करणे हाही एक हेतू होता, अशी शंका मनात येते. हा हेतू साध्य करण्यासाठी तेथील नागांचा निर्वंश करण्याचे धोरण क्रूर तर होतेच, पण ते उघड-उघड फसले, हेही पुढील कथेवरून दिसून येते. ज्यू लोकांचा निर्वंश करावयाचा, अशा हिटलरी धोरणापैकीच ते वाटते. त्याचा हेतू तर साध्य झाला नाहीच, पण तीन पिढ्यांचे वैर मात्र पदरी पडले. सहस्रावधी नाग व इतर वंशाचे लोक तडफडत, तळतळाट करीत मेले.

ह्यातून वाचलेला मय हा एक असुर होता. तो उत्तम कारागीर होता. कृष्णाच्या आज्ञेने त्याने पांडवांना एक अप्रतिम सभा बांधून दिली. गंगेयमुनेकाठी राहणाऱ्या कोणत्याही क्षत्रियाची इतकी सुंदर सभा नव्हती. आर्यांची सगळी बांधणी लाकडाची असे. याउलट आर्यांच्या आधी भारतात असलेल्या लोकांनी भाजलेल्या विटांनी मोठमोठी शहरे बांधिली होती. असुर नावाचे लोक तर बांधकामात फारच प्रवीण होते. नुसत्या साध्या विटा नव्हेत, तर काचेचा थर बसविलेल्या निरनिराळ्या रंगांच्या विटाही ते बनवीत असत. तशाच विटा वापरून मयाने पांडवांची सभा बांधलेली असणार. हिरवट-निळ्या विटांनी त्याने पाण्याचा भास निर्माण केला. पाणी खेळविले. त्याच्या खाली निराळ्याच रंगाच्या विटा वापरून जमिनीचा भास निर्माण केला. ह्या सभेत पुष्कळांची खूप फजिती झालेली असणार. पण महाभारतात वर्णन आहे, ते फक्त दुर्योधनाच्या फजितीचे, आणि त्याला मोठमोठ्याने हसणाऱ्या द्रौपदीचे व भीमाचे! आधीच

पांडवांच्या वैभवाने जळणाऱ्या दुर्योधनला हे हसणे जिव्हारी भिडले असल्यास नवल नाही. इकडे भीम व द्रौपदी हसत होती, तिकडे धर्माने त्याला हात धरून उठवून नवी वस्त्रे नेसावयास दिली. हाही प्रकार त्याला सिद्ध-साधकपणाचाच वाटला असला पाहिजे. एकाने उपहासाने मारावे, दुसऱ्याने औदार्याने मारावे! दुर्योधन संतापाने व ईर्ष्येने इतका जळला की, पांडवांचा नक्षा उतरविण्याकडे त्याचे सारखे लक्ष लागले. ते साध्य झाले नाही, तर तो जीव देण्यास निघाला होता. शेवटी त्याच्या मामाने पांडवाना द्यूतात हरवून देशोधडीला लाविले, व भाच्याचे हृदय शांत केले.

रान जाळून आतील प्राण्यांचा एवढा अमानुष संहार करून जी सभा मिळविली, तिचा उपभोग पांडवांना पुरती पाच-दहा वर्षेसुद्धा मिळाला नाही.

पांडव वनवासात होते, तेव्हा इन्द्रप्रस्थाची किंवा मयसभेची काही पडझड झाल्याचा उल्लेख नाही. पण पांडवांनी युद्धोत्तर राज्य केले ते हस्तिनापुरातच. वज्र किती वर्षे इन्द्रप्रस्थात टिकला, त्याच्यामागून त्याचे वंशज तेथे राहिले का, वगैरे काहीच उल्लेख नाही. खुद्द पांडववंशालाही जनमेजयामागून लौकरच हस्तिनापूर सोडून कौशाम्बीला राजधानी करावी लागली. इंद्रप्रस्थाच्या यादव-वंशालाही तसेच करावे लागले असणार. उत्तरेकडून नव्या-नव्या लोकांच्या स्वाऱ्या होत होत्या. महाभारतयुद्धाने खिळखिळी झालेली क्षत्रियकुले त्याला तोंड देऊ शकली नाहीत. महाभारतकालीन कुरु-पांचालांतील राजकुले, समाजव्यवस्था, राज्यव्यवस्था सर्वच नष्ट झाली. ह्यापुढे नाव ऐकू येते ते मगधाचे, कुरु-पांचालांचे नव्हे. ह्या सर्व उत्पातात हस्तिनापूर नष्ट झाले, इंद्रप्रस्थही नष्ट झाले. पण हस्तिनापूर एक दीर्घकालीन परंपरा ठेवून गेले. हस्तिनापुरात कुरुवंशाने कित्येक शतके

राज्य केले. तेथल्या राजांच्या व राण्यांच्या अद्भुत वा रम्य किंवा अगदी साधारण अशा जीवनकथांशी हस्तिनापुराचे नाव कायम जडलेले आहे. हस्तिनापुराच्या रस्त्यांची वर्णने आहेत; तेथील नागरिक निरनिराळ्या प्रसंगी काय बोलले, त्याची नोंद आहे; कुंतीला आसरा देणाऱ्या विदुराचे घर तेथे होते; धृतराष्ट्राची राजसभा तेथे होती; द्रौपदीला ज्यातून ओढून आणले ते अंतःपुर तेथे होते; शेवटी शोक करणाऱ्या कौरवस्त्रियाही तेथेच होत्या.

इंद्रप्रस्थाशी कोणताही राजवंश निगडित नाही. खांडवदाहाच्या भयानक गोष्टीखेरीज संस्कृत वाङ्मयातील कोणतीही कथावस्तू ह्या शहराचा आसरा घेऊन नाही. त्याला घनता नाही. कोणताही आकार आलाच नाही. मयसभेची वास्तू तर नुसती अपशकुनीच नव्हे, तर आभासमयच राहिली. माणसाच्या तामसी वृत्तीतून निर्माण झालेल्या क्षणभंगुर, नेत्रदीपक, हृदयदाहक अशा 'आसुरी संपत्तीचे' ते एक स्वप्नवत दर्शन ठरले.

सेप्टेंबर, १९६४

सात

# 'परधर्मो भयावहः'

महाभारतात ब्राह्मणांचे स्थान एकंदर कथेच्या दृष्टीने अगदी मध्यवर्ती नसले, तरी गोष्टीच्या परिपोषाला महत्त्वाचे असे आहे. हे स्थान द्रोण व अश्वत्थामा ह्या पितापुत्रांना आहे. काही ब्राह्मण व त्यांचे उल्लेख मात्र निरर्थक म्हणून सोडून देता येतील. परशुरामाचा उल्लेख ह्यांपैकीच आहे. महाभारतात आलेला परशुराम भीष्माशी कित्येक आठवडे युद्ध करून पराभूत होतो व कर्णाला 'तुला आपल्या विद्येचे आयत्या वेळी विस्मरण होईल, असा शाप देतो. परशुराम ही व्यक्ती रामावताराच्याही आधीची. आपले क्षत्रियसंहाराचे भयानक कृत्य आटोपून तो तपश्चर्येला निघून गेला, अशी परशुरामाची कथा आहे. एकदा रामावतारात त्याला त्याच्या तपश्चर्येतून परत आणिले आहे, ते रामाचा मोठेपणा दाखविण्यासाठी! रामायणातील कथा-वस्तूशी त्याचा काहीही संबंध नाही. भीष्म किती शूर व किती

सत्यप्रतिज्ञ होता, हे दाखविण्यासाठी परशुराम महाभारतकथेत घुसडला आहे. परशुरामाला भीष्माने पूर्णतया माघार घेण्यास लाविली, व परत एकदा क्षत्रिय ब्राह्मणापेक्षा श्रेष्ठ कसा, हे दाखवून दिले.

त्याचप्रमाणे कर्ण शूर म्हणून गाजलेला. त्याचा अर्जुनाकडून पराभव झाला, ह्याला काहीतरी कारण चिकटवायला परशुराम त्या कथेत आणला आहे. ह्याही कथेत कर्ण परशुरामापेक्षा सरस वाटतो. गुरूने दिलेली विद्या व ती विद्या फुकट घालविणारा शाप या दोहोंचाही स्वीकार बिचारा कर्ण मुकाट्याने करतो. ह्याही कथेचा विचार करण्याचे कारण नाही. अर्जुनाने शेवटच्या लढाईखेरीज विराटाच्या गोग्रहणाच्या वेळी कर्णाचा पराभव करून त्याला पिटाळून लाविले होते. शेवटच्या लढाईत त्याने कर्णाचा पराभव केला, ह्यात लोकविलक्षण असे काहीच नव्हते. फक्त अर्जुनाकडूनच नव्हे, तर इतरांकडूनही कर्णाचा पूर्ण पराभव त्या पूर्वी झालेला होता. घोषयात्रेच्या वेळी गंधर्वांनी दुर्योधनाला पकडून नेले, त्या वेळी कर्णही मार खाऊन जीव बचावून कसाबसा निसटून पळून गेला होता. तो पुरता भिऊन गेला होता, असेही वर्णन आहे. पण कर्ण हा अतिशय मोठा योद्धा होता, व परशुरामाचा शाप नसता, तर त्याचा पराभव झाला नसता, हे दाखविण्यासाठी ही कथा रचिलेली आहे.

व्यासाच्या निरनिराळ्या शिष्यांनी थोड्या निरनिराळ्या तऱ्हांनी महाभारताची कथा सांगितली आहे, अशी आख्यायिका आहे. सध्या आपल्यापुढे जे महाभारत आहे, ते मुख्यत्वे वैशंपायनाने सांगितलेले आहे. अशीच कथा जैमिनीने सांगितली, असे म्हणतात. कौरवपांडवांचे भांडण झाले, युद्ध झाले, कौरवांचा पराभव झाला व पांडवांचा वंश गादीवर बसला, या गोष्टी जैमिनीलाही सांगाव्या लागल्या; पण त्याने कथेतील बराचसा भाग कौरवांच्या बाजूने लिहून पांडवांना कमी

लेखण्याचा प्रयत्न केला. जैमिनीचे जे अश्वमेध-प्रकरण सापडते, त्यात ठिकठिकाणी अर्जुनाचा पराभव होऊन त्याला श्रीकृष्ण व इतर सोडवितात, असे दाखविले आहे. कर्णाचा पराभव होऊन तो अर्जुनाच्या हातून मारला गेला, ही गोष्ट उघड होती. पण ह्या पराभवामुळे कर्ण, अर्जुनापेक्षा कमी ठरेल, म्हणून परशुरामशापाचे प्रकरण घडल्यासारखे वाटते. येथेही मुख्य गोष्टीला पोषक असे त्या कथेत काही नाही.

सध्या आपल्यापुढे जे महाभारत आहे, त्याची सुरवात मोठी विचित्र आहे. जनमेजयाच्या सर्पसत्रापासून त्याचा आरंभ आहे, व सर्पसत्र थांबल्यावर व्यासशिष्य वैशंपायन पूर्वजांच्या युद्धाची कथा जनमेजयाला सांगतो आहे, असे वर्णन आहे. परीक्षिताचा तक्षकाकडून अंत व बापाचा सूड घेण्यासाठी जनमेजयाचे सर्पसत्र ह्या दोन प्रकरणांत भृगुकुलातील ब्राह्मणांच्या कथांचे एक लांबलचक जाळे विणले आहे. त्या सर्व कथा संपेपर्यंत मुख्य कुरुवंशकथनाला व महाभारतकथेला सुरवातच होत नाही. परीक्षिताने एका ब्राह्मणाची चेष्टा केली व त्याने 'तुला तक्षक मारील,' असा शाप दिला, वगैरे कथा पाल्हाळाने सांगितल्या आहेत. वास्तविक पाहता परीक्षिताचा आजा जो अर्जुन त्याने कारण नसताना खांडववनदाहाच्या वेळेला तक्षकनागकुलाचा भयंकर नाश केला होता, ते वैर लक्षात ठेवून तक्षकाने परीक्षिताला मारले व परीक्षिताचा मुलगा जनमेजय ह्याने सर्पसत्र केले, अशी ही सरळ-सरळ तीन पिढ्यांच्या वैराची कथा आहे. तीत घुसडलेल्या सर्व ब्राह्मणकथा मागाहून घातलेल्या असाव्यात. भृगुकुलाच्या हाती कधीतरी महाभारतकथा गेली असावी व त्यांनी ठिकठिकाणी आपल्या कुळातील पुरुषांच्या गोष्टी घुसडून दिल्या असाव्या. हे कै० सुखटणकरांनी आपल्या लेखांतून फार उत्तम तऱ्हेने दाखविले आहे. आतापर्यंत उल्लेखिलेल्या ब्राह्मणांच्या सर्व गोष्टी ह्या

भृगुकुलातील पुरुषांच्या गोष्टींपैकीच आहेत. महाभारतकथेशी त्यांचा काही संबंध नाही. त्या सर्व काढून टाकिल्या, तर मूळ कथेच्या सौंदर्यात, सुटसुटीतपणात व ओघात भरच पडते. म्हणून ह्यांपैकी कोठच्याही गोष्टीचा विचार करण्याचे कारण नाही.

ज्या व्यासांनी महाभारत लिहिले वा शिष्यांना सांगितले, आणि कौरव व पांडव हे ज्यांचे वंशज, त्या व्यासांचाही महाभारतकथेशी संबंध वरवरचाच आहे. अधून-मधून ते प्रकट होतात, पांडवांना पांचालाला जावयास सांगतात, दुर्योधनाला उपदेश करतात, गांधारीचा संताप आवरतात, अश्वत्थाम्याची निर्भर्त्सना करतात, यादवक्षयानंतर अर्जुनाचे सांत्वन करतात; पण एकदा सत्यवतीच्या सुनांना पुत्रोत्पत्तीस कारणीभूत झाल्यावर व्यासांना महाभारतात महत्त्वाचे स्थान नाही.

महाभारतकथेशी ज्यांचा संबंध आहे, ज्यांमुळे कथाभागाचा काही परिपोष झाला आहे, असे ब्राह्मण दोन. ते म्हणजे द्रोण व अश्वत्थामा हे पितापुत्र. पांडव व धार्तराष्ट्र हे लहान असताना द्रोणाचा महाभारतकथेत प्रवेश होतो. उत्तम अस्त्रविद्या माहीत असलेला हा ब्राह्मण कौरवांच्या कुलपरंपरागत गुरूचा म्हणजे कृपाचार्यांचा मेहुणा होता. हा कुठेही आश्रय न मिळालेला व त्यामुळे दारिद्र्याने गांजलेला असा होता. एवढेच नव्हे, तर अपमानाने तो जळत होता. पांचालांच्या राजाचा सहाध्यायी म्हणून मित्र ह्या नात्याने तो त्याच्या दरबारात गेला असताना द्रुपदाने त्याची हेटाळणी केली होती. द्रुपदाने आपल्या पदरी द्रोणाला ठेवूनही घेतले असते; पण लहानपणचा शाळासोबती म्हणून बरोबरीच्या मित्राचे नाते द्रोण सांगू लागला, ते द्रुपदाला सहन होईना, आणि अशा अपमानाने जळत द्रोण पांचालांच्या दरबारातून कृपाकडे आला होता. आपल्या सावत्र भावाच्या नातवंडांना अस्त्रविद्या शिकविण्यासाठी भीष्माने

त्याची नेमणूक केली. विद्या शिकवून झाल्यावर गुरुदक्षिणा म्हणून अर्जुनाकडून त्याने द्रुपदाचा पराभव करविला, व द्रुपदाशी बरोबरी होण्यासाठी अर्ध्या राज्याच्या मोबदल्यात द्रोणाने द्रुपदाला जिवंत सोडले. एखाद्याचा पराभव करून त्याचा प्रदेश हिसकावून त्या प्रदेशाचा राजा होणे ही गोष्ट त्या वेळच्या नीतीला धरून नव्हती. त्यातूनही हे एका ब्राह्मणाने करणे योग्य नव्हते. द्रुपदाचा पराभव झाला व अर्जुनाने त्याला बांधून आणले. जुन्या गोष्टीची ओळख देऊन द्रोणाने त्याला सोडून दिले असते, म्हणजे अपमानाची भरपाई करून घेतल्यासारखे झाले असते, व शांती आणि मनाचा मोठेपणाही सिद्ध झाला असता. तसे न करता उत्तरपांचाल म्हणजेच अहिच्छत्र द्रोणाने आपल्याकडे ठेविला. दक्षिणपांचालात द्रुपदराजा राहिला. उत्तरपांचाल बळकावूनही द्रोण कौरवांच्या राजसभेतच राहिला होता, असे दिसते. कारण राजसभेत निरनिराळ्या वेळी भीष्माच्या मागोमाग त्याचीही भाषणे घातलेली आहेत. भीष्म जे म्हणेल, त्याला द्रोणाने दुजोरा द्यावा, अशा प्रकारची ती भाषणे होती. पण भीष्म ज्या कळवळ्याने भांडण मिटवून कुरुकुलाचे रक्षण करू बघत होता, तो कळवळा द्रोणाच्या मनात दिसत नाही. उलट युद्धाच्या वेळी तर तो सर्वस्वी कौरवांच्या बाजूचा होता, असेच दिसते.

द्रोणाचा मुलगा अश्वत्थामा. तोही शास्त्रांत पारंगत न होता शस्त्रांत पारंगत झाला. गुरुजी काही अस्त्रे आपल्यापासून चोरून ठेवून ती अश्वत्थाम्याला शिकवितात, अशी अर्जुनाच्या मनात शंका होती. ह्या शंकेमुळे की काय, अर्जुन आणि अश्वत्थामा ह्यांच्यामध्ये उघड नाही, पण प्रच्छन्न स्पर्धा होती. द्रोणाने अर्जुनाला परोपरीने सांगितले की, 'माझी विद्या मी तुला सर्वांत अधिक दिलेली आहे.' अर्जुनाचे समाधान झाले किंवा नाही, हे कळत नाही. एवढे मात्र

खरे की, दोघेही पितापुत्र पांडवांच्या विरुद्ध लढले.

लढाई करू नये, असे वाटण्याचे अर्जुनाचे मुख्य कारण म्हणजे भीष्म व द्रोण ह्यांच्याशी युद्धाचा प्रसंग येऊ नये हे. भीष्माचे वय लढाईच्या वेळी नव्वद ते शंभर वर्षांचे असावे. आणि द्रोणाचे वय द्रुपदाच्या बरोबरीचे म्हणजे अर्जुनाच्या स्वतःच्या वडिलांच्या इतके, असे म्हणावयास हरकत नाही. अर्जुनाचे वय लढाईत पस्तीस होते. त्याच्यापेक्षा त्याचे गुरू निदान वीस वर्षांनी तरी, म्हणजे बरेच वृद्ध होते. अर्जुनाने भीष्माचा व द्रोणाचा पराभव विराटगोग्रहणाच्या वेळी केलेला होता. हे दोन्ही योद्धे अर्जुनाला भारी नव्हते, पण अवध्य होते. एक आजोबा म्हणून, व दुसरा गुरू म्हणून.

भीष्मपर्वात दहा दिवस युद्ध चालून कोणी विशेष मारले गेले नाहीत. ती लढाई लुटूपुटीची होती. वेळ काढून कौरव-पांडवांना लढाईपासून परावृत्त करावयाचे, असा भीष्माचा डाव होता. ह्याच्या उलट द्रोणाच्या सेनापतित्वाचे तीन दिवस अतिशय मोठ्या लढाईत गेले.

द्रोणाला सेनापतिपद कसे मिळाले, ही हकीकत विचार करावयास लावण्याजोगीच आहे. भीष्म पडला, हे कळल्यावर दुर्योधनाच्या सैन्यात हाहाकार उडाला व 'आम्हांला कर्ण पाहिजे, आम्हांला कर्ण पाहिजे,' अशा आरोळ्या सर्वत्र ऐकू येऊ लागल्या. इतके दिवस बाजूला पडलेला कर्णही मोठ्या समारंभाने आपल्या रथातून वेगाने आला. हे सर्व वर्णन वाचीत असताना आता कर्णच सेनापती होणार, ह्याबद्दल मनाला शंका राहत नाही. पण एकाएकी सर्व रंग पालटतो. कर्णाने आपण होऊनच दुर्योधनाला सांगितले की, "सगळ्यांना पटेल आणि कोणाचेही मन मोडणार नाही, अशा माणसाला सेनापती करणे योग्य आहे. तेव्हा तू द्रोणाला सेनापती

कर." आणि दुर्योधनाने द्रोणाला सेनापती केले. द्रोणाला सेनापती करण्यासाठी कर्णाने दिलेले कारण तर फारच विचार करण्यासारखे आहे. कर्ण सेनापती होण्याला काही लोकांचा विरोध असला पाहिजे, असे ह्यावरून दिसून येते. लढाईच्या सुरवातीपासूनच दुर्योधनाला ह्या पेचाने भंडावून सोडिले होते. पांडवांकडे लहान कोण, मोठा कोण, क्षत्रिय कोण, अक्षत्रिय कोण, अशा भानगडी झालेल्या दिसत नाहीत. पहिल्या दिवसापासून तो शेवटच्या दिवसापर्यंत पांडवांचा सेनापती धृष्टद्युम्न होता. दुर्योधनाला पहिले दहा दिवस भीष्माच्या सेनापतित्वाखाली फुकट घालवावे लागले. नंतरही कर्णाला सेनापतिपद न देता द्रोणाला द्यावे लागले. द्रोण पडल्यावर कर्णाला सेनापती केला; पण त्याही वेळी शल्य दुखावला गेला असावा, असे दिसते. म्हणजे दळभार मोठा, पण आपल्या तोडीचे राजेलोक आणि स्वतःच्या कुळातील वृद्ध माणसे ह्यांच्या मानापमानापायी दुर्योधन जेरीस आला, एवढे खरे. भीष्मामागून द्रोण सेनापती झाला, तो अशा तऱ्हेने.

भीष्माच्या जिवंतपणी सारखी भीष्माचीच री ओढणारा द्रोण लढाईच्या वेळी मात्र अगदी निराळाच दिसतो. भीष्माचे नाते अन्नदात्याचे होते. दुर्योधनाचे नाते शिष्याचे आणि अन्नदात्याचे होते. ह्या नव्या अन्नदात्याला आपली स्वामिभक्ती दाखविणे हे द्रोणाचे कर्तव्य ठरले. शिवाय, ज्या तऱ्हेने तो सेनापती झाला, त्याहीमुळे आपली निवड योग्य झाली, असे त्याला दुर्योधनाला दाखवावयाचे होते. "तू फक्त अर्जुनाला लांब ठेव, म्हणजे मी पांडवांचा फडशा पाडतो," असे द्रोणाने सांगितले. आणि त्याप्रमाणे द्रोण लढलाही. तीन दिवसांच्या सेनापतिपदाच्या वेळी फार मोठे रणकंदन झाले व फार महत्त्वाची माणसे मेली. मुख्य म्हणजे अर्जुनाचा मुलगा अभिमन्यू व धृतराष्ट्राचा जावई जयद्रथ हे मेले. तिन्ही दिवशी कर्ण लढत

होता. मुख्य लढाईपासून अर्जुनाला दुसरीकडे गुंतवितण्याच्या युक्तीमुळे कदाचित असेल, पण अर्जुनाची व द्रोणाची समोरासमोरी झाली नाही. अर्जुन नसल्यामुळे अभिमन्यूला मारणे शक्य झाले. द्रोणाने अभिमन्यूला मारताना काहीही गय दाखविली, असे दिसत नाही. मनात येते की, भीष्माला आपल्या स्वतःच्या पणतवंडाला असे मारवले नसते.

द्रोण ज्या तऱ्हेने मारला गेला, तीही हकीकत लक्षात घेण्याजोगी आहे. भीमाने अश्वत्थामा नावाचा एक मोठा हत्ती मारला व सर्वत्र 'अश्वत्थामा मारला गेला,' अशी हूल उठविली. द्रोणाला हें खरे न वाटून तो धर्माला विचारायला गेला. तेव्हा धर्म तोंडातल्या तोंडात 'कोण जाणे, माणूस का हत्ती ते?' असे पुटपुटला. ते द्रोणाला सर्व ऐकू गेले नाही, व स्वतःचा मुलगा अश्वत्थामाच मेला असावा, अशी शंका त्याला आली. पुढील हकीकतीवरून अश्वत्थामा नक्की मेलाच, अशी त्याची खात्री झाली असावीसे वाटत नाही. अश्वत्थामा मेला, ह्या बातमीवर विश्वास न बसायचे कारण असे देता येईल की, अशा तऱ्हेची कोणी तरी मित्र किंवा आवडता माणूस मेल्याची हूल उठवून शत्रूला हतबल करण्याचा डावपेच त्या वेळी चांगला माहीत होता. जरासंधाचे सेनापती हंस आणि डिंभक हे एकमेकांचे अतिशय मित्र होते.. त्यांपैकी एक मेला, अशी हूल उठविल्यामुळे दुसऱ्याने जीव दिला. दुसऱ्याने जीव दिलेला पाहून पहिल्याने खरोखरीच आपल्याला मारून घेतले, असा वृत्तान्त सभापर्वात आलेला आहे. आणि त्या वेळच्या सर्व लोकांना तो माहीत होता, असे पुढे शिशुपालाच्या बोलण्यावरून दिसते.

ह्यानंतर द्रोण त्वेषाने लढतच राहिला, असे वर्णन आहे. म्हणजे धर्माचे भाषण ऐकल्यावर द्रोण शस्त्रे टाकून खाली बसला, अशी

वस्तुस्थिती दिसत नाही. धृष्टद्युम्न त्वेषाने द्रोणावर चाल करून गेला, व द्रोणाच्या बाणाने भयंकर घायाळ झाला. ह्या वेळी भीम धृष्टद्युम्नाच्या मदतीला धावला. त्याने द्रोणाचा रथ बाजूने धरला. [द्रोणस्याश्लिष्य तं रथम् । ७·१६५·२७.] तो द्रोणाला असे शब्द बोलला :

"जातिधर्म टाकून तुम्ही ब्राह्मणांनी शस्त्रे हातात धरली नसती, तर क्षत्रियांना नीटपणे जगण्याची काही आशा होती. सर्वांशी अहिंसाव्रताने वागण्याचा ब्राह्मणांचा धर्म, व आपण तर ब्राह्मणश्रेष्ठ. एका मुलाच्यासाठी तू म्लेच्छ वगैरे फार जणांना मारलेस. ते आपल्या धर्माने वागत होते. तू मात्र स्वधर्म सोडून संहार केलास. लाज वाटत नाही का? अरे, ज्या मुलासाठी एवढे केलेस, तो तर मेलाच. धर्मराजाच्या सांगण्यावर तुझा विश्वास बसत नाही काय?"

हे शब्द ऐकून द्रोण उद्विग्न झाला व त्याचे धैर्य गळाले. ह्या अवकाशात घायाळ झालेल्या धृष्टद्युम्नाला थोडी उसंत मिळाली. थोडा दम खाऊन पुन्हा नव्या जोमाने त्याने द्रोणाच्या रथाला आपला रथ भिडविला व द्रोणाच्या रथात उडी घालून त्याने द्रोणाचे केस धरले. हा सर्व प्रकार पांडवसैन्यातून दिसत होता. अर्जुन तेथूनच मोठ्याने ओरडला, "अरे, गुरुजींना मारू नकोस. त्यांचा रथ हाकून त्यांना इकडेच घेऊन ये." अर्जुन बोलत असतानाच धृष्टद्युम्नाने द्रोणाला त्या वेळी मारले नसते, तरी द्रोण भीमाच्या व त्याच्या हातात पुरता सापडला होता, व त्याला बंदिवान करून पांडवांकडे आणता आले असते, ह्यात काहीच शंका नाही द्रोण असहाय असताना व रागाच्या भरात मारला गेला. मरता-मरता तो मोठ्याने ओरडला, "कर्णा, कृपा, दुर्योधना, शर्थीने लढा. मी गेलो." हे त्याचे मरताक्षणीचे वर्तनही तो मुलाच्या मरणाचे वृत्त ऐकून दुःखाने स्वस्थ

विषण्ण होऊन बसला, व त्यामुळे मारला गेला, ह्या रूढ समजुतीशी विसंगत आहे.

द्रुपदाचे अर्धे राज्य गेले, त्या वेळी आपल्या पराभवाचा सूड घ्यावा, म्हणून द्रुपदाने यज्ञ केला. वाडवडिलांपासून आलेले राज्य तिऱ्हाइताकडून हिरावून घेणाऱ्या आपल्या शत्रूचा सूड धृष्टद्युम्नाने – त्या यज्ञातून मिळालेल्या मुलाने – उगविला.

गीतेमध्ये ब्राह्मणांची क्षमा, शांती वगैरे जी लक्षणे दिलेली आहेत, त्यांपैकी कोठचेच लक्षण द्रोणाच्या ठिकाणी दिसून येत नाही. तरीही महाभारतात द्रोणाची भूमिका निंद्य किंवा गर्ह्य अशी झालेली नाही. ह्याउलट परिस्थिती त्याच्या मुलाची आहे. अश्वत्थाम्याने ब्राह्मणत्वाचे सर्व गुण पार झुगारून दिले होते; एवढेच नव्हे, तर त्याचा सर्वस्वी अधःपात झाला होता. आणि वैर-प्रतिवैर ह्या न संपणाऱ्या मालिकेतील त्याच्या कृत्याला भयंकरपणात व निर्दयपणात कुठे तोड नाही. अश्वत्थामा पहिल्यांदा महाभारताच्या गोष्टीत येतो, तो दारिद्र्याने गांजलेल्या एका ब्राह्मणाचा मुलगा म्हणून. द्रोणाला भीष्माने आश्रय दिल्यावर बाकीच्या मुलांबरोबर तो बापाजवळ अस्त्रविद्या शिकला. अस्त्रविद्येत त्याची आणि अर्जुनाची बरोबरी होती, अशा तऱ्हेचे उल्लेख महाभारतात जागोजागी येतात. द्रोणाने दिलेल्या विद्येवरच संतुष्ट न राहता आणखी विद्या शिकायला धर्माने अर्जुनाला पाठविले होते. तसे अश्वत्थाम्याच्या बाबतीत झालेले नाही. शिवाय, त्या वेळच्या तरुण योद्ध्यांना अर्जुन म्हणजे योद्धेपणाचे प्रतीक वाटत असे. तसा लौकिक अश्वत्थाम्याला कधीही प्राप्त झाला नव्हता. कौरवांच्या सभेत तो थोडासा उद्दामपणेच वागत असे. बाप भीष्माच्या बाजूने बोलत असे, तर तो दुर्योधनाच्या बाजूने बोलत असे. अश्वत्थामा म्हणजे मोठा योद्धा आहे, असे दुर्योधनाला वाटले नाही. अश्वत्थाम्याचे

नाव सेनापतिपदाच्यासाठी कधी कोणी सुचविलेही नव्हते, आणि ते कुणाला सुचलेही नसते.

शल्य व शकुनी यांच्या मरणानंतर पांडवांनी कौरवसैन्याचा फडशा उडविण्यास सुरवात केली. भीतीने सैरावैरा पळणारे सैन्य आवरणे शक्य नाही, हे पाहून दुर्योधनही रणांगणातून निसटला. जाता-जाता त्याने संजयाबरोबर बापाला निरोप पाठविला, "मी डोहात लपलो आहे. सर्व मारले गेले. फक्त मीच उरलो आहे." तो आपल्या लपायच्या जागी पोहोचला, व डोहाखाली एका दगडाच्या कपारीत श्रांत व खिन्न असा पडून राहिला. हस्तिनापूरच्या वाटेवर संजयाला कृप, कृतवर्मा व अश्वत्थामा भेटले. तेही रणांगणातून पळून चालले होते. त्यांनी दुर्योधनाबद्दल विचारले, व संजयाने त्यांना सर्व सांगितले.

पळून चाललेल्या कौरवसैन्याकडे दुर्लक्ष करून पांडव व पांचाल दुर्योधनाचा शोध काढून त्याला मारण्याच्या निश्चयाने निघाले. त्यांनी सर्वत्र शोधले, पण तो काही सापडला नाही. ते निराशेने शिबिराकडे परतले. आज नाही सापडला, तर उद्या तरी त्याला शोधून काढलेच पाहिजे, असा त्यांचा विचार होता. दुर्योधनाला मारल्याखेरीज लढाई संपली, असे म्हणता येणार नाही, अशी त्यांची पुरेपूर खात्री होती.

पांडवांचे रथ दुर्योधनाला शोधण्यासाठी संचार करीत असताना अश्वत्थामा व त्याचे दोघे सोबती लपून बसले होते. पांडव शिबिराकडे परतले, सर्व शांत झाले आहे, असे पाहून हे त्रिकूट बाहेर आले, व दुर्योधन लपला होता, त्या डोहाकडे गेले. अश्वत्थाम्याने दुर्योधनाला हाक मारली व दुर्योधन खाली डोहात व हे तिघे काठावर असे त्यांचे संभाषण झाले. कृप आणि कृवतर्मा फक्त ऐकण्याचेच काम करीत होते. अश्वत्थामा मात्र 'बाहेर ये व पांडवांशी लढ,' असे वारंवार आग्रहाने सांगत होता. लढण्याची इच्छा दुर्योधनाला मुळीच नव्हती.

अश्वत्थामा मात्र सारखे सांगत होता, "दोन्हीकडचे खूप लोक मारले गेले आहेत. थोडेच शिल्लक आहेत. आता लढाई सोपी आहे. शिवाय, आम्ही तुला मदतीला आहोच." ह्या आग्रहाला कंटाळून – बोलणे थांबविण्यासाठीच असावे, – दुर्योधन शेवटी म्हणाला, "आज मला विश्रांती घेऊ दे. काय करायचे, ते उद्या ठरवू."

लढाईच्या शेवटच्या दिवसाचा हा वृत्तान्त फारच महत्त्वाचा आहे. दुर्योधनाच्या कृतीवरून असे दिसते की, तो जीव वाचविण्याचा शेवटचा प्रयत्न करीत होता. तो लांब रानात पाण्याखाली लपून बसला होता, व त्याने संजयाकरवी बापाला झाल्या गोष्टीबद्दल निरोप पाठविला होता. सर्व सैन्य उद्ध्वस्त झाले होते. धृतराष्ट्राने पांडवांना – विशेषतः धर्माला – बोलावणे पाठवून 'राज्य घे, पण मुलाला – उरल्या-सुरल्या एका मुलाला जीवदान दे," असे म्हटले असते, तर धर्माला ह्या विनंतीला मान द्यावाच लागला असता. कदाचित राज्याचा एखादा ल्हानसा तुकडासुद्धा द्यावा लागला असता. पण जोपर्यंत बापलेक असे दोघे जिवंत राहिले असते, तोपर्यंत पांडवांना निर्वेध राज्य कधीच करता आले नसते. दुर्योधन वेळ काढू पाहत होता, तर धृतराष्ट्राकडून काही बोलावणे येण्याच्या आत दुर्योधनाला काढून मारावयाचे, असा पांडवांचा बेत होता.

अश्वत्थाम्याचे राजाशी मोठमोठ्याने बोलणे चालू असता रानात शिकारीच्या निमित्ताने काही व्याध आले. हे लोक भीमाच्या मर्जीतले होते. भीमाला मांस आवडे व तो चांगले पैसे देई, म्हणून ही माणसे रोज शिकार मारून ती पांडवांच्या शिबिरात पोहोचवीत असत. थोड्या वेळापूर्वीच दुर्योधन सापडत नाही, म्हणून रथातून परतताना त्यांनी पांडवांना व पांचालांना पाहिले होते. 'कोठे बरे दुर्योधन लपला असेल?' म्हणून त्यांचे परस्पर संभाषणही त्यांनी ऐकले होते.

डोहाकाठी मोठमोठ्याने चाललेले बोलणे त्यांनी ऐकले व त्यांना कळून चुकले की, दुर्योधन येथे लपून बसला आहे. 'अरे, शिकारीच्या मांसाच्या कितीतरी पट द्रव्य भीम आपल्याला देईल; चला, ही बातमी आपण त्याला सांगू या,' असे म्हणून ते तसेच धावत गेले व त्यांनी दुर्योधन कोठे लपला आहे, ते पांडवांना सांगितले. सर्व पांडव परत रथात बसून मोठा जयघोष करीत डोहाकडे यावयास निघाले. पांडवांचा जयघोष ऐकून व त्यांच्या रथाचा आवाज ऐकून दुर्योधन परत आत जाऊन लपला व हे तिघे वीर प्राणभयाने लांब रानात पळून गेले.

थोड्या वेळापूर्वी पांडवांना मारून टाकण्याच्या वल्गना करणारा अश्वत्थामा नुसता त्यांच्या रथाचा आवाज ऐकल्याबरोबर पळून गेला. बाप मेल्यापासून तो सूडाच्या गोष्टी बोलत होता. संतापाने जळत होता. द्रोणानंतर तीन दिवस लढाई चालली होती. पण त्याला धृष्टद्युम्नाला मारता आले नाही. समोरासमोर लढाईत तो धृष्टद्युम्नापुढे टिकू शकत नव्हता, हे उघड होते. ज्या दुर्योधनाबद्दल तो एवढा कळवळा दाखवीत होता, त्याच्या नाशाला तोच कारण झाला. आपल्या उतावळ्या अविवेकी घाईमुळे संजयाकडून बातमी कळताच तो राजाकडे आला, व काळवेळ न पाहता दिवसा-उजेडी मोठमोठ्याने बोलून त्यानेच दुर्योधनाची लपण्याची जागा पांडवांना दाखविली. पांडव आले, तेव्हा शेवटपर्यंत आपल्या राजाशेजारी उभे राहून त्याच्या वतीने लढण्याऐवजी तो भ्याडाप्रमाणे पळून गेला.

इच्छा नसतानाही दुर्योधनाला डोहाबाहेर यावे लागले. पांडवांनी दुरुत्तरे बोलून-बोलून, डिवचून सापाला बिळाबाहेर काढावे, तसे दुर्योधनाला बाहेर काढले व गदायुद्धात मांडीवर वार करून भीमाने त्याला खाली पाडले. शिरावर लाथही मारली, पण धर्म मध्ये पडला व त्याने दुर्योधनाची आणखी विटंबना वाचविली. दुर्योधनाला मारल्यावर

धर्माने घाईघाईने कृष्णाला धृतराष्ट्राकडे पाठवून "धृतराष्ट्राचे व गांधारीचे सांत्वन कर व 'राग धरू नका, आम्ही तुमचेच आहोत,' असे कळव," असे सांगितले. कृष्ण हस्तिनापुरात जाऊन दोघांशी बोलतो आहे, तो आणखी जासूद आले. त्यांच्या बोलण्यावरून काहीतरी दगाफटका आहे, असा संशय कृष्णाला आला, म्हणून चाललेले बोलणे अर्धवट टाकून तो घाईघाईने परत आला व पाच पांडव, द्रौपदी व सात्यकी ह्यांना घेऊन पांडवांचे गजबजलेले शिबिर सोडून कौरवांच्या ओस पडलेल्या शिबिरात त्यांना घेऊन गेला. एवढे होईपर्यंत सूर्य मावळला.

दगा होणार हे कृष्णाने ताडले, पण नक्की कशा तऱ्हेने, हे काही त्याला कळले नव्हते. तो दगा अश्वत्थाम्याचा होता. राजाला सोडून पळून गेलेले हे वीर कानोसा घेत होते. पांडव व पांचाल निघून गेले व त्यांच्या शिबिरात जयघोष चालला आहे, हे पाहून तिघेही परत दुर्योधन होता तेथे आले. डोहाच्या काठी मृतप्राय अवस्थेत मातीत दुर्योधन पडला होता. एवढा मोठा ऐश्वर्यसंपन्न राजा असा धुळीत पडलेला ! भीमाने त्याला कपटाने मारले, हे ऐकून तिघेही फार हळहळले. अश्वत्थाम्याने 'मी ह्याच्या व माझ्या बापाच्या मरणाचा सूड उगवीन,' अशी प्रतिज्ञा केली व तशाही अवस्थेत राजाकडून सेनापतिपदाचा अभिषेक करून घेतला ! बाकीचे सेनापती ज्या वैभवाने व मानाने सेनापती झाले होते ते पाहिले, म्हणजे ह्या शेवटच्या प्रसंगाचा तिटकाराच येतो. अश्वत्थाम्याची मागणी इतकी आग्रहाची होती की, 'नको ही कटकट,' म्हणून राजाने त्याला अभिषेक केला, असेच वाटते. कौरवांचा हा शेवटचा सेना नसलेला सेनापती अभिषेक झाल्यावर राजाला तेथेच सोडून निघून गेला.

दुर्योधनाजवळून निघून गेल्यावर तो, कृप व कृतवर्मा हे लांब जाऊन

पांडवांच्या सैन्याच्या हातात सापडू नये, म्हणून रानात विश्रांतीला बसले कृप आणि कृतवर्मा झोपी गेले, पण अश्वत्थाम्याला झोप येईना. द्रोणाच्या मृत्यूबरोबर अश्वत्थाम्याने बापच गमावला नव्हता, तर राज्यही गमावले होते. दुर्योधनाबद्दलच्या दुःखाने तो पीडला होता एवढेच नव्हे, तर स्वतःच्या वैयक्तिक दुःखाने व हानीने जळत होता. अशा वेळी त्याला एक दृश्य दिसले. त्या काळोख्या रात्री कावळे झोपले असताना एका घुबडाने त्यांच्यावर झडप घालून त्यांचा नाश केला. हे पाहिल्यावर अश्वत्थाम्याला पांडवांवर ते रात्री बेसावध असताना हल्ला करावा, ही कल्पना सुचली. त्याने ती कल्पना कृप व कृतवर्मा यांना जागे करून सांगितली. 'तू असे वाईट कृत्य करू नकोस,' म्हणून कृपाने त्याला परोपरीने सांगितले. ह्या अनुषंगात अश्वत्थाम्याचे एक वाक्य लक्षात घेण्यासारखे आहे. तो आपल्या मामाला सांगतो, "तुम्ही मला ब्राह्मणधर्माप्रमाणे वागायला सांगता, पण मी तो कधीच शिकलेलो नाही. लहानपणापासून माझा सगळा जन्म अस्त्रविद्या शिकण्यातच गेला. श्रेष्ठ ब्राह्मणाच्या कुळात जन्मून मी मंदभाग्य क्षात्रधर्मात वाढलो. आता मला तो अनुसरू द्या." (१०·३·२१–२२.) कृपाचे न ऐकता त्याने घोडा जोडला व एकटाच रथात बसून तो पांडवांच्या शिबिराकडे भरधाव गेला, व हा भाचा करतो आहे तरी काय, अशा भीतीने कृप व कृपामागून कृतवर्मा त्याच्या पाठीमागे धावले. अश्वत्थामा शिबिरात शिरलेला त्यांनी पाहिला व ते शिबिराच्या बाहेर उभे राहिले. अश्वत्थाम्याने आत जाऊन पहिल्याने निजलेल्या धृष्टद्युम्नाला मारले, मग पाचही द्रौपदीपुत्रांना मारले. रात्रीच्या वेळेला किती लोक आले आहेत व कोण हल्ला करीत आहे, हे न उमजल्यामुळे लोक सैरावैरा धावत असताना कृप व कृतवर्मा यांनी शिबिराला आग लावून दिली. त्यामुळे गोंधळात भरच पडली.

जेवढे मारता येतील तेवढे लोक मारून अश्वत्थामा बाहेर आला व झालेले वर्तमान मृतप्राय दुर्योधनाला सांगून त्याने त्याच्याकडून शाबासकी मिळविली. पण झालेल्या कृत्याचा सूड उगविण्यासाठी पांडव व कृष्ण आपल्या मागोमाग येतील, हे जाणून तो तेथून पळाला व गंगेच्या काठी व्यासापुढे जाऊन हजर झाला. पांडव त्याच्या मागोमाग आले. त्याने एक अमोघ अस्त्र अर्जुनाला मारण्यासाठी टाकले व अर्जुनाने प्रति-अस्त्र टाकले. दोन्ही अस्त्रे भिडली. आता जगाचा संहार होणार, असे पाहून व्यासाने मध्ये पडून अर्जुनाला 'आपले अस्त्र मागे घे,' अशी विनंती केली. अर्जुनाने अस्त्र मागे घेतले. पण अश्वत्थाम्याला आपले अस्त्र मागे घेता आले नाही. त्या अस्त्राने पांडवांचा नाश झाला नाही, पण उत्तरेच्या पोटातील गर्भावर ते अस्त्र पडले, असा वृत्तान्त आहे. स्वतः पांडवांनी अश्वत्थाम्याला जिवंत सोडले. 'मी उत्तरेच्या मुलाला जिवंत करीन,' असे म्हणून कृष्णाने मागाहून अश्वत्थाम्याला जो शाप दिला, तो भयंकर होता. "कित्येक हजार वर्षे तू जगशील, पृथ्वीवर जंगलांतून आणि वाळवंटांतून तू वणवण भटकशील. पण कोणी जिवंत मनुष्य तुला थारा देणार नाही," हा तो शाप होता. बाकीचे सेनापती वीरमरणाने मेले. अश्वत्थामा हा मरणापेक्षाही भयंकर जिणे जगला.

आपल्या तत्त्वज्ञानात स्मृती व मोह ह्यांना एक विशेष अर्थ व विशेष महत्त्व आहे. मनुष्याचा नाश कोणत्या टप्प्यांनी होतो, ह्याची एक कारणपरंपरा गीतेत दिली आहे. ती सर्वांना परिचित आहेच.

**क्रोधाद् भवति संमोहः**
**संमोहात् स्मृतिविभ्रमः ।**
**स्मृतिभ्रंशाद् बुद्धिनाशो**
**बुद्धिनाशात् प्रणश्यति ॥**

उपनिषदांतही स्मृतीवर भर दिलेला आहे. [क्रतो स्मर, कृतं स्मर। ईशावास्य : १७.] बौद्धवाङ्मयातही स्मृतीवर असाच भर दिलेला आहे. लहानपणापासून मरेपर्यंतच्या नित्य बदलत्या आयुष्यातील एकत्वाचा धागा स्मृती हा आहे. 'मी कोण,' ह्याची नित्य जाणीव किंवा 'मी तोच, मी तोच,' हे ज्ञान देणारी शक्ती स्मृती आहे. मी कोण? माझी कर्तव्ये कोणती? मी कुठे चाललो आहे?–ही जाणीव राहते, ती स्मृतीने! 'मी कोण?' ह्याचे उत्तर महाभारताच्या दृष्टीने 'आयुष्यात माझे स्थान काय?' ह्या प्रश्नाशी निगडित आहे; व कर्तव्ये काय, ती त्या स्थानावर अवलंबून आहेत. मनुष्य जन्माला येतो, तो पूर्वजन्मीच्या खुणा घेऊन. पण त्याला त्या खुणा काय आहेत, त्याची स्मृती नसते. असामान्य माणसे – उदाहरणार्थ कृष्ण – ती स्मृती घेऊन येतात. [बहूनि मे व्यतीतानि जन्मानि। भगवद्गीता.] ती जातिस्मर असतात. पण इतरांनी निदान ह्या एका जन्मात तरी स्मृती अखंड ठेवण्यास जपले पाहिजे. मृत्यूच्या क्षणापर्यंत पूर्ण शुद्धीत असण्याची जी इच्छा पूर्वी दिसे, तीही ह्याच निष्ठेवर आधारलेली होती. 'उत्तरायणात, शुक्लपक्षात, दिवसा-उजेडी, पूर्ण शुद्धीवर असताना मृत्यू येणे चांगले,' असे गीतेत जे आढळते, ते ह्याचसाठी. स्मृती नष्ट होता कामा नये, हा तो अट्टहास होता. भीष्माचा स्मृतिभ्रंश कधीही झाला नाही. अर्जुनाला संमोह झाला होता, पण त्याचे स्वतःचे स्मरण त्याला कृष्णाने करून दिले, व अर्जुनही स्वकर्तव्याच्या निष्ठुर स्मरणाने पूर्ण जागा होऊन म्हणतो :

**'नष्टो मोहः स्मृतिर्लब्धा'**

तशा तऱ्हेची स्वधर्माची प्रखर जाणीव द्रोणाला नव्हती, व अश्वत्थाम्याला तर पूर्णपणे आत्मविस्मृती झाली होती, असे म्हणावे लागेल. स्वधर्म गेला, परधर्मही साध्य झाला नाही, अशी त्याची

स्थिती होती. ब्राह्मण म्हणून तो जन्माला आला होता, व बापाने मिळविलेल्या राज्यामुळे तोही राजा – अर्थात अंकित राजा – झाला असता. तो शस्त्रास्त्रे शिकला. भयंकर शस्त्रे त्याने वापरली. पण ती दुर्योधनाला जय मिळवून देण्यासाठी नव्हे, तर सर्वनाश झाल्यावर केवळ स्वतःचा सूड व स्वतःचा बचाव करण्यासाठी. ब्राह्मण्य त्याने गमावलेच होते, व क्षत्रियत्व त्याला कधीही साध्य झाले नाही. मरणापेक्षाही भयंकर असे चिरजीवन त्याला जगावे लागले. आत्मविस्मृतीचे इतके अविस्मरणीय उदाहरण दुसरे नाहीच.

डिसेंबर, १९६५

## आठ

# मी कोण?

माणसाने कोठची तरी गोष्ट सिद्धीस जावी म्हणून ध्यास घेतला व मोठ्या प्रयत्नाने ती सिद्धीस नेली, तरी त्या सिद्धीपायी त्याला फार गोष्टी गमवाव्या लागतात. मानवाचे यश शंभर टक्के तर असत नाहीच, पण पन्नास टक्केसुद्धा हातात पडायची मारामार होते. 'ज्याला जय म्हणतात, तो मला तर पराजयासारखाच वाटतो आहे,' असे म्हणणारा धर्म हेच सांगतो. [जयोऽयमजयाकारो भगवन् प्रतिभाति मे। १२·१·१५.] ह्या सत्याचीच दुसरी बाजू महाभारतात फार विदारक रितीने दाखविली आहे. ती म्हणजे वैफल्य हा मानवी जीविताचा स्थायी भाव होय ही. महाभारतातील प्रत्येक व्यक्ती पराजित व निराश आहे. पण पराजयाबरोबर काही वेळा तरी इतरांच्या वाट्याला जय आलेला आहे. एक व्यक्ती मात्र सर्वस्वी पराजित, असफल व अकृतार्थ आहे. भवभूतीने सीतेला 'मूर्तिमंत

विरह' म्हटलेले आहे. अगदी त्याचप्रमाणे कर्ण हा मानवी शरीर धारण केलेले वैफल्य म्हणता येईल. कर्णाशी समदुःखी, समदैवी असा विदुर होता. पण दोघांच्या बाबतीत जरी काही घटना सारख्या असल्या, तरी काही इतक्या निराळ्या होत्या की, त्यामुळे दोघांच्या आयुष्याच्या वाटा फार-फार निराळ्या झाल्या.

धृतराष्ट्र व पांडू यांचा बाप व्यास. विदुराचाही बाप तोच होता. पण पहिल्या दोघांच्या आया राजकन्या म्हणून त्यांना राज्यपद मिळाले. दोघांनाही व्यंगे होती, तरी राज्योपभोग घेता आला. पांडूमागून राज्याभिषेक न होता धृतराष्ट्राने पंधरा-वीस वर्षे राज्य भोगले. बिचारा विदुर अव्यंग व बुद्धिमान असूनही आईमुळे 'सूत' ठरला. राज्याला पारखा झाला. विदुराच्या आयुष्यातील विफलता जागोजाग प्रत्ययास येते. पण त्याचबरोबर अध्ययनाने व चिंतनाने ह्या विफलतेवर मात करण्याचे त्याचे प्रयत्नही दिसून येतात. जन्मतःच समाजातील स्थान ठरल्यामुळे व आपण कोण ह्याची जाणीव झाल्यामुळे त्या 'आपण'च्या किंवा 'मी'च्या मर्यादा त्याला आखता आल्या; एवढेच नव्हे, तर महत्प्रयासाने लौकिक 'मी'च्या सीमा ओलांडता आल्या.

कर्णाच्या आयुष्याला व अंतःकरणाला जी विफलता ग्रासून राहिली होती, ती हीच होती की, त्याला 'मी कोण?' ह्याचे उत्तर पहिल्यांदा मिळाले नाही, व जेव्हा मिळाले, तेव्हा ते निरुपयोगी ठरले.

सर्वसाधारणपणे मानवी आयुष्यात 'मी कोण?' ह्याचे उत्तर आयुष्याच्या सुरवातीपासून मिळत जाते. हे उत्तर, आयुष्यातील कुठच्याही क्षणी पूर्ण नसते. 'मी'चे परिमाण सारखे वाढत असते, पण त्याचबरोबर 'मी'च्या मर्यादा स्पष्ट होत जातात. जन्मल्यापासून काही वर्षे लहान मुलांना 'मी' या शब्दाची जाणीव नसते. ते

स्वतःचा उल्लेख पुष्कळदा तृतीय पुरुषानेच करतात. मीपणाची जाणीव 'माझे'पणात असते. ही *माझी* आई. हा *माझा* बाप. ही *माझी* खेळणी. हे *माझे* घर. ही *माझी* भावंडे. आणि ज्याच्या भोवती ह्या सर्व वस्तू गोळा झाल्या आहेत, ते केंद्र ते *मी*, ही जाणीव कौटुंबिक व नंतर सामाजिक संबंधांपासून दृढ होऊ लागते. 'ही माझी आई,' ह्या भावनेबरोबरच 'मी हिचा मुलगा,' ही भावना उत्पन्न होते. कुटुंबा-पलीकडे 'मी'चा विस्तार होत राहतो. आणि ज्या-ज्या संबंधांत तो 'मी' जाणवतो, त्या-त्या संबंधांमध्ये त्या 'मी'च्या विरुद्ध असलेला 'मी'हून दुसरा 'तू' किंवा 'तो' हा जाणवतो, व त्या दुसऱ्याच्या 'मी'बद्दलच्या अपेक्षाही जाणवतात. त्या अपेक्षा म्हणजे मनुष्याच्या मीपणाचे निरनिराळे आविष्कार असतात. 'मी' मुलगा असतो, बाप असतो, नवरा असतो, त्याचप्रमाणे एखाद्या शहराचा रहिवासी असतो, एखाद्या जातीचा, कुळाचा असतो. त्यात जसे अधिकार असतात, तशीच कर्तव्येही असतात. आणि एका तऱ्हेच्या 'मी'चा दुसऱ्या तऱ्हेच्या 'मी'पासूनचा फरक निरनिराळ्या सामाजिक प्रसंगांनी व बऱ्याचदा धार्मिक संस्कारांनी स्पष्ट होतो. विदुर सूत म्हणून त्याच्यावर सूताचे संस्कार झालेले होते. त्याचे सामाजिक स्थान अगदी घट्ट, पक्के झालेले होते. भाऊ म्हणून धृतराष्ट्राने त्याला प्रेमाने मांडीवर घेतले, त्याला मिठी घातली. [सोऽङ्कमादाय विदुरं मूर्ध्न्युपाघ्राय चैव ह। क्षम्यतामिति चोवाच। ३·७२०. ह्या प्रकरणात ३·७४ व ३·८४ हे दोन्ही अध्याय वाचावे.] पण त्याला काही कुणी राजकन्या लग्नात मिळाली नाही, किंवा क्षत्रिय म्हणून त्याचा सन्मानही झाला नाही. उपेक्षित जिणे जगूनही 'मी कोण?' हा प्रश्न विदुराला पडला नाही. कर्ण ह्या प्रश्नाच्या दुष्ट भोवऱ्यात सापडला होता. त्याला समाजात निश्चित स्थान नव्हते. त्याच्या मनाला त्याचे स्थान निश्चित करता येत

नव्हते. जे स्थान माझे आहे असे त्याला वाटत होते, ते मिळविण्यासाठी त्याची सारी धडपड होती; आणि ते मिळत नाही, म्हणून तो जन्मभर जळत राहिला.

अधिरथ नावाच्या सूताकडे कर्ण जवळ-जवळ जन्मल्यापासून वाढला. अधिरथाची बायको राधा हिने आपल्या मुलाप्रमाणे त्याला वाढविले. पण तो त्यांच्या पोटचा मुलगा नाही, ही गोष्ट लपवून ठेविलेली नव्हती. जन्माबरोबरच कवच-कुंडले त्याच्या जवळ होती. पुष्कळ द्रव्य त्याच्याबरोबर आलेले होते. त्याला अधिरथाने नाव ठेविले, तेसुद्धा क्षत्रियाचे, – 'वसुषेण' असे. तो कसा सापडला, त्याच्याबरोबर काय होते, ह्या गोष्टी लहानपणापासून त्याला माहीत होत्या. आपण क्षत्रिय आहोत, आज नाही उद्या आपली क्षत्रिय आई किंवा बाप आपला स्वीकार करील, अशी त्याला आशा होती. अधिरथाबद्दल व राधेबद्दल त्याला प्रेम व कृतज्ञता असूनही त्यांच्यातलाच एक म्हणजे सूत म्हणून तो रहायला तयार नव्हता. राजपुत्र नाही, म्हणून त्याला विख्यात गुरूकडे उघड रितीने शस्त्रविद्या शिकता आली नाही. तो चोरून-मारून, आपले नाव लपवून ती शिकला. तीत अतिशय निष्णात झाला. नंतर आपले असामान्य कौशल्य दाखविण्याची त्याने संधी साधली. पण त्याचे परिणाम मात्र भयंकर झाले.

तो प्रसंग असा : धर्मादी पांडवांना व दुर्योधनादी धार्तराष्ट्रांना शस्त्रविद्या शिकवून झाली होती. आपले शिष्य शस्त्रविद्येत किती तरबेज झाले आहेत, हे सर्व कौरवप्रमुखांना दाखविण्यासाठी द्रोणाचार्यांनी मोठा समारंभ केला. मोठे मैदान मध्ये ठेवून भोवती माणसे बसण्यासाठी मांडव घातले. धृतराष्ट्र, गांधारी, भीष्म, विदुर, कुंती व कौरवसभेतील इतर मोठी मंडळी जमली होती. सर्वजण मुलांचे कौतुक

पाहत होती. सर्वांत कमाल केली अर्जुनाने. धनुर्विद्येतील त्याचे असामान्य प्रभुत्व पाहून सर्व जण थक्क झाले. एवढ्यात रंगद्वाराशी गलबला झाला. एक महाकाय, तेजस्वी तरुण पुरुष आत शिरला व म्हणाला, "या अर्जुनाने करून दाखविले, ते सर्व मी करून दाखवितो." त्याप्रमाणे त्याने अर्जुनाने दाखविलेली सर्व करामत करून दाखविली, व नंतर अर्जुनाला द्वंद्वयुद्धास पाचारण केले.

रंगात शिरलेला पुरुष कर्ण होता. तोपर्यंत त्याला कोणी पाहिलेले नव्हते.

महाभारतातील इतर महत्त्वाच्या प्रसंगांप्रमाणे हाही प्रसंग ल्हानसाच, अतिशय गतिमान व नाट्यपूर्ण आहे. काय घडत आहे, त्याची पूर्ण जाणीव होण्याच्या आतच तो संपतो. जे घडत जाते, ते तसे घडेल, असे त्या प्रसंगात सापडलेल्या व्यक्तींच्या स्वप्नीही नव्हते. जे घडले, ते मात्र महाभारताच्या कथावस्तूच्या दृष्टीने अती महत्त्वाचे, कथेची धार वाढविणारे, कथेत काही निराळाच अर्थ भरणारे, असे होते.

द्रोण आपल्या शिष्यांची करामत दाखवीत होता. बाहेरच्या राजपुत्रांना आमंत्रण नव्हते. अशा वेळी कर्ण आगंतुकपणे आत का शिरला असावा? कर्ण आपले कौशल्य दाखविण्यासाठी रंगात जाणार, ही कल्पनाही अधिरथाला नव्हती. ह्या क्षत्रियसभेत जाऊन आपले कौशल्य दाखवावे, म्हणजे खूष होऊन कदाचित आपला क्षत्रिय बाप किंवा क्षत्रिय आई आपला स्वीकार करतील, अशी कर्णाची आशा असावी. आपले कौशल्य दाखवून आपण अर्जुनापेक्षाही वरचे आहोत, अशी वाहवा सर्वांकडून मिळवून त्याला थांबता आले असते. एवढ्याने त्याचा कार्यभाग साधला असता, पण काही कारण नसता त्याने अर्जुनाला द्वंद्वयुद्धास पाचारण केले.

ह्या अनुषंगाने परत एकदा वयाचा प्रश्न येतो. ह्या प्रसंगी धर्म सोळा-सतरा वर्षांचा असेल, तर अर्जुन जेमतेम चौदा-पंधरा वर्षांचा असणार. धर्म अठराचा धरला, तरी अर्जुन पंधरा-सोळाचा असणार. कर्ण कुंतीला कुवारपणी झालेला म्हणजे निदान वर्ष-दोन-वर्षे तरी धर्मापेक्षा मोठा, म्हणजे अर्जुनापेक्षा कमीत-कमी चार वर्षे वडील, — वीस ते बावीस वर्षांचा. ह्या वयात पंधरा व वीस हे अंतर शरिराच्या वाढीच्या दृष्टीने खूपच महत्त्वाचे असे आहे. पंधरा वर्षांचा मुलगा कुमार, तर वीस वर्षांचा तरुण. उंची, रुंदी, बळ सर्वच शारीरिक दृष्टींनी वरचढ. आपली कला दाखवावी हे ठीक; पण पोराशी द्वंद्व मागणे हे वीराला शोभणारे असे वाटत नाही. कर्णाच्या चरित्रात हाच स्वभावदोष दोन-तीनदा खटकतो. आवेशाच्या भरात क्षणिक रागाला बळी पडून तो नको ते करून बसायचा. उतावळेपणा हा एक प्रकारे क्षत्रियांचा धर्मच, पण त्या उतावळेपणातही क्षुद्रपणा दिसता कामा नये, अशा तऱ्हेचा अलिखित नियम होता. कर्णाला तो पाळता आला नाही. त्याला कारण कर्णाचे विफल आयुष्य. क्षत्रियांचे कसब काही प्रमाणात त्याला साध्य झाले. पण क्षत्रियांची आचार-विचारांची, उत्तम क्षत्रियांच्या अशा मानल्या गेलेल्या आचार-विचारांची भूमिका त्याला साधली नाही. क्षत्रियांची अनौरस अवलाद म्हणून त्याच्या मनात एक त्वेष भरून राहिला होता. वेळोवेळी तो राग उफाळून आलेला दिसतो. क्षत्रियांची अनौरस संतती असूनही काही परिस्थितीत क्षत्रियत्व मिळण्याची शक्यता होती. पण ते कर्णाला मिळत नव्हते. 'सूत' या वर्गाला मान्यता मिळावी किंवा क्षत्रियत्व पौरुषावर ठरावे, अशा तऱ्हेची तात्त्विक भूमिका कर्णाने घेतली नव्हती. 'दैवायत्तं कुले जन्म मदायत्तं तु पौरुषम्' ह्या भूमिकेवरून कर्ण भांडत नव्हता. आधुनिक वर्गकलहाचे बीज ह्या

झगड्यात नव्हते. कर्ण स्वतःच्या, एकट्याच्या, स्थानासाठी झगडत होता. शस्त्ररंगातील त्याच्या ह्या वेळच्या धारिष्टाला फळ मिळाले नाही. त्याच्या जन्माचे रहस्य रहस्यच राहिले. आणि आपले क्षत्रियत्व सिद्ध करण्याची पराकाष्ठा करूनही ते मिळाले नाही, म्हणून त्याचा संताप अधिक झाला.

अर्जुनाला त्याने द्वंद्वास बोलाविल्यावर रंगाचे दोन भाग पडले. अर्जुनाच्या पाठीमागे धर्म-भीष्मादी उभे राहिले. कर्णाच्या पाठीमागे दुर्योधन व त्याचे भाऊ उभे राहिले. ज्याला अस्त्रे व युद्धनीती माहीत होती [ द्वन्द्वयुद्धसमाचारे कुशलः सर्वधर्मवित्। ] असा कृप मध्ये उभा राहिला. त्याने रितीप्रमाणेच म्हटले, "हा अर्जुन पांडूचा मुलगा युद्धाला तयार आहे. वीरा, तुझेही नाव, कुल सांग." कर्णाला कूळ सांगता आले नाही. त्याच्या डोळ्यांत अश्रू उभे राहिले.

दुर्योधन ताबडतोब पुढे आला. लढवय्याला कुळाची अपेक्षा का, असा प्रश्न त्याने घातला. अर्जुन जर 'अ-राजा'शी युद्ध करण्यास तयार नसला, तर कर्णाला मी अंगाचे राज्य देतो, असे म्हणून त्याने ताबडतोब तेथल्या-तेथे कर्णाला राज्याभिषेक केला. (हा सर्वच भाग प्रक्षिप्त वाटतो. दुर्योधन त्या वेळी राजकुमार होता. धृतराष्ट्र हा राज्यावर (?) होता. राज्य भीष्माच्या देखरेखीखाली चालले होते. मुलांचे शिक्षण पूर्ण झाले होते. राज्य धर्माला मिळण्याची शक्यता उत्पन्न झाली होती, हे लगेच पुढच्या अध्यायावरून दिसून येते. अशा स्थितीत दुर्योधन कर्णाला कुठचेही राज्य देण्याला असमर्थच होता. त्याने राज्य द्यावे व लगेच तेथल्या-तेथे अभिषेक करावा, ह्या गोष्टी अशक्य म्हणून प्रक्षिप्त वाटतात. हा भाग वगळून पुढे जे घडते, ते मात्र क्रमप्राप्त व अपरिहार्य वाटते.) कृपाने कर्णाला नाव व कुल विचारले, ते कर्णाला सांगता आले नाही. (मध्ये वर सांगितलेला

प्रक्षिप्त भाग.) तो गोरामोरा झाला. इतक्यात मांडवाच्या दरवाजाशी परत गडबड झाली. घाईघाईने, घाबऱ्या-घाबऱ्या उपरणे (उत्तरीय) ज्याच्या पायांत लोळत आहे, असा अधिरथ आत शिरला. त्याला पाहून आदराने कर्ण पुढे झाला व 'बाबा' म्हणून त्याने नमस्कार केला, व 'पुत्रक' (पोरा) म्हणून अधिरथाने त्याला मिठी मारली. 'तू कोणाचा ?' ह्या कृपाच्या प्रश्नाला आपोआप, लागोलाग उत्तर मिळाले. कर्णाला हवे असलेले क्षत्रियत्व तर नाहीच मिळाले, पण सूतपुत्रत्व मात्र जगजाहीर झाले. भीमाने हृदयावर जखम केली. "अरे, तुझ्या धंद्याचे प्रतीक जो चाबूक, तो हातात घे. शस्त्र कशाला धरतोस ?" हे ते भयंकर शब्द होते. दुर्योधनाने कर्णाला मिठी मारली व आपली मैत्री देऊ केली, व कर्णाने ती उपकृत बुद्धीने व आनंदाने स्वीकारली.

सूर्य मावळला. बोलाचाली व भांडणे बंद झाली. शस्त्रविद्या-प्रदर्शनाच्या रंगाचाही शेवट झाला.

'मी कोण ?' ह्या प्रश्नाचा उलगडा तर बाजूलाच राहिला, पण नवीन गुंता मात्र उत्पन्न झाला. त्या वेळी नाही, पण नंतर कधीतरी कर्णाला अंगाचे राज्य मिळाले. राज्य मिळवूनही कर्ण कायम कौरवांच्या दरबारीच राहिला. दुर्योधनाने कर्णाला आपला मित्र म्हटले; पण ती मैत्री अशा स्वरूपाची होती की, कर्णाचा 'मी कोण ?' हा प्रश्न लोंबकळतच राहिला. दुर्योधनाच्या मैत्रीमुळे तो क्षत्रिय होऊ शकला नाही. दुर्योधनाने आपली बहीण किंवा कौरवकुळातील एखादी राजकन्या कर्णाला दिली नाही. याउलट कर्णाने स्वतःच उद्योगपर्वात सांगितल्याप्रमाणे त्याचे लग्न एका सूतकुळातील मुलीशी झाले, व पुढे त्याच्या मुलामुलींचीही लग्ने सूतकुळातच झाली. ज्या घटकेला व प्रसंगात दुर्योधनाने कर्णाला जवळ केले, तो प्रसंगच अशा तऱ्हेचा

होता की, दुर्योधनाचे व कर्णाचे नाते अगदी बरोबरीच्या मित्राचे झाल्यासारखे दिसत नाही. तो अगदी जवळचा पण स्वामिभक्त नोकरच राहिला. दुर्योधनाच्या प्रेमापेक्षा दुर्योधनाच्या उपकाराखाली कर्ण दबलेला होता. ह्यामुळे लौकिकात कर्णाचे सूतत्व अढळ झाले. आपण खरे सूत नाही, ही भावना मात्र दृढच राहिली. आणि वरून तर पूर्णपणे सूतत्व पदरी बांधले गेले. ह्या भयंकर परिस्थितीत त्याचे मन आतल्या-आत कुढत राहिले. पांडवांचे व आपले काही नाते आहे, हे त्याला माहीत नव्हते. असे असूनही त्याने पांडवांशीच वैर का धरले, ह्याला तीन कारणे असू शकतील. शस्त्ररंगात भीमाने त्याचा अपमान केला होता. अर्जुन त्या वेळचा मोठा योद्धा म्हणून अर्जुनाशी त्याची स्पर्धा होती. आणि पांडवांचा कट्टा वैरी जो दुर्योधन त्याचा तो मित्र झाला होता. त्याच्या दुर्दैवाने स्पर्धेच्या प्रसंगी तो कमी ठरला व त्याची हृदयव्यथा वाढतच राहिली.

पांडवांना लाक्षागृहात जाळायच्या कटात कर्ण नसावा. त्या कटात मुख्य मसलत धृतराष्ट्र व दुर्योधन या दोघां बाप-लेकांचीच होती, असे दिसते. हा कट फसल्यावर मात्र पुढील सर्व प्रसंगांत कर्ण दुर्योधनाच्या मसलतीत होता. एका आवृत्तीप्रमाणे द्रौपदीस्वयंवराच्या वेळी स्वयंवराचा पण जिंकायचा प्रयत्न कर्णाने केला. हा प्रसंग प्रक्षिप्त म्हणून नव्या आवृत्तीत वगळलेला आहे. कदाचित कर्णाचे धनुर्विद्येचे कसब पण जिंकण्याइतके मोठे नव्हते, किंवा दुर्योधन तेथे असल्यामुळे कदाचित आपण दुर्योधनाचे प्रतिस्पर्धी होऊ नये, म्हणून त्याने जिंकण्याचा विचारही केला नसेल. काही का असेना, दुसऱ्या कोणालाही जे करता आले नाही, ते अर्जुनाने केले, व लढाईतही त्याने कर्णाला हात दाखविला. ह्या प्रसंगी अर्जुन ब्राह्मणवेषात होता. अर्जुन ब्राह्मण म्हणून कर्ण त्याच्याशी फार लढला नाही, असे म्हटले

आहे. त्यात तितकेसे तथ्य वाटत नाही. एका ब्राह्मणाने क्षत्रियकन्या जिंकली, म्हणून सर्व राजे रागावून लढाई करावयाला निघाले होते. कर्णानेही लढाई केली. आणि मग अर्जुन ब्राह्मण आहे, म्हणून लढाई अर्ध्यावर सोडून दिली, हे विचित्र दिसते. ह्या ब्राह्मणाला चोपून काढायला वेळ लागणार नाही, असे सर्वांना वाटले होते. पण जेव्हा अर्जुन व त्याच्या मदतीला भीम ह्यांनी अचाट पराक्रम केला, तेव्हा मध्येच 'तू ब्राह्मण आहेस का कोण आहेस?' हा प्रश्न विचारून लढाई सोडून देणे अप्रस्तुत वाटते.

द्यूतपर्वात एका तऱ्हेने सर्वांचीच परीक्षा झाली. 'आता काय झाले, आता काय झाले' असे विचारणाऱ्या, हावऱ्या, अंधळ्या धृतराष्ट्राची परीक्षा झाली. पांडवांनी सगळे घालविले, तेव्हा 'गौ, गौ, गौ, गौ' म्हणून ओरडणाऱ्या दुःशासनाची परीक्षा झाली. द्रौपदीवस्त्रहरणाच्या वेळी होणाऱ्या हिडीस प्रकाराला आळा घालावा, म्हणून धडपडणाऱ्या विदुराची परीक्षा झाली. त्याचबरोबर ह्या सर्व लोकांशी ज्याचे काही नातेगोते नव्हते, त्या कर्णाचीही परीक्षा झाली, व तो सर्वस्वी हीन ठरला. द्रौपदीला सभेत ओढून आणलेली होती. ती दासी आहे किंवा नाही, ह्या प्रश्नाचा उहापोह चालू होता. दुर्योधनाचा धाकटा भाऊ विकर्ण उठून म्हणाला होता की, 'अशा तऱ्हेने सतीला ओढून आणणे बरोबर नाही, ती दासी होत नाही.' या वेळी कर्ण रागारागाने उभा राहिला, व त्याने विकर्णाची निर्भर्त्सना केली. "पाच पुरुषांची बायको, ही कसली पतिव्रता! ती तर स्वैरिणीच. तिला सभेत ओढून आणणे ह्यात गैर काहीच झाले नाही. ह्या सर्वांनी आपले सर्वस्व गमावले आहे. ते दास झाले आहेत. आपल्या वस्त्रावरसुद्धा त्यांचा हक्क नाही. काढा त्यांची वस्त्रे." हे शब्द ऐकल्याबरोबर पांडव आपली नेसती वस्त्रे सोडून सभेत बसले,

व दुःशासनाने कर्णाच्या सांगण्यावरून द्रौपदीचे वस्त्र फेडावयास सुरवात केली. कर्ण उठून बोलेपर्यंत चर्चा चालली होती; पण त्याने उठून द्रौपदीची विटंबना करण्यास उघड प्रोत्साहन दिले. संपत्तीबद्दल, राज्याच्या वाटणीबद्दल पुरुषां-पुरुषांत भांडण होते ते युद्धाने सोडवावे, वाटल्यास फासे खेळून सोडवावे; पण या भांडणामध्ये पराभूतांच्या बायकोची भरसभेत विटंबना करावयाचे कारण नव्हते. कर्ण सूत आहे की क्षत्रिय आहे, हा प्रश्न येथे नव्हता. सामान्य मानवधर्माचा प्रश्न होता. प्रश्न कायद्याचाही नव्हता. एका कुलस्त्रीची अब्रू घ्यायची का नाही, इतका सोपा प्रश्न होता. ह्या भावां-भावांच्या भांडणात कर्णाने अशा तऱ्हेने भाग घ्यायला कारणही नव्हते. पण कर्ण त्यात पडला आणि सूडापायी तो सदसद्विवेक अजिबात विसरू शके, हे सिद्ध झाले.

घोषयात्रेच्या प्रसंगाने परत एकदा कर्णाला मान खाली घालावी लागली. त्या वेळी प्रत्येक राजाचे मोठमोठे गुरांचे कळप असत. हे कळप राज्याच्या हद्दीला लागून असलेल्या रानाशेजारी असत. कळपांची देखरेख करणारे अधिकारी असत. अधून-मधून खुद्द राजा कळपांची देखभाल करण्यासाठी जात असे. मागच्या वेळी असलेल्या गुरांच्या कळपात ज्या नव्या वासरांची भर झाली असेल, त्यांच्या अंगावर राजाच्या मालकीचे चिन्ह उमटवीत असत. बहुतेक हे चिन्ह म्हणजे तापलेल्या मुद्रेचा डाग असावा. पांडव वनात गेल्यावर हस्तिनापूरच्या लगतच्याच अरण्यात राहत होते. घोषयात्रा म्हणजे गोठ्यांची तपासणी करण्यासाठी केलेला प्रवास होय. ह्या निमित्ताने बायका, मुले व मोठा लवाजमा घेऊन रानात जायचे व आपल्या वैभवाचे प्रदर्शन करून निर्वासित पांडवांना खिजवायचे, हा या यात्रेचा मुख्य उद्देश होता. त्या यात्रेच्या वेळी एका गंधर्वाशी काहीतरी

कुरापत निघून भांडण उद्भवले. त्या भांडणात गंधर्वांनी कौरवांना मारून काढले व दुर्योधनाला कैद करून नेले. ह्या हाणामारीत कर्ण पळून गेला व त्याने एका जवळच्या खेड्यात आश्रय केला. शेवटी पांडवांनी दुर्योधनादी कौरवांना सोडविले व त्यांची परत पाठवणी केली. पांडवांनी कौरवांना सोडविले हे कळायच्या आधीच राजा कैद झाला, ही बातमी हस्तिनापुराला पोहोचली होती, व भीष्म सैन्य घेऊन राजाला सोडवायला निघाला होता. तेवढ्यात त्याला सुटकेचीही हकीकत कळली. वाटेत कर्ण भेटला. त्याने राजा कोठे आहे, कसा आहे, वगैरे विचारपूस केली. भीष्माने ताबडतोब उत्तर केले, "राजा जिवंत आहे ना, हे विचारावयाला खरे स्वामिभक्त जिवंतच राहत नाहीत. राजाला संकटात टाकून तू पळून आलासच कसा? तुझे राजावरचे प्रेम हे थोतांड आहे." कर्णाने दुर्योधनाच्या मित्राची भूमिका स्वीकारली होती. 'मी कोण?' ह्याचे उत्तर त्याच्या मते 'मी दुर्योधनाचा मित्र,' असे होते, पण ह्या प्रसंगाने व भीष्माच्या धिक्काराने त्याची परत एकदा जीवघेणी परीक्षा झाली व ती तो उतरला नाही.

ह्या पुढचा प्रसंग गोग्रहणाचा. त्या वेळी तर अर्जुन एकटा होता व कौरवांच्या बाजूने लहान-मोठे सर्व वीर होते. तेथेही कर्णाचे अर्जुनापुढे चालले नाही. अर्जुनाने सगळ्यांचा पराभव केला; एवढेच नव्हे, तर त्यांची सुंदर तलम वस्त्रे हिरावून घेऊन त्याने ती उत्तरेला बाहुलीसाठी म्हणून दिली. हा प्रसंग जरी वगळला, तरी त्याने कौरवांना पिटाळून लाविले व विराटाच्या गाईही सोडविल्या, ह्यात शंका नाही. 'आता युद्ध नको. राजाला मध्ये घालून माघारी वळा,' हा भीष्माचा इशारा सर्वांनी पाळला, अशी एक पळवाट कर्णाला ह्याही प्रसंगी आहे, पण तीत अर्थ दिसत नाही. कौरव विराटाच्या

राज्यात शिरले होते. गाई पळवायच्या, हा त्यांचा उद्देश. तो सिद्धीस गेला नाही तर परक्या राज्यात, परक्या देशात त्यांच्यावर बाका प्रसंग आला असता. अशा तऱ्हेची लूटमार त्वरेने करावी लागते; मोठ्या लढाईला वेळ नसतो; वेळ गमावला, तर शत्रूला आणखी सेना आणता आली असती, म्हणून निघून जाणेच योग्य होते, वगैरे सर्व मुद्दे लक्षात घेतले, तरी अर्जुनाने आपल्या कौशल्यामुळे सैन्याने वेढलेल्या गाईंना मोकळे केले; गाई उधळून लावल्यावर कौरवांनाही हात दाखविला; व त्यांना मागे परतण्यावाचून गत्यंतर नाही अशी स्थिती आणली, ह्यांत शंकाच नाही. अर्जुनाला भेकड सारथी मिळूनही रथातून लढण्याचे – महारथित्वाचे – आपले कौशल्य त्याने प्रकट केले. कर्ण युद्धविद्येत अर्जुनापेक्षा कमी ठरला.

कर्णकथेत सूर्याची निरर्थक लुडबूड जिथे-तिथे दिसते. 'इंद्र कवच-कुंडले मागायला येईल ती तू देऊ नकोस,' असे म्हणे सूर्याने कर्णाला सांगितले. तसेच, 'तू माझा मुलगा,' असे कुंती म्हणाली, तेव्हाही 'कुंती म्हणते ते खरे आहे. कर्णा, आईचे ऐक," असे सूर्य बोलला. कर्णाने दोन्ही वेळा त्याचे ऐकले नाही. गोष्टीच्या परिपोषाच्या दृष्टीने सूर्याची ही भाषणे अगदी निरुपयोगी व अवास्तव आहेत. सूर्याला मुलाची एवढी काळजी होती, तर शस्त्ररंगाच्या वेळी 'हा माझा मुलगा,' असे तो का बोलला नाही? ह्या आकाशवाणीने कर्णाचे क्षत्रियत्व सिद्ध झाले नसते, पण देवपुत्रत्व तरी त्याला मिळाले असते.

कर्ण सूर्यपूजा का करीत असे, तेही समजत नाही. कुंडले ही वस्तु कान फाडून देण्यासारखी आहे. पण सहजकवच अंगावरून सोलून रक्तबंबाळ होऊन दिले, म्हणजे काय? सहजकवच गेल्यावर कर्ण कांही लढाईत कवचहीन लढला नाही. अर्जुनाच्या बाणांनी त्याचे कवच

फोडले, असे वर्णन आहे. जे इतरांना नाही, ते कर्णाजवळ होते. त्यामुळेच आपण वास्तविक सूतपुत्र नाही, ह्याची त्याला मनातून खात्री होती. कवच-कुंडलांमुळे तो अजिंक्य होता का? ती देण्याने त्याने मरण ओढवून आणले, असे म्हणावे का? कवच-कुंडले असतानाही द्रौपदीस्वयंवरात, घोषयात्रेत व गोग्रहणाच्या वेळी तो पराभव पावला होताच. मग ही आत्यंतिक दानशूरता तरी का? 'मी कोण?' ह्याच्या शोधापायीच असे झाले का? आपली छाप इतरांवर पाडायची गरज त्याला वाटत होती. त्याच्या मनातील खळबळीचा, समाजातील स्थान पक्के नसल्यामुळे वाटणाऱ्या दैन्याचाच हा परिणाम असेल का? कर्णाच्या प्रत्येक कृत्यात अपेक्षित मर्यादांचे उल्लंघन दिसते. शस्त्ररंगात त्याने आपले नैपुण्य दाखविले, ते योग्य होते; पण अर्जुनाशी द्वंद्व करावयास मागणे म्हणजे अतिप्रसंगच होता. तीच गोष्ट द्रौपदीवस्त्रहरणाच्या वेळची. पांडवांची मानहानी होत होतीच. कर्णाने मध्ये पडण्याचे कारण नव्हते. पण त्याला राहवले नाही. दुष्कृत्यच नव्हे, तर सत्कृत्यातही तो पटदिशी साधारण माणसांच्या मर्यादा ओलांडून काहीतरी जास्त करण्याच्या मोहात पडे.

कर्णाच्या आयुष्यात काही क्षण सोन्याचे ठरले. कुठच्यातरी वेळी मोठे सुख, मोठी ऋद्धी वा मोठा मान मिळाला म्हणून नव्हे, लौकिकाने तो होता तोच राहिला, पण त्याच्या मनातल्या व्यथा नाहीतशा व्हाव्या, असे ते क्षण होते. 'आपण कोण?' ह्याचे त्याला उत्तर मिळाले; पण त्याच क्षणी त्याने त्या उत्तराने उद्भवणाऱ्या पेचातून मोठ्या उदात्तपणे आपली सुटका करून घेतली. कर्णाच्या पूर्वीच्या व पुढच्याही आयुष्यात मनाचा गोंधळ दिसून येतो. पण ह्या दोन प्रसंगांतील त्याचे बोलणे व त्याचे कृत्य ह्यात विचारांचा विलक्षण स्पष्टपणा दिसतो. कोठेही शंका नाही, की गोंधळ नाही. सर्व

गढूळपणा जाऊन मन आरशासारखे लक्ख झालेले दिसते. हे दोन्ही प्रसंग मानवी पातळीवरचे आहेत व त्यात कर्णाची आणखी एकदा परीक्षा—अतिशय कठीण परीक्षा झाली आहे. कर्ण ह्या परीक्षेत उतरला, तो सर्वस्वी मानवी पातळीवरच. काहीही दैवी, अतिमानुष, अत्युदात्त असे न दाखविता. त्याही वेळी त्याची निराशा, संताप,—सर्व काही व्यक्त होते. पण ते व्यक्त करताना त्याच्यात दीनपणा दिसत नाही. दोहोंपैकी एक प्रसंग कृष्णाने त्याला 'तू पांडवांच्या बाजूचा हो,' म्हणून गळ घातली तेव्हाचा; व दुसरा प्रसंग कुंतीने त्याला ओळख दिली तो. कृष्णाने कधी नव्हत, अशी आमिषे दाखविली. ज्यासाठी तो जन्मभर झगडला, ते सर्व व त्याने कल्पना केली असेल त्यापेक्षा कितीतरी जास्त त्याला देऊ केले. तो क्षत्रिय म्हणून सिद्ध होत होते; त्या वेळच्या उच्चतम कुळातला म्हणून त्याला मान मिळत होते; राज्य मिळत होते; ज्यांचा जन्मभर दुस्वास केला ते हात जोडून चाकर म्हणून उभे रहावयाची शक्यता होती. पण ह्या सर्वांवर कर्णाने पाणी सोडले. तेही सहज, विचार न करता, शिव्या न घालता, कृष्णाला काहीही दुरुत्तरे न बोलता. "कृष्णा, तू म्हणतोस ते अशक्य आहे. माझा जन्म सूतांमध्ये गेला. माझ्या व माझ्या मुलांच्या सर्व सोयरिकी सूतांमधल्या आहेत. मी आता त्यांच्यातून बाहेर पडणे अशक्य आहे. राज्य मिळाले, तरी मी ते दुर्योधनाच्या पायाशीच वाहीन. जा, माझे मन वळवायच्या भानगडीत पडू नकोस." (ह्या भाषणानंतर कृष्णाची देव म्हणून स्तुती व पांडव कसे अजिंक्य आहेत, कौरवांचा वध होणार हे कसे नक्की ठरलेले आहे, अशा अर्थाचे एक लांबलचक वाक्य कर्णाच्या तोंडी घातलेले आहे ते अप्रस्तुत व मागहून घुसडलेले असावे, असे वाटते.) 'नशीब तुझे,' असे म्हणून कृष्ण निघून गेला. ह्या प्रसंगात

कर्ण एक असामान्य व्यक्ती, खरा मित्र, दत्तक घराण्याला निष्ठेने, प्रेमाने बांधलेला पुरुष, कोणत्याही लाचेला बळी न पडणारा सेवक, अशा अनेक गुणांनी उठून दिसतो. इतर ठिकाणी दिसणारा उतावीळपणा, उखाळ्या-पाखाळ्या काढण्याची खुमखूम ह्यांचा ह्या प्रसंगी मागमूससुद्धा नाही.

दुसरा प्रसंग कुंतीशी जे संभाषण झाले तो. त्यात राग आहे. वैफल्याची धार आहे. पण त्यातही क्षुद्रपणा नाही. बोलणे कितीतरी लांबवता आले असते. कुंतीमुळे कर्णाला किती दुःखे भोगावी लागली, ह्याचे खूप वर्णन देता आले असते; पण सर्व प्रसंग अगदी थोडक्यात वर्णिला आहे. भाषण मुख्यतः कर्णाचेच आहे. कुंती उत्तर देऊ शकतच नव्हती. कुंती त्याला गंगातीरी भेटली. त्याने आपली सूर्योपासना संपवून तिला नमस्कार करून येण्याचे कारण विचारले. तिने त्याच्या जन्माचा वृत्तान्त सांगितला, व "आता पांडवांच्या बाजूचा हो. ते तुझे भाऊ आहेत. कर्णार्जुनांचा प्रताप जगाला पाहू दे. तू सूतपुत्र नाहीस. प्रतापी हो." वगैरे त्याला सांगितले. (येथे मध्येच तीन श्लोक घुसडलेले आहेत. ते म्हणजे सूर्याने आकाशातून कर्णाला उद्देशून सांगितलेली वाक्ये.)

कर्णाने उत्तर दिले, ते थोडक्यात व अगदी निर्वाणीचे असे आहे. त्या उत्तरातील एक ओळ मात्र नीट लागत नाही. 'धर्मद्वारं ममैतत्स्यान्नियोगकरणं तव' ही ती ओळ. नियोगाच्या हकीकतीमुळे मला धर्मद्वार मोकळे झाले, असा अर्थ होईल. 'नियोग'-शब्दाचा अर्थ येथे नेहमीपेक्षा निराळा आहे. कर्ण म्हणाला, "बये, नियोगाची जी हकीगत सांगितलीस, त्यामुळे माझ्या धर्माचे दार मला मोकळे होईल, अशी तुझी कल्पना असली, तर चूक आहे. तुझ्या हकीकतीमुळे मला क्षत्रियत्व मिळाले, पण माझ्यावर कोणतेही क्षत्रियसंस्कार

झालेले नसल्यामुळे हे क्षत्रियत्व कुचकामाचे आहे. जन्माच्या वेळी संस्कार व्हायचे, तेव्हा निर्दयपणे तू मला टाकून दिलेस. आज मात्र आप्पलपोटेपणाने माझ्याकडे आलीस. कृष्ण ज्याच्या पाठीशी आहे, त्या धनंजयाची भीती कोणास वाटणार नाही? मी जर आज दुर्योधनाला सोडले, तर भीतीमुळे मी पांडवांना मिळालो, असे इतर क्षत्रिय म्हणतील. माझ्या जिवावर त्याने हे युद्ध मांडले आहे. जा, तू सांगतेस, ते कदापि होणे शक्य नाही. मात्र मी फक्त अर्जुनाला मारीन, इतर पांडवांना सोडून देईन. मला अर्जुनाने मारले, तर तुझे पाच आहेतच; मी अर्जुनाला मारले, तरी मला धरून तुझे पाचच राहतील. जा." कुंती काय बोलणार? 'आपले वचन पाळ,' असे म्हणून ती निघून गेली. कृष्णाला दिले, तसेच हे उत्तर आहे. त्यात कुंतीचा धिक्कार आहे. तिच्या कृत्यामुळे आपल्या आयुष्याचे वाटोळे कसे झाले, तेही सांगितलेले आहे. कोठल्याही मोहाला बळी न पडता दुर्योधनाला न सोडण्याचा निश्चय कर्णाचे मोठेपण दाखवतो. तरीही शेवटी एक गोष्ट खटकतेच. ती म्हणजे मारीन तर फक्त अर्जुनाला, इतरांना नाही, हे कुंतीला दिलेले वचन! हे वचन म्हणजे औदार्याची परिसीमा! मग त्यात खटकण्यासारखे काय?

हे वेडे औदार्य म्हणता येईल; पण तरी औदार्य, मनाचा मोठेपणा, हा कसा नाकबूल करता येईल? नाकबूल करायला कारणे दोन. कर्णाची कृती बऱ्याच वेळा अतिरेकी म्हणून वर जे म्हटले आहे, त्यापैकीच हा प्रकार वाटतो. कुंतीबद्दल त्याला प्रेम वाटले नाही, कणवही आली नाही. तथाकथित भावांबद्दलही त्याला काडीचे सोयरसुतक नव्हते. 'इतरांना सोडीन,' हे म्हणण्यात एक प्रकारची वल्गना होती. ज्यांना 'सोडीन' म्हटले, त्यांच्याबद्दल तुच्छता होती. मला जो माझ्या तोडीचा वाटतो, त्याचा वध करीन, इतरांशी मला

कर्तव्य नाही, असा ह्या म्हणण्याचा अर्थ आहे. अशी वल्गना व इतरांबद्दल तुच्छता हा गुण क्षत्रियाला शोभेसाही होता. पण ज्या प्रसंगी त्याने हे वचन दिले, त्या प्रसंगाला तो योग्य नव्हता. युद्ध खरखुरे होते. ते काही शस्त्ररंग नव्हते. स्वतःची शेखी मिरवण्यापेक्षा दुर्योधनाला जय मिळवून द्यावयाचा, हे त्याचे कर्तव्य होते. इतर भावांना – विशेषतः धर्माला न मारण्यात दुर्योधनाचे अहित होते. धर्म मरता किंवा त्याहीपेक्षा कैद होता, तर युद्धाचा निकाल दुर्योधनाच्या बाजूने लागण्याचा फार संभव होता. स्वतःच्या मोठेपणात कर्ण दुर्योधनाचे हित विसरला, असे म्हणावे लागते. हे वचन औदार्याने दिलेले नसून उद्धटपणे दिलेले होते.

ह्या प्रसंगाने कर्णाला 'मी कोण?' ते कळले. त्या 'मी'ला योग्य अशी भूमिका उघडपणे स्वीकारता येणे शक्य नव्हते, हे जाणून कर्णाने त्या 'मी'चा लौकिकात स्वीकार केला नाही, पण मनातून तरी त्याचे जन्मभराचे बंधन सुटून त्याला मोकळे झाल्यासारखे वाटायला पाहिजे होते. ज्यासाठी जिवाचे रान केले, ते क्षत्रियत्व त्याला मिळाले व मित्रासाठी लीलेने त्याचा त्यागही त्याने केला. कर्ण असामान्यत्व पावला. ह्या एका क्षणाने कर्णाचे आयुष्य सफल झाले, असे म्हणता आले असते, पण ह्यानंतरच्या त्याच्या काही आठवड्यांच्या आयुष्यात त्याच्या जीवनाला नेहमीचे वळण परत मिळाले. कर्णाला इतरांनी खाली ओढले, व कर्ण स्वतःच्या कृत्यांनीही आपणहून खाली गेला.

भीष्माने रथी कोण व अतिरथी कोण, ह्याची नोंद केली, त्या वेळी कर्णाला 'अर्धरथी' म्हटले. कर्णाच्या उतावळेपणाचा उल्लेख करून त्यामुळे तो अर्धरथी आहे, असे भीष्म म्हणाला. भीष्माचे मत क्षत्रियत्व, सूतत्व अशा काही सामाजिक मूल्यांवर आधारलेले नव्हते.

तो कर्णाचा स्वतःचा असा एक अवगुण दाखवीत होता. कर्णाला राग आला, पण सर्व महाभारत विचारात घेता भीष्माचे मूल्यमापन बरोबर वाटते. रथी रथात उभा राहून युद्ध करणारा असे, त्याचप्रमाणे रथ हाकणाराही असे. कृष्णाला दोन्ही अवगत होत्या. तशाच अर्जुनाला व भीष्मालाही. कर्ण सूतांत वाढला, पण त्याने रथ हाकल्याचे वर्णन नाही. रथात बसून तो लढे, पण रथ चालविण्याची विद्या रथातून युद्ध करताना उपयोगी पडणारी असेल, असे वाटते. चालत्या रथातून नेम धरावा लागे. त्यात कर्ण कच्चा होता, हे पुढील हकीकतीवरून दिसून येतेच.

ह्या भांडणाची हकीकत सुसंबद्ध नाही. एके ठिकाणी म्हटले आहे की, 'मी सेनापती असेपर्यंत कर्णाने लढता कामा नये,' अशी अट भीष्माने घातली. भीष्माचे सेनापतिपद लढाई करण्यासाठी नसून लढाई थांबवायचा तो एक शेवटचा प्रयत्न होता, असे मी म्हटले आहे. तसे असेल, तर भीष्माच्या दृष्टीने वरील अट सुसंगत वाटते. पण दुर्योधनाने ती बिनतक्रार कशी कबूल केली, ह्याचे नवल वाटते. दुसऱ्या ठिकाणी म्हटले आहे की, 'भीष्म उभा असेपर्यंत मी लढणार नाही,' असे कर्ण रागावून म्हणाला. कर्णानेही असे म्हणणे त्याच्या स्वभावाला धरूनच आहे.

ह्या प्रसंगी भीष्माचे म्हणणे द्रोणानेही उचलून धरले आहे. तो म्हणतो, प्रत्येक लढाईत हेकेखोर, पळून जाणारा (?), दयाशील व चुका करणारा असा हा कर्ण असल्यामुळे माझ्या मतेही तो अर्धरथीच आहे. [रणे रणेऽतिमानी च विमुखश्चैव दृश्यते। घृणी कर्णः प्रमादी च तेन मेऽर्धरथो मतः ॥] द्रोण शस्त्रास्त्रे शिकविणारा होता. भीष्माचे नाही, तर द्रोणाचे मत विचारात घेऊन आत्मशोधन करण्याची कर्णाला शक्यता होती. 'माझ्या बुद्धीचे व शरिराचे बळ असूनही

परिस्थितीमुळे मला रथविद्या व शस्त्रविद्या संपादन करता आली नाही,' ही जाणीव कर्णाला झाली असती; आपल्या कर्तृत्वाच्या मर्यादा कबूल कराव्या लागल्या असत्या; पण कर्ण आत्मशोधन करणारा नव्हताच. 'मी कोण?' ह्या प्रश्नाचा खोल विचार करणाराही नव्हता.

भीष्म पडल्यावर कर्ण रणांगणात उतरला. आता तो सेनापती होणार, असे वाटू लागले. 'आम्हांला कर्ण सेनापती हवा, आम्हांला कर्ण सेनापती हवा,' म्हणून सैन्याचा घोष चालला होता. कर्णही मोठ्या रथात बसून वैभवाने रणभूमीवर आला. पण 'सर्वांना पसंत पडेल, अशा माणसाला म्हणजे द्रोणाला सेनापती कर,' म्हणून त्यानेच दुर्योधनाला सल्ला दिला. द्रोणाच्या आधिपत्याखाली हमरीतुमरीचे युद्ध झाले व दोन्हीकडचे मोठे वीर कामास आले. ह्या तीन दिवसांत अर्जुनाला मारावयाची संधी कर्णाला मिळाली नाही, इतकेच नाही, तर इंद्राने दिलेली अमोघ शक्ती घटोत्कचावर चालवावी लागली. ह्या तीन दिवसांतच कौरववीरांनी पाचसहा जणांनी मिळून अभिमन्यूला – अर्जुनाच्या मुलाला – विरथ करून मारले.

द्रोण मेल्यावर युद्धाच्या सोळाव्या दिवशी कर्ण सेनापती झाला. दोन्हीकडची खूप हानी झाली होती; पण जयाचे पारडे पांडवांच्या बाजूला होते. 'लढाई थांबव, संधी कर,' असे अश्वत्थामा दुर्योधनाला सांगत होता. दुर्योधन कर्णावर विसंबला होता. जे इतरांना साधले नाही ते कर्ण करील, अशी त्याला खात्री होती. आता कर्णाच्या मनात असते, तरी त्याला माघार घेता आली नसती. माघार घेण्याचा विचारही कर्णाला सुचला नाही. कर्ण सेनापती असतानाच्या पहिल्या दिवसात काही घडले नाही. दुसऱ्या दिवशी सारथी म्हणून शल्याची मागणी करणे त्याला सुचले. ह्या मागणीपायी त्याला बराच अपमान सहन करावा लागला.

कर्णपर्वात विचार करायला लावतील, अशा घटना पुष्कळ आहेत. त्यातलेच एक हे तेजोभंगाचे प्रकरण. शल्य हा माद्रीचा भाऊ, व नकुल-सहदेवांचा म्हणजे पर्यायाने पांडवांचा मामा. दुर्योधन त्याला पहिल्याने भेटला, म्हणून त्याने त्याच्या बाजूला मिळण्याचे व लढण्याचे कबूल केले म्हणे. मागाहून धर्म आला. त्याला त्याने सांगितले, "काय करावे? दुर्योधन पहिल्याने आला. मला 'नाही' म्हणता येईना. पण कर्णाचे सारथ्य करून मी त्याचा तेजोभंग करीन व अशा तऱ्हेने आतून तुम्हांला मदत करीन." हा सर्वच प्रसंग व हे संभाषण अशक्य वाटते. कर्ण शल्याला सारथी म्हणून मागेल, ह्याचे काय शल्याला स्वप्न पडले होते? आतून शल्य पांडवांच्या बाजूचा होता, ह्याही देखाव्यात तथ्य नाही. कारण कर्णाच्या पाठोपाठ पांडवांनी त्यालाही मारलेच. मद्रदेशालाच बाल्हीक, असे महाभारतात म्हटले आहे. हस्तिनापूरच्या घराण्याचा व बाल्हीकांचा संबंध खूपच जुना होता. शंतनूचा बाप जो प्रतीप त्याची एक राणी मद्रांची ऊर्फ बाल्हीकांची माहेरवाशीण होती. शंतनूचा एक भाऊ मामाघरी दत्तक गेला होता. त्याचा मुलगा वा नातू सौमदत्ती दुर्योधनाच्या बाजूने लढला व मेला. शल्याची सक्खी बहीण म्हणा, चुलतबहीण म्हणा, पांडूला दिली होती,—म्हणजे वडील घराण्यांचा संबंध चालू राहिला होता. ज्याप्रमाणे इतर बाल्हीक दुर्योधनाच्या बाजूला म्हणजे वडील घराण्याच्या बाजूने लढले, तसा शल्यही लढला. कदाचित इतकी अटीतटीची लढाई होईल, अशी त्याला कल्पना नसेल. एवढे मात्र खरे की, तो पांडवांच्या विरुद्ध बाजूला होता व म्हणून जी घटना घडेल अशी त्याला कल्पना नव्हती, त्याबद्दल धर्माला तो काही वचन देऊ शकेल, हे अशक्यच वाटते.

तसेच तेजोभंगाचे प्रकरणही पटत नाही. एका बाजूला अर्जुन

व एका बाजूला कर्ण अशा दोन मुख्य व्यक्ती ह्या पर्वात आहेत. अर्जुन दररोज (एक दोन दिवस वगळल्यास) संशप्तकांशी लढत होता. ह्याही दिवशी अर्धा दिवस लढल्यावर तो मुख्य सैन्यात परत आला. धर्म कुठे दिसेना, म्हणून त्याने भीमाला विचारले, "राजा कुठे आहे?—" भीम म्हणाला, "काय की; मला नक्की माहीत नाही. फार जखमी होऊन तो शिबिरात गेला आहे. मेला आहे की जिवंत आहे, मला सांगता येणार नाही." भीम महाभयंकर लढाईत गुंतला होता. त्याला राजाचे काय झाले हे खरोखर ठाऊक नव्हते, की तो अर्जुनाला चेव आणायला असे बोलला, ते कळत नाही. अर्जुन ताबडतोब शिबिरात गेला. "कर्णाला मारून आलास ना? शाबास!" ह्या शब्दांनी धर्माने त्याचे स्वागत केले. "तुझी विचारपूस करायला आलो," हे अर्जुनाचे शब्द ऐकल्यावर धर्म भडकला व अर्जुनाला इतके टाकून बोलला की, अर्जुन संतापाने भावाला मारायला उठला. शेवटी कृष्णाने हा सर्व प्रकार हसण्यावारी नेऊन भावां-भावांत दिलजमाई करून दिली व "आता चल. कर्णावर तुटून पडू," म्हणून त्याने रथ हाकला. हा प्रकार तेजोभंगाचा की चेव आणण्याचा? शल्याचे कर्णाशी बोलणेही ह्या प्रकारचेच होते. शल्य मोठ्या मिनतवारीने कर्णाचा सारथी झाला. "मी मूर्धाभिषिक्त राजा. कर्णाचा सारथी होणार की काय?" ह्या शल्याच्या वाक्याने कर्णाला अंगराजपदाचा अभिषेक झाला होता की नाही, अशी शंका मनात परत डोकावते. शल्य सारथी झाल्यावर अर्जुनाप्रमाणे रथाला पांढरे घोडे जोडून जयघोष करीत कर्ण निघाला. बरोबर शस्त्रांनी व बाणांनी भरलेला दुसरा रथ होता. "अर्जुन कोठे आहे ते मला दाखवा, आत्ता त्याला ठार करतो. कोठे दिसत नाही कसा? कोणी पाहिला आहे का त्याला? कुठे गेला आहे तो?" अशा आरोळ्या देत कर्ण

निघाला. हे ऐकून शल्याने कर्णाला डिवचले की, "बाबा, व्यर्थ बडबड करू नकोस. आतापर्यंत अर्जुनाने तुला हात दाखविला आहे. घोषयात्रेत काय केलेस? विराटाच्या गोग्रहणाच्या वेळी काय केलेस? अर्जुन दिसला की नांगी टाकशील." धर्म अर्जुनाला बोलला, त्यापेक्षा हे निराळे नव्हते. ह्याच पर्वात अश्वत्थाम्याशी लढाई करताना अर्जुन जेरीस आला होता, तेव्हा कृष्णही त्याला अतिशय तुच्छतेने टाकून बोलला होता व ते ऐकून अर्जुन चेव येऊन लढला होता. रथिसारथी ह्यांच्या परस्पर संबंधाचेच हे द्योतक असेल का? हे बोलणे तेजोभंग करणारे नसून लढवय्याला राग आणणारेच वाटते.

ह्याच्या पुढचे शल्यकर्णांचे संभाषण मात्र गैरलागू, भारतातील कथेला सर्वस्वी विसंगत, मागाहूनच्या पुराणांतील रूढ कल्पनांनी भरलेले व म्हणून प्रक्षिप्त व मागाहून घुसडलेले वाटते. कर्णाने शल्याला त्याच्याच शब्दांत उत्तर द्यायचे सोडून मद्र व बाल्हीक देशातील स्त्रिया कशा अनाचारी आहेत. ह्याचेच वर्णन केले आहे. त्याने गांधारालाही नावे ठेवली. सर्व देश आचारभ्रष्ट आहे, असे म्हटले आहे. शेवटी तर "शल्या, तू कुलीन नाहीस, तुझे डोके उडवीन," असे तो म्हणाला. कर्ण कितीही उतावळा झाला, तरी तो असे बोलणे अशक्य होते. त्याचा जन्म कौरवांच्या दरबारात गेलेला होता. कुरूंचे व मद्रांचे संबंध त्याला चांगले माहीत होते. दुसरे असे की मद्र, बाल्हीक ही पश्चिमेकडची राष्ट्रे व अंग, वंग व कलिंग ही पूर्वेकडची राष्ट्रे अनाचारी, अनार्य ही कल्पना पुराणांची आहे. पुराणकाळात कुरु-पांचालदेशाला काही विशेष धार्मिक महत्त्व प्राप्त झाले होते. हाच प्रदेश पुढे 'ब्रह्मावर्त' नाव पावला. पण अशा तऱ्हेचा समज महाभारतात, काडीमात्र दिसत नाही. सर्व कुरूंनी पश्चिमेकडच्या मुली केल्या होत्या व आपल्या

मुली पश्चिमेकडे दिलेल्या होत्या. हे संभाषण म्हणूनच अगदी विसंगत अतएव प्राक्षिप्त वाटते. ह्या भांडणात कर्ण फारच संतापला, हे पाहून शल्यानेच संभाषण थांबविले व त्याला युद्धभूमीवर आणले. येथेही सारथी व रथी ह्यांचे संबंध कर्ण नीट जाणीत नव्हता, असेच म्हणावे लागते. नवे, पांढरे घोडे आणणे हाही भाग प्रक्षिप्त नसल्यास वेड्यासारखाच वाटतो. आपले घोडे, आपला रथ व आपला सारथी हे सर्वच ओळखीचे, नेहमीचे असावे लागते. सर्वांनी मिळून लढावयाचे असते, ही गोष्ट कर्ण विसरला का? काहीही असो. कर्ण सेनापती म्हणून लढाईत पडला, तो पहिलेच पाऊल त्याने चुकीचे घातले, असे म्हणावे लागते. पुढच्या हकीकतीवरूनही शल्य कर्णाच्या विरुद्ध शत्रुत्वाने वागला, असे दिसत नाही.

खूपसा आरडा-ओरडा करूनही कर्ण लागलीच अर्जुनाला सामोरा गेला नाही. भीम, धृष्टद्युम्न व अर्जुन हे रणात हाहाकार करीत होते. कर्णही लढाईत उतरला. थोड्या वेळाने शल्याने त्याला लांबून अर्जुनाचा रथ दाखविला. "दुर्योधनाने जन्मभर तुझ्यावर उपकार केले, ते फेडण्याची संधी आज आली आहे," असे म्हणून शल्याने रथ हाकला. ह्या वेळी कर्णाचा मुलगा वृषसेन त्वेषाने अर्जुनावर चालून गेला, व अर्जुनाने थोड्याच वेळात कर्णाच्या देखत कर्णाच्या पुढ्यात त्याला मारले. हा वेळपर्यंत कर्णाचा घोष थांबला होता व अर्जुन घोष करू लागला होता. मुलगा मेलेला पाहून कर्णाच्या डोळ्यांत पाणी आले; पण ते पुसून तो अर्जुनापुढे उभा राहिला. दोघांचे युद्ध झाले. पण अर्जुनाची हळूहळू सरशी होत होती. कर्ण रक्ताने माखला होता. त्याचे कवच फुटले होते. त्याने अर्जुनाला ठार मारण्यासाठी एक अमोघ बाण काढला. त्या बाणाच्या अग्रावर नाग बसला होता. (नागविष लावलेले होते,

म्हणून बाण थोडा जरी रुपला, तरी मनुष्य मरणार, अशा तऱ्हेचा हा बाण होता का ?) कर्णाने नेम धरला. शल्याने सांगितले, "बाबा, नेम चुकला आहे. हा बाण अर्जुनाचा गळा वेधणार नाही." पण कर्णाने शल्याचे न ऐकता धनुष्य ओढले. चार अंगुळांनी नेम चुकून बाण अर्जुनाच्या किरीटाला लागला.

ह्या ठिकाणी एकमेकांच्या विरोधी वर्णने आहेत. एकदा म्हटले आहे, नेम चार अंगुळांनी चुकला. शल्याचा इशारा बरोबर धरला, तर इतक्या थोडक्यात नेम चुकणार, ते शल्याला कळले असे होते, व कर्णाची नेमबाजी बरोबर नव्हती, असे सिद्ध होते. उलट कर्णाचा अमोघ बाण येतो आहे, हे पाहून कृष्णाने रथ दाबला व घोड्यांनी गुडघे टेकले व बाण चोवीस अंगुळानी चुकला, असेही वर्णन लगेच केले आहे. हे वर्णन केवळ कृष्णस्तुतीकरिता लिहिले आहे, असे ह्या पर्वाचे संपादक म्हणतात, ते बरोबर वाटते. कर्ण गळ्याचा वेध घेत होता. चोवीस अंगुळांनी वेध चुकला, तर किरीट पडलाच नसता; म्हणून अर्जुन वाचला तो कृष्णाच्या कौशल्याने नव्हे, तर कर्णाच्या चुकलेल्या नेमबाजीने, ही वस्तुस्थिती वाटते. मुलाच्या मरणाने कर्ण खचला असेल. आणि आता नेम चुकला त्यामुळे तो जास्तच गोंधळात पडला. एवढ्यात चाक फिरले, रथ घसरला व चाक जमिनीत रुतले.

लढाईचा हा सतरावा दिवस होता. हत्ती, घोडे व योद्धे ह्यांची प्रेते व मोडके रथ रणभूमीवर पडलेले होते. एवढ्या रणकंदनाने जमीन ठिसूळ झालेली होती, कुठे-कुठे ओली झालेली असणार. गंगा-यमुनांच्या खोऱ्यात दगड नाहीच, हजार फूट खोल मातीच आहे. पण पाण्याचा निचरा होत नाही. अशा परिस्थितीत चाक फिरले व रथ रुतला, तर नवल काहीच नाही. युद्धाचे दोन आठवडे

ह्या-ना-त्या निमित्ताने रथ निकामी होत होते. व योद्धे एक रथ सोडून दुसऱ्यात बसत होते. कर्णाच्याही पाठीमागे रथ होते, पण कर्ण रथाबाहेर येऊन मातीत फसलेले चाक बाहेर काढू लागला. जड रथाचे फसलेले चाक बाहेर काढणे – विशेषतः एकट्या-दुकट्याला – म्हणजे वेळ खाणारे व श्रमाचे काम होते. कर्ण दुसऱ्या रथावर का बसला नाही? संध्याकाळ होत आली होती. ह्या युक्तीने वेळ काढून एका रात्रीची उसंत मिळविण्याचा त्याचा बेत होता का? तो गोंधळला होता, हे खरेच. त्याने अर्जुनाजवळ मागणे मागितले, "मी चाक काढीत भूमीवर उभा आहे. तू रथात आहेस. तू युद्धनीती जाणतोस. रथातून माझ्याशी लढू नकोस. मला चाक काढू दे. धर्माने युद्ध कर."

पण कृष्ण त्याला उसंत द्यावयाला बिलकूल तयार नव्हता. 'धर्माने युद्ध कर,' ह्या आव्हानातच कर्णाला पुरते नेस्तनाबूद करून टाकावयाचे साधन त्याला मिळाले. 'मी कोण?' हा प्रश्न कर्ण आता विचारीत नव्हता; पण कृष्णाने विचारलेल्या प्रश्नांचा रोख 'तू कोण?' हाच होता. "भर सभेत द्रौपदीचे वस्त्र फेडायला लावलेस, तेव्हा कुठे गेला होता तुझा धर्म? कर्णा, विरथ अभिमन्यूला तुम्ही सर्वांनी मिळून मारला, तेव्हा कुठे होता तुझा धर्म?"

अर्जुनाचा मोह नाहीसा करून स्वत्वाची जाणीव देऊन त्याला कर्तव्य करायला उभे केले कृष्णाने. त्याच कृष्णाने मरणाच्या घटकेला कर्णाचे स्वत्व सर्वस्वी हरण केले. "द्रौपदीला साधी माणुसकी तू दाखविली नाहीस, मग तुला का दाखवावी? सौभद्राच्या बाबतीत तू कुठे क्षत्रियधर्म पाळलास? कसल्या धर्माची तुला अपेक्षा आहे? ती अपेक्षा असावी, असे तू वागलास का?" हेच ते विदारक प्रश्न होते. कृष्णाने दोनच प्रश्न विचारले. इतर भाकड प्रश्न संशोधित

आवृत्तीत गाळले आहेत. एका बाजूने कर्णाला धर्माची याचना करायचा अधिकार ह्या प्रश्नांनी नष्ट केला, तर दुसऱ्या बाजूने ज्या दोन कृत्यांनी अर्जुनाला खोल जखम झाली होती, त्यांचा उच्चार झाला. ह्याच माणसाने माझ्या बायकोची भर सभेत विटंबना केली; ह्याच माणसाने माझ्या मुलाला निर्दयपणे मारले, ह्याची अर्जुनाला आठवण झाली. तो त्वेषाने उठला. त्याने बाण जोडला व तो गर्जून म्हणाला, "जर खरा क्षत्रिय असेन, तर हा बाण कर्णाचे प्राण घेईल." अर्जुन अचूक नेम धरणारा म्हणून प्रसिद्ध होता. ह्याही वेळी त्याचा नेम चुकला नाही.

कर्ण महाभारतात शस्त्ररंगाच्या वेळी आला. त्या वेळी झालेल्या घटनांची एक प्रकारे ह्या शेवटच्या प्रसंगी पुनरावृत्ती झाली. शस्त्ररंगात कर्णाच्या द्वंद्वयुद्धाच्या मागणीमुळे 'तू कोण?' हा प्रश्न कृपाने विचारला व कर्णाला मान खाली घालावी लागली. शेवटचा प्रसंग विद्येचे प्रदर्शन नसून खरेखुरे युद्ध होते. जे द्वंद्व त्याने अर्जुनाजवळ मागितले, ते त्याला आयते मिळाले होते. हा काही खेळ नव्हता. दयामाया न दाखविता लढलेल्या युद्धाचा हा एक भाग होता. शक्य तर मारायचे नाही, तर वीरमरणाने मरायचे, ह्याखेरीज दुसरा पर्याय नव्हता. जन्मभर ज्याच्याशी हाडवैर केले, स्पर्धा केली, तो प्रतिस्पर्धी म्हणून समोर होता. त्याच्यासमोर कसलीही याचना करावयास नको होती. क्षात्रवृत्तीने मरणे हा एकच मार्ग होता. परत एकदा नको ते कर्णाने केले. त्याने धर्मयुद्धाची अपेक्षा केली व आता कृपाने नव्हे, पण कृष्णाने 'तू कोण?' म्हणून धर्माची अपेक्षा करावीस, हे विचारले. 'मी कोण?' ह्या प्रश्नाचा स्वतःशी उलगडा न करता कर्ण गेला.

ऑक्टोबर, १९६६

नऊ

## कृष्ण वासुदेव

कृष्ण महाभारतात येतो, तो आदिपर्व संपता-संपता, द्रौपदीस्वयंवराच्या वेळी. त्याच्या आधी कृष्णाचा पांडवांशी किंवा कौरवांशी कसलाच संबंध दाखविलेला नाही. वसुदेवाची बहीण कुंती (म्हणजे कृष्णाची आत्या) पांडूने करून घेतली, एवढा एक उल्लेख येतो. त्यापलीकडे यादवांशी काही संबंध दाखविलेला नाही. पांडू मरेपर्यंत पांडव हिमालयाच्या पायथ्याशी असलेल्या रानात राहत असत. पांडू मेल्यावर व माद्री सती गेल्यावर विधवा कुंती पोरक्या मुलांना घेऊन हस्तिनापूरला आली व हस्तिनापूरला राहिली. भीष्माच्या देखरेखीखाली त्यांचे शिक्षण झाले. कुंतीच्या व विदुराच्या दक्षतेमुळे कौरवदरबारी त्यांचे संरक्षण झाले. पुढे त्यांना गंगेकाठच्या एका गावाला पाठवून मारायचा घाट कौरवांनी घातला. जळत्या घरातून मोठ्या युक्तीने बाहेर पडून कुंती व पाच पांडव एक वर्ष, द्रुपदाच्या

राजधानीत येईपर्यंत, लपत-छपत राहिले. पांडवांनी द्रौपदीला मिळविली, तीसुद्धा आपण कोण, हा सुगावा लागू न देता. म्हणजे पांडवांच्या लहानपणी त्यांच्यावर नाना आपत्ती कोसळत असताना व अतिशय सावधगिरी बाळगावी लागत असताही कुंतीने माहेरच्या माणसांची मदत घेतली नाही, असे दिसते. ही वागणूक कुंतीने कदाचित जाणून-बुजून ठेविली असेल. गांधारीचा भाऊ तिच्या लग्नाच्या दिवसापासूनच कौरवांच्या दरबारात ठाण मांडून प्रतिष्ठित झाला होता. कुंती आणि माद्री ह्यांच्या बरोबर कुणी माहेरची माणसे आली नव्हती. जरी काही आली असली, तरी लौकिकाप्रमाणे लग्नसोहळा आटोपल्यावर परत गेली असणार. नवऱ्याच्या मागे माहेरच्या कोणाला हक्काने बोलावणे शक्य नव्हते. ती स्वतःच इतकी दीन होती की, तिच्या माहेरच्या माणसांना कौरवांच्या दरबारी स्थान मिळणे शक्यच नव्हते. फार तर तिला व तिच्या मुलांना तिच्या माहेरी आसरा मिळाला असता; पण त्यामुळे हस्तिनापुराच्या राज्यावरील तिच्या मुलांचा हक्क कदाचित कायमचा नाहीसा झाला असता. वडिलार्जित संपत्तीवरील मुलांचा हक्क नाहीसा होऊ नये, म्हणून ज्या शहाणपणाने व खालच्या मानेने विधवा भावजय थोरल्या दिराच्या कुटुंबात राहते, अगदी त्याचप्रमाणे कुंती राहिलेली होती. आणि ह्यामुळेच कदाचित यादवांचे नाव द्रौपदीस्वयंवरापर्यंत महाभारतात ऐकू येत नाही. पांडव लहान असल्यापासून द्रौपदीस्वयंवराचा काळ यादवांना फार धकाधकीचा गेला असणार. कंसवध, जरासंधाशी युद्ध व त्याला भिऊन यमुनाकाठचा प्रदेश सोडून दक्षिणेकडे जाणे, द्वारका स्थापणे व तेथे स्थिरस्थावर होणे ह्या सर्व घटना याच काळातल्या असणार.

स्वयंवरमंडपात यादवांची मंडळी आली होती, पण ती द्रौपदी

मिळवायला नव्हे. एकंदर समारंभ बघून स्वयंवरात काय होते, हे बघण्यापुरतेच ते आलेले दिसतात. अर्जुनाने पण जिंकल्याबरोबर कृष्णाची नजर ब्राह्मणवेषाने बसलेल्या पाच पांडवांकडे गेली, व त्यानें शेजारी बसलेल्या बलरामाला नाव घेऊन कुठचा कोण, हे सांगितले. सांगता-सांगता तो असेही म्हणतो, "माझ्या गुप्त हेरांनी अशी वार्ता आणली होती की, पांडव वारणावताला जळत्या घरात आगीच्या भक्ष्यस्थानी पडलेले नाहीत; ते निसटून गेले असावेत, असा कयास आहे; तेच हे दिसताहेत." त्याने व बलरामाने लवाजमा न घेता लपत-छपत धर्माच्या पाठीमागे जाऊन पांडवांच्या राहण्याचे ठिकाण हुडकून काढले. ते उभयता कुंतीला व पांडवांना भेटून, त्यांचे ठिकाण कोणाला सापडू नये, ह्या बुद्धीने फार थोडा वेळ थांबून गुपचूप परत आले.

ह्या भेटीनंतर मात्र महाप्रस्थानपर्व वगळून श्रीकृष्ण नाही, असे एकही पर्व महाभारतात नाही. श्रीकृष्ण नव्हता अशा वेळात धर्मराजाने द्यूत खेळून राज्य गमावले. बारा वर्षांच्या वनवासात पांडवांचा आणि कृष्णाचा संबंध फारसा आला नाही; पण कृष्ण त्यांच्या पाठीमागे उभा होता. विराटपर्वामध्ये गोग्रहणाच्या वेळी पांडवांनी कौरवांना पळवून लाविले. ह्या अपवादाखेरीज ज्यात श्रीकृष्णाची मदत नाही, अशी मोठी कृत्ये पांडवांच्या हातून झाली नाहीत. द्रौपदीस्वयंवरात यादव मोठा आहेर घेऊन आपल्या लवाजम्यानिशी द्रुपदाच्या राजधानीला आले. द्रुपदाच्या व यादवांच्या ह्या बलशाली युतीमुळे पांडवांना राज्यार्ध देणे धृतराष्ट्राला भाग पाडले. कृष्णाने उघडपणे हा पुरस्कार केला नसता, तर एकट्या द्रुपदाच्या बळावर सहजासहजी पांडवांना राज्य मिळते ना! महाभारतात लिहिले आहे की, धृतराष्ट्राने युधिष्ठिराला खांडववन व त्यातले खांडवप्रस्थ गाव दिले, आणि कृष्णाला

पुढे करून पांडव खांडवाच्या अरण्यात शिरले. तेथे त्यांनी कृष्णाच्याच मदतीने खांडवप्रस्थ या लहान गावाचे मोठ्या राजधानीत रूपांतर केले. एवढेच नव्हे, तर खांडववन जाळून कृष्णाने व अर्जुनाने मोठा प्रदेश प्रजेसाठी मिळवून दिला. हे सर्व झाल्यावर मयाकडून मोठा राजवाडा बांधण्याची तजवीज करून कृष्ण द्वारकेला निघून गेला.

कृष्ण गेल्यावर निरनिराळे लोक धर्मराजाला भेटायला आले. त्यांचे बोलणे ऐकून आपण राजसूय यज्ञ करावा, असे धर्माच्या मनात आले. त्या वेळी कृष्णाला बोलावणे पाठवून धर्माने आपला बेत कृष्णाला सांगितला; आणि कृष्णाने त्या वेळी राज्य करीत असलेल्या निरनिराळ्या राजांची माहिती देऊन कोण अनुकूल, कोणी प्रतिकूल, कोण जिंकायला सोपे वगैरे सांगून मगधाधिपती जरासंधाचा वध केल्याशिवाय राजसूय यज्ञ करणे शक्य नाही, हे धर्माला पटवून दिले. जरासंधाबद्दल बोलत असताना कृष्णाच्या पूर्वायुष्याचा ओझरता उल्लेख व यादवांचे मथुरेहून द्वारकेला जाणे ह्या दोन गोष्टी कृष्णाने स्वतःच्या शब्दांनी सांगितलेल्या आहेत.

महाभारतामध्ये ज्या कृष्णाचे दर्शन घडते, तो कृष्ण हरिवंशामधील कृष्णापेक्षा किंवा भागवतामधील कृष्णापेक्षा अगदी निराळा आहे. महाभारतामध्ये कृष्ण येतो तो मोठेपणी, द्वारकेत राहणारा असा येतो. त्याच्याबद्दलच्या काही गोष्टी त्याच्या स्वतःच्या तोंडून कळतात. त्याने व बलरामाने कंसाला व सुनाम्याला मारले. कंसाच्या राण्या ह्या जरासंधाच्या मुली होत्या. त्यांनी आपल्या बापामागे कंसवधाचा सूड घेण्याचे टुमणे लावले, व जरासंध यादवांवर चाल करून गेला. जरासंधापुढे यादवांचा टिकाव लागेना म्हणून यमुनाकाठचा प्रदेश सोडून यादव पश्चिमेकडे पळाले आणि रैवतक पर्वताच्या भोवती 'कुशस्थली' नावाच्या ठिकाणी राहिले व तेथे द्वारका नावाची

कोणाही शत्रूला घेता येणे शक्य नाही, अशी एक नगरी त्यांनी बांधली. ही नवी नगरी व तिच्या भोवतालचा प्रदेश येथे वृष्णी, अंधक, भोज वगैरे यादवांची निरनिराळी कुळे बलरामाच्या आधिपत्याखाली राहिली. कृष्णाचा बाप वसुदेव ह्याला बऱ्याच बायका होत्या. बलराम हा रोहिणीचा मुलगा. सुभद्रा व सारण ही सख्खी भावंडे वसुदेवाच्या आणखी एका राणीची मुले. म्हणजे बलराम, श्रीकृष्ण व सुभद्रा ही एकमेकांची सावत्र भावंडे होती. कृष्णाने आपल्या शौर्याने व शहाणपणाने यादवांचे स्वातंत्र्य कायम राखले होते. ह्या यादवांच्या निरनिराळ्या शाखांचे वर्णनही महाभारतात काही ठिकाणी येते. सभापर्वात मोठमोठ्या यादव-वीरांची नावेदेखील सांगितलेली आहेत. पण महाभारतात ठिकठिकाणी विखुरलेली माहिती गोळा करूनही यादव-वंशाचा संगतवार इतिहास सांगता येत नाही.

महाभारतामधील वर्णनावरून यादव हे बलशाली, श्रीमंत, बरेच दांडगे, स्वभावाने तापट, चटकन शस्त्राला हात घालणारे, आपल्याच ऐटीत असणारे, रथविद्येत निपुण असे लोक होते, असे दिसते. त्यांच्या श्रीमंतीचे वर्णन बऱ्याच ठिकाणी येते. यादवांतल्या यादवांत पक्षोपपक्ष होते. एका पक्षाचे मत कृष्णाने राजा व्हावे, असे होतेसे दिसते. पण कृष्णाच्या विरुद्ध बाजूलाही पुष्कळ लोक होते; आणि कुळातल्या कुळात भांडणे नकोत, म्हणून कृष्णाने वसुदेवाचा सगळ्यात थोरला मुलगा व आपला सावत्र भाऊ बलराम ह्याला राजा केले. बलराम आणि कृष्ण यांच्यामध्ये प्रत्यक्ष स्पर्धा जरी नव्हती, तरी पुष्कळच मतभेद होते. कृष्णामुळे आपण राजे आहोत, ही गोष्ट बलराम बहुतेक करून जाणून असावा. पण काही बाबतीत इच्छा नसूनही त्याला कृष्णाच्या पुढे नमावे लागे. अर्जुनाने कृष्णाच्या मदतीने व सह्याने सुभद्रेला पळविली. क्षत्रिय-रूढीप्रमाणे सुभद्रेचे स्वयंवर झाले

असते, पण कृष्णानेच अर्जुनाला सांगितले की, "बाबा, या पोरी स्वयंवरात कोणाला माळ घालतील, याचा नेम नाही. तुला ती हवी आहे ना, मग मी तुला माझा रथ देतो, घोडे देतो, त्यात तिला घाल व पळवून घेऊन जा." ह्याप्रमाणे अर्जुन गेला, तेव्हा बलरामासुद्धा सर्व यादव-वीर अर्जुनाचा पाठलाग करून त्याला मारावयाला निघाले होते. पण कृष्णाने चार गोष्टी सांगून त्यांना परावृत्त केले, व पांडवांचा व आपला सबंध जमणे ही कशी फायद्याची गोष्ट आहे, हे त्यांना पटवून दिले. कृष्णाचा पांडवांकडे अतिशय ओढा होता. बलरामाला पांडवांबद्दल सदिच्छा होती, पण ओढ नव्हती. कौरव व पांडव या दोघांबाबत तो कोठच्याच एका बाजूचा नव्हता. युद्ध सुरू झाले, तेव्हा या भानगडीत पडायलाच नको, म्हणून तो अलिप्त राहिला होता. गदायुद्धाच्या वेळी दुर्योधनाला भीमाने मांडीवर म्हणजे कमरेखाली गदा मारली, म्हणून तो भीमाला मारायला उठला होता. पण कृष्णाने त्याला आवरले. यादवांमधले पक्षोपपक्ष भारतीय लढाईच्या वेळी उघड होतात. कृष्ण जरी प्रत्यक्ष लढला नाही, तरी कृष्णाच्या बाजूचे यादव पांडवांच्या बाजूने लढत होते व दुसरे कित्येक यादव दुर्योधनाच्या बाजूने लढत होते. वर सांगितल्याप्रमाणे बलराम आपल्यापुरता अलिप्त राहिला.

कृष्णाच्या बायकांमध्ये सत्राजिताची मुलगी सत्यभामा ही महाभारतात प्रामुख्याने येते. कृष्ण ज्या वेळी सपत्नीक पांडवांना भेटावयास आला, त्या वेळी त्याने सत्यभामेला बरोबर आणले होते. वनपर्वामध्ये सत्यभामा त्याच्याबरोबर होती. उद्योगपर्वामध्ये युद्धाच्या छावण्या पडल्या होत्या, तेव्हाही अर्जुनाच्या शिबिरात कृष्णाबरोबर सत्यभामा होती.

रुक्मिणीचे फक्त नाव मात्र एक-दोनदा येते. रुक्मिणी ही

कृष्णाची विशेष आवडती राणी होती, असे पुढील वाङ्मयात येणारे उल्लेख महाभारतात कुठेही नाहीत. किंबहुना, अमकीचा नवरा म्हणून पुरुषाचे वर्णन करण्याची प्रथाच महाभारतात नाही. इंद्रप्रस्थाचे राज्य कृष्णाचा पणतू वज्र ह्याला मिळाले. वज्र हा रुक्मिणीच्या नातवाचा मुलगा. पण अर्जुनाने राज्य दिले, ते कृष्णाच्या आवडत्या राणीचा तो पणतू म्हणून नव्हे, तर कृष्णाचा उरला-सुरला वंश म्हणून. वज्राचा आजा प्रद्युम्न व सात्यकी हे अर्जुनाचे मित्र व अर्जुनाच्या शौर्याचे पूजक, म्हणजे जवळ-जवळ भक्तच होते, असा उल्लेख महाभारतात ठिकठिकाणी आलेला आहे. तेव्हा अर्जुनाने ह्या दोघांच्या वंशजांस राज्ये दिली, असेही म्हणता येईल. ह्या घटनेत रुक्मिणी ही कृष्णाची लाडकी होती व त्यामुळे तिच्या वंशाला राज्य मिळाले, असा प्रकार काडीमात्र नाही.

महाभारतात जो कृष्ण दाखविला आहे, त्यात गोपीवल्लभत्वाचा मागमूसही नाही. त्या वेळच्या सर्वच क्षत्रिय राजांच्या संपत्तीमध्ये गोधनाचा समावेश होई. राजाची स्वतःची अशी खिल्लारे असत. राजाने नेमलेले गवळी असत. राज्याच्या सीमेलगत शेतीखालची जमीन संपून अरण्याला जेथे सुरवात होई, त्या प्रदेशामध्ये ही खिल्लारे ठेविलेली असत. हस्तिनापूरच्या राजाची तशी खिल्लारे होती, हे घोषयात्रेवरून दिसून येते. विराटाच्या राजाची तशाच तऱ्हेची खिल्लारे होती, हे विराटपर्वात दिसून येते. वर्षा-दोन-वर्षांनी राजाने स्वतः जाऊन आपली खिल्लारे मोजून पहावीत; नवीन जन्मलेल्या जनावरांवर आपल्या स्वामित्वाची मुद्रा ठोकावी, असा प्रघात होता. यादव हे त्या वेळचे अतिशय श्रीमंत क्षत्रिय-घराणे होते. तेव्हा त्याचेही गुरांचे कळप मोठे असणारच. द्रौपदीस्वयंवराच्या वेळी किंवा सुभद्रेच्या लग्नाच्या वेळी त्यांनी पांडवांना रथ, दासदासी, घोडे ह्यांबरोबर खूप

गोधनही दिले. सुभद्रेला इंद्रप्रस्थाला घेऊन येताना द्रौपदीच्या रागावर उपाय म्हणून अर्जुनाने एक युक्ती योजली. सुभद्रेला सुंदर 'गोपालिका'-वेष देऊन 'मी तुमची दासी आहे,' असे म्हणत द्रौपदीकडे पाठविले. ह्या एका ठिकाणी गोपाल-कन्यकेचा उल्लेख आलेला आहे. पण त्यातही असे दिसते की, पांडवांच्या पट्टराणीला भेटायला जाताना तोऱ्याने न वागता नम्रता दाखविण्यासाठी एका खालच्या वर्गातील स्त्रीचा म्हणजे गौळवाड्यातील गौळणीचा वेष सुभद्रेला दिला.

त्या वेळच्या रिवाजाप्रमाणे कृष्णाने बऱ्याच बायकांना जिंकले होते. अर्जुनाशी गप्पा मारताना यमुनेच्या काठी दोघे मित्र जे बोलले, ते एकमेकांनी केलेल्या पराक्रमाबद्दल; आणि तो पराक्रम लढाईतला व प्रेमातला [विक्रान्तानि रतानि च ।] असा होता. पण ज्याप्रमाणे अर्जुन पुष्कळ स्त्रिया जिंकूनही स्त्रीलंपट नव्हता, त्याचप्रमाणे कृष्णही स्त्रीलंपट नव्हता. किंबहुना, निरनिराळ्या स्त्रियांना जिंकणे हा प्रेमापेक्षा राजकारणाचाच एक भाग होता.

कृष्णार्जुनांच्या मैत्रीचा आरंभ द्रौपदीस्वयंवराच्या वेळी झालेला असावा. इथे परत एकदा निरनिराळ्या लोकांची वये काय असावीत, असा प्रश्न उपस्थित होतो. द्रौपदीस्वयंवराच्या वेळी अर्जुनाचे वय कमीत-कमी वीस वर्षांचे असावे, असे आपण म्हटले आहे. ते सहज पंचविसांपर्यंत नेणे शक्य आहे. अर्जुनाचे वय जास्त न धरण्याचे मुख्य कारण भारतीय युद्धात भीष्माचे वय नव्वदाच्या वर जाऊ नये, हे! एरवी दुसरी काही हरकत नव्हती. महाभारतामध्ये दोन माणसे भेटली, म्हणजे एकमेकांशी कसे वागावे, याचे अगदी काटेकोर नियम आहेत. लहानाने वडिलांना नमस्कार करायचा. बरोबरीच्यांना उराउरी भेटायचे, व लहानांना आशीर्वाद द्यायचा, अशी पद्धत होती. काही गोष्टी बरोबरीची माणसे एकमेकांत करू

शकत असत. वडील माणसांच्या बरोबर किंवा लहान माणसांबरोबर तशा गोष्टी करण्याची शक्यता नव्हती. कृष्ण पांडवांना भेटायला येई, तेव्हा दर वेळेला कुंतीला, धर्माला व भीमाला नमस्कार करीत असे, आणि नकुल व सहदेव त्याच्या पाया पडत असत. अर्जुनाला मात्र तो आलिंगन देत असे. तेव्हा तो अर्जुनाच्या बरोबरीचा होता. खांडववनात ते वनविहाराला गेले, तेव्हा कोणा वडील माणसांना न घेता हे दोघे आपल्या बायका व दासदासी घेऊन गेले होते, बायकांचे दारू पिणे, नाचणे, गाणे वगैरे गोष्टी वडील माणसांच्या देखत कदापि झाल्या नसत्या. उद्योगपर्वात लढाईच्या आधी अर्जुनाच्या शिबिरामध्ये कृष्ण आणि अर्जुन दोघेही दारू पिऊन अर्जुनाचे पाय सत्यभामेच्या मांडीवर व कृष्णाचे द्रौपदीच्या, – अशा तऱ्हेने बसले होते, असे संजयाच्या तोंडी वर्णन आहे. ह्या शिबिरामध्ये अभिमन्यू वगैरे मुलांना जाण्याचा मज्जाव होता, असेही संजय सांगतो. म्हणजे कृष्ण आणि अर्जुन हे अगदी बरोबरीचे जीवश्च कंठश्च मित्र होते.

द्रौपदीस्वयंवराच्या सुमारास यादव द्वारकेला जाऊन स्थिर झाल्याला फार काळ लोटलेला नसावा. यादव एका दिव्यातून पार पडले होते. पांडव अशाच तऱ्हेच्या कठीण दिव्यातून बाहेर निघत होते. ह्या वेळेला एकमेकांच्या आधाराने दोघांचेही हित साधणार होते. कृष्णाच्या धोरणी मनाला हा विचार शिवला नसेल, असे म्हणवत नाही. पांडवांच्या संबंधात कृष्णाने बरेच मोठे धोरण ठेवले होते, हे दिसून येते. पण कृष्णार्जुनांच्या वैयक्तिक मैत्रीत धोरणापेक्षा निर्व्याज प्रेमच जास्त दिसते.

कृष्णाचा पांडवांशी जो संबंध होता, त्याचा विचार करताना कृष्णाच्या सबंध आयुष्याचाच विचार करण्याची आवश्यकता आहे. भगवद्गीतेत ‘न मे पार्थास्ति कर्तव्यं त्रिषु लोकेषु किञ्चन’ असे

म्हणणाऱ्या श्रीकृष्णाच्या आयुष्यामध्ये पुष्कळच कार्ये व धोरणे होती. काही कुलाविषयीची, काही त्या वेळच्या सबंध क्षत्रियवर्गाविषयीची व काही सर्वस्वी स्वतःविषयींची अशी होती. कंसवध हे काही अंशी स्वतःचे खाजगी कर्तव्य होते, तर काही अंशी सबंध कुळाचीच ती सोडवणूक होती. कंसाच्या वधामुळे कंसाच्या सासऱ्याचे म्हणजे जरासंधाचे यादवांना जे भय उत्पन्न झाले, त्यातून यादवांची मुक्तता करणे, त्याचप्रमाणे क्षणोक्षणी जागरूक राहून ह्या भांडकुदळ व द्वाड वंशाला एकत्र ठेवणे हे आणखी एक कर्तव्य होते. त्या वेळच्या क्षत्रिय रूढीला हरताळ फासून शंभर क्षत्रियांना बळी द्यायला निघालेल्या जरासंधाचा काटा काढणे हेही त्याचे कार्य होते. हे कार्य जितके स्वतःच्या कुळासाठी होते, तितकेच ते सर्व राजवंशाची एक विशिष्ट घडी बसविण्याच्या त्याच्या प्रयत्नांचे निदर्शकही होते.

महाभारतात एक गोष्ट मनात भरते, ती म्हणजे क्षत्रिय-घराण्यांचे एकमेकांशी संबंध व क्षत्रियांनी वागण्याचे नियम. निरनिराळ्या राजघराण्यांची वंशपरंपरागत राज्ये व राजधान्या होत्या. सिंधू, सौवीर, मद्र, गांधार, मत्स्य, पांचाल, हस्तिनापूर, खुद्द मगध, चेदी, विदर्भ या सर्व देशांचे राजे वंशपरंपरागत आलेल्या राज्यावर बसलेले होते. यादवांना मथुरेहून पळावे लागले. त्यांनी नवीन राजधानी वसविली; ती दुसऱ्या कोणाचे राज्य हिसकावून घेऊन वसविली, असे दिसत नाही. लढाईची वर्णने आहेत, दिग्विजयाची वर्णने आहेत, पण कोणी कोणाचे राज्य जिंकून घेतल्याचे उल्लेख नाहीत. जरासंधाला मारल्यावर जरासंधाच्या मुलाला अभय देऊन राज्यावर बसविले. जरासंधाने पकडलेल्या राजांची मुक्तता करून ज्याला-त्याला आपापल्या लहान-लहान राज्यात रहायची परवानगी दिली. शिशुपालाला मारले, तेव्हा शिशुपालाचा मुलगा गादीवर बसला. भारतीय युद्ध झाल्यावर

धर्मराज हस्तिनापुराच्या गादीवर बसला, तेव्हा व्यासाने धर्माला जे पहिले कर्तव्य सांगितले, ते असे : "जे-जे राजे युद्धात मारले गेले, त्या सर्वांच्या राजधानीमध्ये दूत पाठवून राण्यांचे सांत्वन कर, त्यांना अभय दे! मृत राजाचा जो कोणी मुलगा असेल, त्याला अभिषेक कर, व त्याचे रक्षण करण्याची काळजी घे! एखादी राणी गर्भवती असेल व दुसरा वंश नसेल, तर चांगले लोक नेमून तिचे रक्षण कर व तिला मूल झाले म्हणजे त्याच्या नावाने द्वाही फिरव." (शांतिपर्व : अध्याय ३४ : श्लोक ३१–३३). ह्या सर्व उदाहरणांवरून असे दिसून येते की, त्या वेळी युद्धाचे काही विशिष्ट नियम असत. क्षत्रियांनी एकमेकांची राज्ये हिसकावणे हे त्या वेळच्या रितीला धरून नव्हते. धर्माच्या राजसूय यज्ञाच्या वेळी श्रीकृष्णाचा पांडवांशी जो विचारविनिमय झाला, त्यातही हीच गोष्ट दिसून येते. कोठचे राजे जिंकण्याला सोपे, आपले आप्त म्हणून कोणाकडून साहाय्य मिळेल, कोणाला मारले पाहिजे, हा तो विचार होता. प्रत्यक्ष चार भाऊ दिग्विजयाला गेले, तेव्हाही राजांचा पराभव करून, त्यांच्याकडून करभार घेऊन आणि त्यांना यज्ञाचे निमंत्रण देऊन ते आले. शिशुपाल धर्माला अग्रपूजेच्या वेळेला हेच बजावतो. "तू जो राजसूय यज्ञ करतो आहेस, तो आम्ही सर्वांनी तुला मान्य केले म्हणून," हा त्याच्या म्हणण्याचा मथितार्थ होता. कृष्णाने जरासंधाबद्दल व जरासंधाशी भाषण करताना हेच सांगितले, "राजे लोकांना पकडून आणून ठेवले आहेस, व त्यांना बळी देणार आहेस, हे कृत्य राजनीतीच्या विरुद्ध आहे. त्यांना सोडून दे, म्हणजे आमचे काही म्हणणे नाही." ह्या म्हणण्याला जरासंध कबूल होईना, म्हणून त्याला मारावे लागले. राजसूय ज्याने करावयाचा तो राजा नुसता वीर्यशालीच नव्हे, तर धर्मज्ञही असावा, अशी त्या वेळची कल्पना होती. कृष्णाने धर्माला हेच सांगितले, "तू सम्राट

म्हणून सगळ्यांना पसंत पडशील. जरासंध जिवंत असेपर्यंत मात्र ते पद तुला मिळणे शक्य नाही.” जो राजा राजसूय यज्ञ करील, त्याला जर दहा राजांना जिंकावे लागले, तर इतर दहा राजे बरोबरीचे मित्र म्हणून असावे लागत. राजसूय यज्ञ हे जसे दिग्विजयाचे प्रतीक होते, तसे मान्यतेचेही प्रतीक होते. जवळ-जवळ तुल्यबल राजे एकमेकांच्या शेजारी राज्य करीत असत. कोणी राजसूय यज्ञ केला किंवा अश्वमेध यज्ञ केला, म्हणून हा समतोलपणा नाहीसा होत नसे. भीतीचा दरारा बसवून जरासंधाने ही घडी पार विस्कटून टाकली होती. बरोबरीच्या राजांना तुरुंगात टाकणे किंवा आपल्या सैन्याच्या जोरावर त्यांच्यावर दरारा बसवून साम्राज्य मिळविणे हे कृष्णाच्या मते तरी त्या वेळच्या क्षत्रियनीतीला धरून नव्हते.

महाभारत-कालानंतर आपल्याला बौद्धकालातील वाङ्मय सापडते. त्यात काशी-कोसलांच्या साम्राज्याचे वर्णन आहे. त्या वेळी राज्य-स्पर्धेमध्ये राजे लोक एकमेकांचा निष्पात करण्यासाठी झटत असत व साम्राज्ये स्थापीत असत, असे दिसते. बुद्धानंतर चंद्रगुप्त मौर्याने अशा तऱ्हेचे साम्राज्य स्थापिले. त्यानंतर अशोकानेही तोच प्रकार केला. मागाहून आलेले कुमारगुप्त व समुद्रगुप्त वगैरेही साम्राज्य-स्थापकच होते. शेजारच्या राजांची भूमी बळकावून आपल्या राज्याचा विस्तार करणे हे साम्राज्यस्थापनेचे सर्वमान्य तत्त्व झाले होते. तरीही गुप्तकालात होऊन गेलेल्या कालिदासाने जुन्या मूल्यांचा उच्चार रघुवंशात केलाच. रघूच्या दिग्विजयाचे वर्णन करताना तो म्हणतो, ‘श्रियं कलिङ्गनाथस्य जहार न तु मेदिनीम्’. अगदी बरोबर हीच कल्पना महाभारतकालीही रूढ होती. दिग्विजय म्हणजे काही विशिष्ट मर्यादेत खेळलेला एक डाव होता. स्पर्धा कीर्तीसाठी होती, भूमीसाठी नव्हती. करभार घ्यायचा, आणि तो दान म्हणून देऊन

टाकायचा, स्वतःजवळ साठवून ठेवायचा नाही, असाही दंडक होता. मोठा दिग्विजय करायचा, सर्व राजांकडून खूप धन, रत्ने वगैरे मिळवायची, आणि एक मोठा यज्ञ करायचा, व इतरांकडून जे मिळविले असेल, त्यात आपली स्वतःची भर घालून सर्व संपत्ती दान करायची. ज्या राजांना जिंकले असेल, त्या सर्वांना बोलावून त्यांचा पाहुणचार करायचा, त्यांचा सन्मान करायचा व त्यांना घरोघर पोहोचवायचे, ह्या त्या वेळच्या रूढीचे वणन धर्माच्या राजसूय यज्ञात केलेले आहे. हीच कल्पना परत कालिदासाने रघुवंशात सांगितलेली आहे. सर्व संपत्ती वाटता-वाटता स्वतः दरिद्री होऊन जायचे, – इतके की, कोणाला मोठे दान करायचे सामर्थ्यदेखील राहू नये, अशी अवस्था यायची. हा क्षत्रियाचा मोठेपणा समजला जाई. रघूविषयी लिहिताना अगदी हेच चित्र कालिदासाने उभे केले आहे. ‘अकिञ्चनत्वं मखजं व्यनक्ति’. रघुराजा यज्ञात दिलेल्या दानामुळे गरिबी भोगीत होता, असे हे वर्णन आहे. निरनिराळ्या क्षत्रिय-कुलांचा वंशपरंपरागत आलेल्या आपल्या राज्यावरचा हक्क अबाधित असे. लढाईमध्ये त्यांची ‘श्री’ जाई; पराभव झाला की अपकीर्ती होई, व करभार द्यावा लागे. पराभवाचा अपमान व संपत्तीचा व्यय हे दोन्ही ‘श्री’ गेल्याचे लक्षण होते. भूमी मात्र कुणी कुणाची घेत नसे. समोरासमोर लढाई झाली, की तीत एखादा राजा मारला जाई, पण पराभूत शत्रूला तुरुंगात टाकायचे किंवा मारायचे, हा प्रघात नव्हता. ह्या जुन्या प्रघाताला जरासंधाने हरताळ फासला होता. जरासंधाच्या भयामुळे केवळ यादवच नव्हे, तर इतरही राजे राज्य सोडून गेल्याचे, किंवा दुसरीकडे त्यांनी राज्य स्थापन केल्याचे उल्लेख सभापर्वात येतात. जरासंध मगधाहून मथुरेपर्यंत आला होता. पण हस्तिनापूरच्या राजांना त्याचा उपद्रव झाल्याचे दिसत नाही. जरासंधाबद्दल धर्माला काहीच

माहिती नाही, अशा तऱ्हेने कृष्णाला त्याला माहिती सांगावी लागते. ह्यावरून दुसऱ्याही एका गोष्टीला पुष्टी मिळते. ती ही की, कृष्णाचा व पांडवांचा संबंध द्रौपदीस्वयंवरापर्यंत आलेला नव्हता. तो आला असता, तर जरासंधाच्या भयाने आपण कसे पळून गेलो, ही कथा सांगण्याचे कारणच नव्हते.

कृष्णाच्या मनात क्षत्रियत्व व क्षत्रियांचे परस्पर संबंध यांबद्दल काही कल्पना होत्या. स्वतःच्या कुळाला दिलेल्या उपद्रवामुळे त्याचा जरासंधावर राग होता हे जितके खरे, तितकेच जरासंध वर वर्णन केलेल्या क्षत्रियनीतीला धरून वागत नव्हता, व त्याने शंभर राजे कैदेत टाकून त्यांना बळी देण्याचा घाट घातला होता, हेही कारण त्याच्या रागाला होते. महाभारतामध्ये निरनिराळ्या कुळांचे एकमेकांशी संबंध कसे गुंतागुंतीचे होते, ते ह्या प्रकरणात दिसून येते. चेदीचा राजा शिशुपाल हा यादवांच्याच एका मुलीचा मुलगा. पांडवांशी कृष्णाचे जे नाते, तसेच शिशुपालाशीही होते. पण शिशुपाल इतर काही कारणांमुळे कृष्णाचा वैरी व जरासंधाचा हस्तक झालेला होता. कृष्णाने योजिलेल्या कार्यात शिशुपालाचा नाश करणे हे नव्हते. जरासंधाचा काटा काढून टाकायचा, हे मात्र त्याच्या मनात होते, व तो त्या संधीची वाट पाहत होता. जरासंधाला मारून त्याने बंदीत टाकलेल्या राजांना मुक्त करणे व क्षत्रियांचे पूर्वापर-संबंध परत प्रस्थापित करणे हे तो एक महान कार्य समजत होता. क्षत्रिय-समाजाविषयीची ही त्याच्या आयुष्यातील एक महत्त्वाकांक्षा होती.

ह्या सर्व भानगडीत कृष्णाचा काही वैयक्तिक लाभ झालेला दिसत नाही. हे सर्व राजकारण कुलासाठी आणि त्या वेळेच्या एकंदर राजकीय संबंधांबद्दल होते. कृष्णाला केवळ स्वतःची अशी आकांक्षाच नव्हती का? शूर व पराक्रमी असूनही अर्जुनाप्रमाणेच

धाकटा भाऊ असल्यामुळे तो राजा झाला नव्हता. एकदा का त्याने राज्य पत्करले असते, तर थोरल्या मुलाला गादीवर बसवायाचे ही रूढी मोडली असती, व मग यादवां-यादवांत भांडणे लागली असती; म्हणून त्याने जाणून-बुजून कमीपणा पत्करला होता. पण जरी राजा होता आले नाही, तरी कृष्णाला एक मोठी महत्त्वाकांक्षा होती, हे महाभारतावरून स्पष्ट दिसते. ती महत्त्वाकांक्षा 'वासुदेव' होण्याची!

'वासुदेव' होणे हे प्रकरण काय आहे, ह्याचा नीटसा उलगडा होत नाही. पुराणातून कृष्ण वासुदेव हा विष्णूचा अवतार होता, व अवतारकार्य करून तो गेला, अशी कथा येते. तीच कथा सर्वांना माहीत असते. कृष्ण वासुदेव आपल्या स्वतःच्या आयुष्यभर देव म्हणून वावरला. त्याने देव म्हणून चमत्कार केले, व तो आपल्या काळी देव मानला गेला, हेच आपण धरून चालतो. मागाहूनचे संस्कृत लिखाण हेच सांगते. मराठीत तर पांडवप्रताप, भक्तिविजय हे ग्रंथ, रुक्मिणीस्वयंवर, सुभद्राहरण ह्यांची रसभरित आख्याने, त्यांवर आधारलेली नाटके ही तर कृष्णाबद्दल हीच भावना दृढ रुजवितात. महाभारत वाचताना त्यामुळे आश्चर्याचा एक धक्का बसतो. कृष्ण असामान्य मानव – पण मानवच – असे महाभारतात चित्रण आले, त्याचे काही नवल वाटत नाही; पण 'वासुदेव' म्हणवून घेण्याचे त्याचे प्रयत्न, दुसऱ्या काही जणांचा तोच अट्टहास, कृष्णाला आपले 'वासुदेवत्व' टिकविण्यासाठी त्यांना मारावे लागणे, हे उल्लेख वाचून मन बुचकळ्यात पडते.

महाभारतात ह्या प्रकरणाचा काही उलगडा होत नाही; जैन वाङ्मयात होतो. जैनांची 'वासुदेव'-कल्पना पुढीलप्रमाणे आहे: जैनांनी कालचक्राचे चोवीस भाग कल्पिले आहेत. त्यांतील बारा भाग 'उत्सर्पिणी' (वर जाणाऱ्या) अवस्थेचे व बारा भाग 'अवसर्पिणी'

(खाली येणाऱ्या) अवस्थेचे धरतात. खालून वर येणाऱ्या अवस्थेत सर्व जीवमात्र जास्त-जास्त चांगल्या मूल्यांकडे जात राहतात, तर अवसर्पिणीत त्यांची अधोगती होत राहते. ह्या कालचक्राच्या काही-काही विभागांत मिळून नऊ 'वासुदेव', नऊ 'बलदेव' व नऊ 'प्रतिवासुदेव' असे निर्माण झाले. अवसर्पिणीतच राम व कृष्ण असे दोन 'वासुदेव' झाले. सर्व नऊ वासुदेवांच्या आयांची व बापांची नावे दिलेली आहेत. रामाची आई केगमई व बाप दशरथ, कृष्णाची आई देवकी व बाप वसुदेव म्हणून कृष्ण (कण्ह) हा पैतृक अर्थाने 'वासुदेव' होता. 'वासुदेव' अखिल त्रिखंडभरत-चक्रवर्ती असत. रामाला बलदेव लक्ष्मण होता, प्रतिवासुदेव रावण होता. कृष्णाला बलदेव बलराम होता, प्रतिवासुदेव कंस होता. सात वासुदेव गौतमगोत्री, आठवा राम दाशरथी व नववा कृष्ण वासुदेव हे दोन्ही कच्छप-गोत्री. सर्व वासुदेवांची स्वतःची अशी सात 'रत्ने' असत. ती म्हणजे चक्र, खड्ग, धनू, मणी, माला, गदा व शंख. कृष्णालाही चक्र, खड्ग, कौमोदकी गदा, वैजयंती माला, स्यमतक (?) मणी, शार्ङ्ग धनू होतेच. 'अभावो नात्थि वासुदेवाणम्' ('वासुदेवांना कशाची कमतरता नसते.') हिंदूंच्या कल्पनेने वरील वाक्य घ्यावयाचे, म्हणजे वासुदेव हे पूर्ण सगुण – सर्वसंपन्न – असे पुरुषोत्तम होते, असा अर्थ लावता येईल. आणखी दोन गोष्टी सांगितल्या आहेत. 'अवगुणं न गिण्हन्ति'. म्हणजे कितीही तुच्छ वा भयंकर गोष्ट असली, तरी तीत त्यांना काहीतरी चांगले सापडते. हा गुण 'अभावो नत्थि' याला पूरक समजला पाहिजे. 'नीएण जुज्झेण न जुज्झंति' ('खाली उभे राहून लढत नाहीत.') हा त्यांचा रथित्वाचा निदर्शक समजला पाहिजे.

ह्या सर्व कल्पनेत काही सनातन कल्पना, काही बौद्ध संप्रदायाच्या कल्पना, काही ख्रिस्ती (?) कल्पना ओळखू येतात. सत्ययुगापासून

कलीपर्यंत चतुष्पाद धर्माचा एक-एक पाय तुटत होता, ही कल्पना अवसर्पिणी कालचक्रात येते. वासुदेव, प्रतिवासुदेव वगैरे एकेका कालखंडाचे प्रतिनिधी ही आपल्या मनूच्या कल्पनेप्रमाणे आहे. पूर्णपुरुष ही कल्पना – दशावतार (नऊ वासुदेव?) ही कल्पना आपल्याकडे आहेच. वासुदेव-प्रतिवासुदेव ही कल्पना, ख्रिस्त-प्रतिख्रिस्त (Christ-anti-Christ) यांसारखी वाटते. 'अवगुणं न गिण्हन्ति' ही कल्पना बौद्धवाङ्मयात वारंवार येते. ह्या कल्पना कोठून आल्या वगैरेत शिरले, तर कृष्णचरित्र बाजूलाच राहील. एवढे मात्र दिसते की, महाभारतात वासुदेवाचा व पुरुषोत्तमाचा उल्लेख अशा तऱ्हेने आला आहे की, ती एक कृष्णाची महत्त्वाकांक्षा होती, असे समजते. वासुदेवाची चिन्हे होती, असे समजते. पण या कल्पनेचा उलगडा काही नीट होत नाही. भारताचे वैचारिक धन, कथा, कल्पना, मूल्ये, तत्त्वज्ञान, धर्म ही सर्वच इतक्या निरनिराळ्या तऱ्हेने, निरनिराळ्या उगमातून आलेली आहेत की, त्यांचा अभ्यास केवळ तत्त्वशोधक दृष्टीने होणे जरूर आहे.

महाभारतात जे काही अर्धवट उल्लेखिलेले व अतिशय कुतूहल जागृत करणारे विषय आहेत. त्यांमध्ये 'वासुदेव' हा एक आहे. त्या काळात तीन लोक वासुदेव होण्याची मनीषा बाळगून होते, असे दिसते. एक वसुदेवाचा मुलगा वासुदेव कृष्ण; दुसरा शिशुपाल. ह्याला जन्मतःच चार हात होते. यांतील दोन कृष्णाच्या दृष्टिपातानेच गळून पडले व त्यानंतर त्याने वासुदेव होण्याचा प्रयत्न केलेला दिसत नाही. पण त्याचे कृष्णाशी भयंकर वैर होते, असे दिसते. पूर्वेकडे (?) पौंड्र देशाचा राजा स्वतःला 'वासुदेव' म्हणवून घेई. कृष्ण स्वतः सांगतो की, 'हा पौंड्र माझी चिन्हे धारण करतो.' पौंड्रावर चाल करून कृष्णाने त्याला युद्धात मारले. त्याचे कारण तो स्वतःला 'वासुदेव'

म्हणवून घेई हे! 'वासुदेव' हे नाव प्राप्त करून घेणे म्हणजे काय होते, हे स्पष्ट कोठेही सांगितलेले नाही. पण वासुदेव म्हणवून घेण्याची कृष्णाची धडपड पाहिली, म्हणजे त्यात काहीतरी विशेष होते, ह्याबद्दल शंका राहत नाही. कोठच्याही राज्याचा राजा नाही; सम्राट तर नाहीच नाही; पण वासुदेव असलेला असा कृष्ण होता. भगवद्गीतेत कृष्ण स्वतः म्हणतो, 'वृष्णीनां वासुदेवोऽहम्'. वसुदेवाला पुष्कळ बायका होत्या व त्यांना बलराम, सारण वगैरे मुलगेही होते. पण फक्त कृष्णच आपल्याला वासुदेव म्हणवून घेई, हे कसे? प्रत्येक मुलाला आपल्या आईवरून नाव पडे. जसे रौहिणेय, कौंतेय, माद्रेय वगैरे. पण जरी निरनिराळ्या आयांचे मुलगे असले, तरी एका बापाचे असले, म्हणजे सर्वांचे पैतृक नाव सारखे असावयाचे. उदाहरणार्थ, धर्म, भीम, अर्जुन हे कौंतेय होते व नकुल, सहदेव माद्रेय होते, व पाचही जण पांडूचे म्हणून पांडव होते. त्याप्रमाणे खरे पाहिले, तर वसुदेवाच्या सवच मुलांना वासुदेव ही संज्ञा असावयास पाहिजे होती. पण ती फक्त कृष्णालाच तेवढी दिसते. म्हणजे वासुदेव हे पैतृक नाव नसून काही विशेष अधिकार प्राप्त झालेल्या व्यक्तीनेच फक्त घ्यावयाचे ते पद होते. ज्याप्रमाणे राजसूय यज्ञ केलेल्या माणसाला सम्राट-पदवी प्राप्त होई, व एकाच वेळी राजसूय यज्ञ केलेले दोन राजे असू शकत नव्हते, तसेच काहीतरी वासुदेव ह्या पदवीत असावे. वासुदेव म्हणवून घेण्याची धडपड काही राजे करीत. पण खरोखर ती पदवी एकच धारण करू शकत असे.

कृष्णाच्या वर्णनामध्ये एक गोष्ट प्रामुख्याने नजरेस येते. डोळे दिपतील अशा तऱ्हेचे दैवी तेज व असामान्य वैभव त्याच्याजवळ होते. त्याचा रथ, त्याचे घोडे, तो स्वतः कोठेही असला, तरी लोकांचे डोळे दिपत असत. तो रत्ने व संपत्ती ह्यांचा

स्वामी होता. 'वासुदेव' ह्या शब्दातही तो अर्थ प्रतीत आहे. 'वसू' म्हणजे संपत्ती, समृद्धी असा अर्थ होतो. 'देव' हा शब्द तेजस्वीपणा व अतिमानुषता दाखवितो. कृष्णाने लोकांचे डोळे दिपवून टाकायचे प्रसंग महाभारतात ठिकठिकाणी आलेले आहेत. सर्व ऋद्धिसिद्धी ज्या ठिकाणी एकत्र झालेल्या आहेत, ती व्यक्ती म्हणजे वासुदेव, अशी कल्पना मनात येते. आपण अशी व्यक्ती आहोत, असा कृष्णाचा आग्रह होता; व तसे असल्याबद्दल आपल्याला सर्वांनी मान्यता द्यावी, असा त्याचा अट्टहास होता, असे वाटते.

बौद्ध वाङ्मयामध्ये कृष्ण वासुदेव (कण्ह वासुदेव) हा देवगब्भा व अंधकवण्ही ह्यांचा मुलगा होता, असे म्हटले आहे. म्हणजे बापाचे नाव वसुदेव असे दिलेले नाही. ह्याहीवरून वासुदेव हे पैतृक नाव नसून तो काहीतरी अधिकार असावा, असे वाटते. वर सांगितल्याप्रमाणे जैनांच्या संप्रदायामध्ये वासुदेव-कल्पना काय आहे, हे कळते. जैन संप्रदाय हा बौद्ध धर्माच्याही आधीचा होता. भारतीय युद्धाच्या पूर्वीही जैन किंवा तत्सम पंथ असेल. त्यांच्या संप्रदायाप्रमाणे दैवी सामर्थ्य व कर्तबगारी असलेली 'वासुदेव' पदवी मिळविणारी अशी व्यक्ती दर कालखंडात होऊन जाई, असे दिसते. वासुदेव-पदवीला योग्य कोण, कशामुळे वासुदेव-पदवी मिळविता येई, ह्या गोष्टी जैन वाङ्मयात काय, किंवा महाभारतात काय, कोठेही स्पष्ट केलेल्या नाहीत. ती पदवी मिळविण्याची श्रीकृष्णाने अतिशय खटपट केली व कृष्णाच्या आयुष्यात त्याची स्वतःबद्दल अशी जी आकांक्षा होती, ती 'वासुदेव' होण्याची होती, यात शंकाच नाही. म्हणजे 'न मे पार्थास्ति कर्तव्यम्' असे म्हणणाऱ्या कृष्णाला स्वतःबद्दल, कुलाबद्दल व समाजाबद्दल काही आकांक्षा व ध्येये होती, व ती पार पाडण्यासाठी त्याने धडपड केली, हे स्पष्ट होते.

भीमाने जरासंधाचा वध केला. धर्माच्या राजसूय-यज्ञात कृष्णाला अग्रपूजेचा पहिला मान मिळाला. त्याच निमित्ताने शिशुपालाचाही वध झाला. ह्या सर्व प्रकारानंतर पांडवांचा पाहुणचार घेऊन, सर्वांचा निरोप घेऊन कृष्ण द्वारकेला परत गेला. जिवाच्या भयाने लपत-छपत रानोमाळ हिंडणारे पांडव इंद्रप्रस्थात दिग्विजयी सम्राट म्हणून मिरवले. पांडवांच्या आयुष्यातला हा विजयाचा क्षण कृष्णाच्याही आयुष्यातील परमोच्च बिंदू होता. सामाजिक, कौटुंबिक व वैयक्तिक अशा सर्व महत्त्वाकांक्षा ह्या क्षणी कृष्णाच्याही बाबतीत पुऱ्या झाल्या होत्या. यादव द्वारकेमध्ये स्थिर झाले होते. इंद्रप्रस्थाला पांडव व हस्तिनापुराला कौरव ही दोन्ही घराणी यादवांच्या नात्यातील व स्नेहातील होती. शिशुपालाच्या गादीवर शिशुपालाचा मुलगा बसला होता. तो कृष्णाला अनुकूल होता. जरासंधाच्या मुलाला अभय देऊन जरासंधाच्या राज्यावर बसविले होते. एकमेकांशी तुल्यबल असलेले राजे एकमेकांशेजारी नांदत होते. म्हणजे क्षत्रियसमाजाची घडी पूर्ववत झाली होती. एवढेच नव्हे, तर यादवांच्या दृष्टीने त्यांचे प्रतिस्पर्धी नाहीतसे होऊन मित्रराज्ये त्यांच्या शेजारी स्थापन झालेली होती. हे सर्व होत असताना कृष्णाच्या शौर्याची व शहाणपणाची छाप सर्वांवर बसली होती. काही थोडे असंतुष्ट लोक वगळल्यास कृष्णाचे वैयक्तिक महत्त्व इतरांना मान्य होते. सार्वजनिक दृष्टीने या मान्यतेला अग्रपूजेच्या वेळी शिक्कामोर्तब झाले. राजा नसूनही, वयाने सर्वांत वडील नसूनही, क्षत्रियांच्या सभेत कृष्णाला हा मान मिळाला होता. इतके करूनही अजून एक राजा स्वतःला वासुदेव म्हणवून घेणारा राहिला होता. पण त्याला मारणे कृष्णाला कठीण नव्हते. म्हणजे वासुदेवत्व सर्वस्वी प्राप्त झाले नसले, तरी हातात आल्यासारखे होते. कृष्णाचे सर्व हेतू साध्य होऊन तो कृतकृत्य झालेला होता. नंतरच्या कथाभागावरून

आपल्याला समजते की, इंद्रप्रस्थाहून निघाल्यावर कृष्ण लगेच आपल्या काही उरलेल्या शत्रूंचा समाचार घेण्यात गुंतला.

सर्व आयुष्यभर जे मिळवायची धडपड केली, जे स्वप्न उराशी बाळगिले, ते प्रत्यक्षात उतरले होते. पण ही सफलता क्षणजीवी ठरली. मोठ्या प्रयासाने बांधलेली ही इमारत अनपेक्षितपणे व धर्माच्या नादानपणामुळे एका क्षणात गडगडली. कृष्णाची साध्ये ही विशाल असली, तरी पांडवांच्या वैयक्तिक महत्त्वाकांक्षेशी निगडित झालेली होती. पांडव सुप्रतिष्ठित असणे हे कृष्णाच्या साध्यांना आवश्यक होते. पांडव इंद्रप्रस्थात राहून त्यांची आणि धार्तराष्ट्रांची कुरबूर झाली असती, तरी कृष्णाच्या हेतूला तडा गेला नसता. पण धर्मराजाच्या कृत्यामुळे सगळ्याच हेतूंचा एक प्रकारे नाश झाला. कृष्णाचे वासुदेवत्व राहिले. वैयक्तिक मोठेपणा राहिला. पण बाकी सर्व गेले.

धर्माच्या राजसूय यज्ञाच्या वेळेला सर्व क्षत्रिय घराण्यांचा म्हणून जो एक तोल साधलेला होता, तो इंद्रप्रस्थाचे राज्य पांडवांच्या हातून गेल्यामुळे कोलमडून पडला. ह्या प्रसंगी कृष्णाच्या मित्रप्रेमाची कसोटी लागली. पांडवांनी आपले राज्य नादानपणाने घालविले, ह्याचा अर्थ एवढाच झाला की, अर्धे तोडून दिलेले राज्य हस्तिनापूरच्या शाखेला परत मिळाले. पांडवांनी आपल्या हातांनी आपला नाश करून घेतला. झाले त्याला इलाज नाही, असे म्हणून कृष्णाला स्वस्थ बसता आले असते. कौरवही त्याचे मित्रच होते. द्यूताचे आमंत्रण क्षत्रियाला नाकारता येत नाही, असा धर्मराजाचा दावा होता. तो जरी खरा मानून चालले, तरी बायकोसुद्धा सर्वस्व पणाला लावणे हे निश्चित योग्य नव्हते. चाललेल्या द्यूतात चुकून एकदासुद्धा फासे आपल्या बाजूला पडत नाहीत हे दिसूनही, हे द्यूत खरेपणाने खेळले जात नाही हे धर्माला न उमजावे, हेही आश्चर्यच. एक

प्रकारच्या धुंदीत धर्मराज द्यूत खेळत होता, असे वाटते. अशा या नादान मित्रांना कृष्णाने सोडले असते, 'नशीब तुमचे,' असे म्हणून तो गप्प बसला असता, तरी त्याचा राजकीय, सामाजिक व कौटुंबिक डाव स्थिर राहिला असता. 'आम्ही यादवांनी नाही का आमच्या जन्मभूमीवरून पळून जाऊन दुसरीकडे राज्य स्थापिले? तुम्हीही लांब जाऊन तसेच करा; या कौरवांचा शेजारच नको; मी तुम्हांला मदत करतो," असेही त्याला म्हणता आले असते. पांडव वनवासात गेल्यानंतर कृष्ण त्यांना भेटायला आला, तेव्हा झाल्या गोष्टीबद्दलची त्याची तीव्र निराश व हळहळ व्यक्त झाली आहे. "मी असतो, तर हे द्यूत मी कदापि खेळू दिले नसते," हे शब्द त्याने परत-परत उच्चारले, पण ह्या कठीण प्रसंगी त्याला मैत्रीचा विसर पडला नाही. तो पांडवांच्या बाजूने ठाम उभा राहिला. वनवास व अज्ञातवास चुकविता येणे शक्य नव्हते; पण पांडवांच्या मुलाबाळांची व्यवस्था त्याने पांचालांच्या मदतीने पार पाडली. पांडव वनवासातून आल्यावर लढाई न होता काहीतरी तडजोड करण्यासाठी त्याने आपल्या प्रयत्नांची पराकाष्ठा केली. दुर्योधनाच्या सभेत शिष्टाईचा प्रयत्न फसल्यावर द्रौपदीची लालूच दाखवून कर्णाला फोडण्याचा त्याने प्रयत्न केला. शिष्टाईच्या वेळेला आपल्या मित्रांच्या वतीने अर्धे राज्य न मागता 'काही थोडे तरी दे,' असे म्हणण्याची लाचारी त्याने पत्करली. पण त्याचे सर्व प्रयत्न फुकट गेले. 'तुम्ही आपापसांत भांडा; मी आपला बाजूला राहतो,' असे बलरामाप्रमाणे त्याला म्हणता आले असते. पण तसे न करता परत तो मित्रांच्या बाजूने उभा राहिला. ह्या सर्व प्रकरणात कृष्णाच्या मैत्रीचा दृढपणा दिसून येतो. त्याच्या मित्रांनी काही इतरांच्या अन्यायाने, काही स्वतःच्या गुणांनी सर्वस्व गमावले होते. त्या अन्यायाचा प्रतिकार करायला कृष्ण

सिद्ध होता. दूरवरचे परिणाम सर्व काही त्याला दिसले असतील, असे म्हणवत नाही. पण काही थोडे परिणाम तरी डोळ्यांपुढे दिसतच होते. वर म्हटल्याप्रमाणे त्याने मोठ्या प्रयत्नाने दूरदर्शीपणाने जमविलेली व्यवस्था ह्या त्याच्या उतावळ्या, शूर, पण नाकापलीकडे न दिसणाऱ्या मित्रांनी गमावली. त्यांच्याबद्दल कृष्णाने रागाचे शब्द काढले, पण गेलेले मिळवून देण्यासाठी त्याने मदतच केली.

अर्जुनाला लढाईला उभे राहाण्याचा उपदेश करताना कृष्णाची वाक्ये वरील संदर्भात वाचली, म्हणजे त्याला एक निराळाच अर्थ प्राप्त होतो. कृष्णाच्या जीवनमूल्यांवर, जीवनविषयक दृष्टिकोणावर एक निराळाच प्रकाश पडतो. पांडवांना राज्य मिळाल्याबरोबर कृष्णाचे हेतू साध्य झाले होते; त्याचप्रमाणे पांडवांच्या राज्य गमावण्याबरोबर ते धुळीला मिळाले होते. तो विचार करून उघड्या डोळ्यांनी कर्म करीत होता. त्याचे स्वतःचे असे काही साध्य व्हायचे नव्हते. त्याच्या संपत्तीत, त्याच्या कीर्तीत नवी भर पडायची नव्हती. काही बाबतीत सर्वस्वहानी झाली होती, तरी कर्तव्य म्हणून तो लढाईला उभा राहिला. अर्जुनाला त्यातून काहीतरी मिळणार होते, पण कृष्णाला तर काहीच मिळणार नव्हते. ‘हतो वा प्राप्स्यसि स्वर्गं जित्वा वा भोक्ष्यसे महीम्’. कृष्ण त्या लढाईत मरायचा तर नव्हताच, किंवा लढाई जिंकून राजाही व्हायचा नव्हता. त्याचा सर्वस्वी हेतुनिरपेक्ष, स्वार्थनिरपेक्ष लढा होता. तो मित्रकार्य करीत होता. त्याच्या दृष्टीने मित्रांची बाजू न्यायाची होती, दुर्बलही होती. प्रत्यक्ष पांडव व पांचाल शूर होते. स्वतःचे गमावलेले मिळविण्याच्या हिरिरीने ते लढत होते. ह्या गोष्टी जरी खऱ्या असल्या, तरी कौरवांचे सैन्य पांडवांच्यापेक्षा कितीतरी मोठे, दिढीपेक्षा अधिक होते. कृष्णाच्या कुशल धोरणाने पांडव वाचले.

एक फार वाईट गोष्ट ह्या युद्धामुळे झाली. कृष्णाच्या संभाळून घेण्याच्या वृत्तीमुळे यादवांमधील आपापसांतील दुहीवर झाकण पडले होते. यादवांत निरनिराळे गट होते. पण कृष्णाने त्या गटांच्या स्पर्धेला व वैमनस्याला लगाम घातला होता. ह्या युद्धाच्या निमित्ताने ते गट उघडे झाले. कृष्ण व त्याच्याबरोबर सात्यकी वगैरे त्याचे मित्र पांडवांच्या बाजूला होते. कृतवर्मा व भोज दुर्योधनाच्या बाजूला होते आणि कोणाच्याच बाजूला लढणे नको म्हणून बलराम बाहेर निघून गेलेला होता. यादवांत उघड-उघड दोन तट पडले. बाहेरून दिसावयाला एकसंध असलेली यादवांची फळी या निमित्ताने भंगली. जुन्या कुरबुरीत नव्या हेव्यां-दाव्यांची भर पडली, आणि यादवांच्या अंताची बीजे महाभारत-युद्धात पेरली गेली. यादवांचा अंत कृष्णाला दिसला, असे म्हणवत नाही, पण यादवांची दुफळी झाली, हे तर त्याच्या डोळ्यांपुढे स्पष्ट होते. याचे परिणाम काही चांगले होणार नाहीत, हे समजण्याची प्रज्ञा त्याच्याजवळ खासच होती. इतके असूनही तो लढाईला उभा राहिला, त्या वेळी गीतेमधील जो एकेक श्लोक अर्जुनाला उद्देशून म्हणत होता, तो त्याला स्वतःलाच लागू होता. तो लढाईला उभा राहिला, हा प्रसंग काही दृष्टींनी त्याच्या आयुष्यातील मोठ्या त्यागाचा क्षण ठरतो. आकांक्षा धुळीला मिळत असतानाही तो मित्रांसाठी व न्यायासाठी उभा राहिला, हा वेडेपणा की मोठेपणा ?

महाभारतामध्ये निरनिराळ्या प्रसंगी कृष्णाने पांडवांना जो उपदेश केला, त्यात त्याची कपटनीती दिसून येते, असे काहींचे म्हणणे आहे. कृष्ण हा अतिशय प्रज्ञासंपन्न आणि सदैव जागृत अशा व्यक्तींपैकी एक होता. त्या वेळच्या नीतीला धरून उघड्या डोळ्याने तो वर्तन करीत होता. त्याला जे वर्तन अतिशय गर्ह्य वाटत होते,

त्याचा बीमोड करण्यासाठी त्याने मोठे संकट पत्करले. फक्त तिघांनी जाऊन भीमाच्या एकट्याच्या बळावर जरासंधाचा वध करावयाचा, ह्या गोष्टीत युक्ती तर होतीच, पण त्याहीपेक्षा मोठे धाडस होते. जरासंधाच्या सैन्याशी सामोरे उभे राहून युद्ध करणे शक्य नव्हते. त्या सैन्यापुढे पळताना यादवांना भुई थोडी झाली होती. जरासंध स्वतःही निष्णात आणि बलशाली योद्धा होता. पण त्याच्याशी एकट्याशी लढाई करणे शक्य होते. भीमाच्या शक्तीवर व मल्लयुद्ध-निपुणतेवर कृष्णाचा विश्वास होता. तितकाच अर्जुनाच्या व स्वतःच्या शस्त्रविद्येवर होता; तरीही इतक्या लांब जाऊन समोरासमोर युद्ध करण्याची मागणी करणे हे मोठ्या धाडसाचे काम होते, यात शंकाच नाही. लढाई करताना 'जरासंध दमला आहे; आता त्याला उसंत मिळू देऊ नकोस,' असा त्याने भीमाला इशारा दिला, यातही काही खोटेपणा नव्हता. भीम निश्चितच जरासंधापेक्षा बलवान होता, आणि त्याने सरळ लढाईत जरासंधाला मारले. लढाईला उभे राहण्याआधी 'कैदेतील राजांना सोड,' म्हणून कृष्णाने जरासंधाजवळ मागणी केली होती. 'ती झिडकारलीस, तर आमच्यापैकी कोणाशीही युद्ध कर,' अशी दुसरी मागणी होती. झालेला व्यवहार सरळ होता. तसेच रुक्मिणीला पळवून नेले, हेही सर्वस्वी त्या वेळच्या राजनीतीला धरून होते. भीष्माने काशिराजाच्या मुली स्वयंवरमंडपामधून पळवून आणिल्या होत्या. रुक्मिणी काही शिशुपालाची वाग्दत्त वधू नव्हती. तिच्या भावाच्या मनात काहीही असले, तरी एकदा स्वयंवर मांडल्यावर मुलीला पळवून नेणे हे शक्य असल्यास तसे करणे हे क्षत्रियनीतीला धरून होते. शिशुपालाचा तिसरा आक्षेप होता, 'कृष्ण राजा नाही,' हा! तोही फोलच होता. अर्जुनाने द्रौपदीला जिंकले, तेव्हा तो काही राजा नव्हता; एवढेच नव्हे, तर थोरला भाऊ

जिवंत असल्यामुळे राजा होण्याची शक्यताही नव्हती. राजा नाही, म्हणून कृष्णाला हिणविणारा शिशुपाल त्याच तोंडाने 'भीष्माला अग्रपूजा द्या,' म्हणत होता. भीष्मही राजा नव्हता. शिशुपाल कृष्णाचा प्रतिस्पर्धी होता; जरासंधाच्या प्रमुख सेनापतींपैकी होता. प्रत्येक बाबतीत कृष्णाने आपल्यावर कडी केली, म्हणून चिडलेला होता. त्याच्या आरोपांमध्ये काही खरे, काही खोटे असे होते. भीष्माबद्दल व कृष्णाबद्दल काही थोड्या लोकांना काय वाटत असे, हे त्याच्या तोंडून वदविले गेले आहे. कृष्णाच्या कृत्यांची छाननी केल्यास जी कृत्ये शिशुपालाने दोषास्पद ठरविली होती, ती तशी होती, असे म्हणता येत नाही. शिशुपालाचा वध हे मात्र काहीसे दोषास्पद वाटते. तो वधाला योग्यच होता. पण आवेशाने बोलत असताना भर सभेत कृष्णाने त्याच्यावर चक्र फेकून मारावे, हे कृत्य खटकल्याखेरीज राहत नाही. तसे करण्यावाचून गत्यंतर नव्हते, एवढे मात्र खरे! सर्व राजसूय यज्ञ पार पडलेला होता. आलेल्या राजेलोकांचा सन्मान करून त्यांना परत पाठविणे एवढेच कृत्य उरले होते. पांडवांनी भीष्माला पुढे करून कृष्णाला पहिले अर्घ्य देण्याचा घाट घातला. शिशुपाल उठून त्याने अर्घ्याला हरकत घेण्याचा अतिप्रसंग केला. बोलण्याने बोलणे वाढत चालले होते. राजेलोकांच्यामध्ये चुळबूळ सुरू झाली होती. शिशुपाल युद्धाच्या गोष्टी बोलू लागला होता. अशा वेळी मंडपाबाहेर जाऊन युद्धाला सुरवात झाली असती, तर मोठेच विघ्न झाले असते. एकटा शिशुपाल तडकाफडकी मारला गेल्यामुळे कोणाला काही करता येईना. हा प्रसंग झाल्यावर आश्चर्याने व भीतीने सर्व सभा स्तब्ध झाली. काही राजे चुळबुळत, हात चोळीत स्वस्थ बसले होते, असे महाभारतात वर्णन आहे. कृष्णाने शिशुपालाला असे मारले नसते, तर राजसूययज्ञाचा

शेवट मोठा वाईट झाला असता. शिशुपालाला मंडपातून रागारागाने बाहेर जाऊ देणे हे योग्य नव्हते.

ह्या प्रसंगात ज्या एक दोन गोष्टी प्रामुख्याने लक्षात येतात, त्या इतर वेळीही येतात :

१. मनुष्य जन्मला, म्हणजे त्याचे स्वतःचे वर्तन व सामाजिक संबंध त्याला एका कोंडीत पकडतात. त्याचा स्वतःचा ताबा नाही, अशा प्रसंगांत तो सापडतो, व त्याच्या हातून काही कार्ये होत राहतात. भीष्माच्याही बाबतीत आपण हेच पाहिले. धृतराष्ट्राच्या बाबतीत व महाभारतातील प्रत्येक व्यक्तीच्या बाबतीत हेच घडत गेले. 'भ्रामयन् सर्वभूतानि यन्त्रारूढानि मायया' असे हे अनाकलनीय व अटळ चक्र आहे. एकदा त्याच्यात मनुष्य सापडला की, त्याच्या कृत्याला ठराविक दिशा लागत जाते. प्रत्येक कृत्याच्या बाबतीत करू की न करू हे स्वातंत्र्य राहत नाही. एका ठरलेल्या दिशेने आयुष्याचा मार्ग जाऊ लागेल, तसतसे हे स्वातंत्र्य कमी-कमी होत जाते.

२. आयुष्यामधील निवड खरे-खोटे, चांगले-वाईट अशा दोन टोकांमध्ये क्वचितच असते. थोडे वाईट, थोडे चांगले अशा मिश्र स्वरूपाच्या कृत्यांमधून माणसाला निवड करावी लागते. सर्व दृष्टींनी चांगले व सर्व दृष्टींनी वाईट, अशा तऱ्हेने निवड करायची संधी क्वचितच मिळते. त्यामुळे कोणचीही निवड केली, तरी थोडे वाईट येतेच. अगदी तोलून, मोजून-मापून पाहिले, तर प्रत्येक व्यावहारिक कृत्यामध्ये काहीतरी दोषास्पद असतेच. त्यातूनही मोजून-मापून पाहणारा परीक्षक बहुतेककरून झाल्या-गेल्या गोष्टीबद्दल मते देत असतो. दोन किंवा तीन मार्गांमधून कुठची निवड केली, आणि त्यांचे परिणाम काय झाले, हे त्याला दिसत असते. केलेल्या

निवडीचे परिणाम काय झाले, हे ह्या मागाहून आलेल्या टीकाकाराला माहीत असतात. पण प्रत्यक्ष जी व्यक्ती स्वतःच्या आयुष्यात आणीबाणीच्या प्रसंगी दोन वाटांपैकी एक वाट टाकून दुसऱ्या वाटेने जाते, ती कितीही शहाणी व दूरदृष्टीची असली, तरी तिला संपूर्ण भविष्यज्ञान होत नाही. त्या व्यक्तीपुढे त्या प्रसंगाची, त्या क्षणाची आणीबाणी असते. त्यातच स्वतःचे क्रोध, मोह, एक प्रकारची कर्तव्यनिष्ठा, वगैरे विकार असतात. स्वतः कृष्णही ह्या दोन्ही नियमांना अपवाद नव्हता. तोही स्वतः केलेल्या कृत्यांच्या व स्वतः आखलेल्या ध्येयांच्या भोवऱ्यात सापडलेला होता. धीर प्रकृतीचा व विचारशील असूनही त्यालाही राग, मित्रप्रेम हे विकार होतेच. ज्या वेळी तो एखादे कृत्य करी, किंवा दुसऱ्याला एखादे कृत्य करण्याला प्रवृत्त करी, त्या वेळी त्याच्यापुढे जी निवड होती, ती उत्तम किंवा अधम यांच्यामधील नसून मिश्र अशा मध्यम प्रकारच्या कृत्यांमधील होती.

सबंध महाभारतामध्ये त्याने केलेली मुख्य कृत्ये म्हणजे अर्जुनाच्या मदतीने खांडववनाचा दाह, जरासंधवध, शिशुपालवध, पांडवांच्या वतीने कौरवांकडे शिष्टाई, द्रौपदीची लालूच दाखवून कर्णाला फोडण्याचा प्रयत्न, भीष्माला रथावरून खाली पाडण्यासाठी अर्जुनाचे मन वळविणे, द्रोणाचे धैर्य खचविण्यासाठी अश्वत्थाम्याला मारल्याचा बभ्रा करणे ही आहेत. खांडवदाहाबद्दल मागे लिहिलेच आहे. खांडवदाह-प्रकरणी नागांचा वंशच्छेद व एक मोठे अरण्य जाळणे ही दोन्ही कृत्ये आत्ता विचार केला, तर गर्ह्य वाटतात. पण कृष्णाच्या वेळेला कोणीही हे कृत्य गर्ह्य मानले नाही. कृष्णाच्या प्रत्येक कृत्याबद्दल टीका करणाऱ्या शिशुपालालाही हे कृत्य गर्ह्य वाटले नाही. परवंशाबद्दल असहिष्णुता, शक्य तर त्यांचा उच्छेद

ह्या गोष्टी पूर्वी सर्व जगातील लोक सरसकट करीत होते. कृष्णाने केले, ते त्याच्या काळाला व त्याच्या क्षत्रिय वर्णाला धरून होते. ते नसते केले, तर तो, आपल्याच युगातील असामान्य व्यक्ती न राहता देशकालातीत असामान्यत्व त्याला प्राप्त झाले असते. आपल्या जमातीतीत नसलेल्या अशा सर्व मानवजातीबद्दल करुणा हा गुणच महाभारतकालीन नव्हे! त्या वेळच्या इतर सुसंस्कृत देशांनासुद्धा तो गुण माहीत नव्हता. होमरचे इलियड वाचले, तरी हेच अनुभवास येते. सबंध मानवजातीबद्दल कणव वाटली, ती पुढील युगांतील पुरुषांना – बुद्धाला व ख्रिस्ताला! भगवद्गीतेमध्ये कृष्णाने अर्जुनाला जो उपदेश केलेला आहे, त्यातील पहिले जेमतेम तीन अध्याय मूळ भगवद्गीता असावी, असे वाटते. भगवद्गीतेच्या पुढील-पुढील अध्यायांत सांगितलेल्या जगन्मित्रत्व व जगाबद्दल करुणा ह्या दोन गुणांचा वासही महाभारतात नाही.

'दया भूतेषु', 'अहिंसा' हे शब्द महाभारतात येतात, पण अहिंसेचा अर्थ प्राण्यांना न मारणे असा नसून मित प्रमाणात व ठरलेल्या नियमांना धरून मारणे असा होता. गीतेच्या पहिल्या किंवा दुसऱ्या अध्यायात 'कृपा' हा शब्द थोड्याशा हेटाळणीनेच वापरलेला आहे. 'कृपयाविष्ट' अर्जुन किंवा अर्जुनाची 'कृपयाविष्टता' हे एक क्षत्रियाला न शोभेसे वर्तन होते. 'विषीदन्तम्' हेही विशेषण क्षत्रियाला न शोभेसे आहे, ह्या विषादामुळे व करुणेमुळे अर्जुनाच्या हातून शस्त्रे गळून पडली होती. डोळ्यांतून पाणी वाहत होते. तो रथात बसून राहिला होता. आणि ह्या तिन्हीबद्दल कृष्ण जी विशेषणे लावतो, ती विचार करण्यासारखी आहेत. त्याला तो 'कश्मल' म्हणतो. 'कश्मल' ह्या शब्दाचे काळेबेरे किंवा पाप ह्या शब्दांनी मराठीत भाषांतर करण्यासारखे आहे. 'कुतस्त्वा कश्मलमिदं विषमे

समुपास्थितम्’, (=‘अरे अर्जुना, ह्या आणीबाणीच्या वेळी हे रे काय तुझ्या मनात काळेबेरे आले आहे?’) असे हे वाक्य! हे त्याचे कृत्य ‘अनार्यजुष्ट’, ‘अस्वर्ग्य’, ‘अकीर्तिकर’ असे होते, असे कृष्ण म्हणतो. अर्जुनाच्या ह्या कृतीला तो पुढे ‘क्लैब्य’ म्हणतो. त्याला वाटणाऱ्या करुणेला ‘क्षुद्र हृदयदौर्बल्य’ म्हणतो. ही कृष्णाची मीमांसा महाभारतामध्ये सर्व क्षत्रियांच्या मनाला धरून होती. ‘अवाच्यवादांश्च बहून् वदिष्यन्ति तव’ असे तो अर्जुनाला सांगतो. व ‘आज नाही, तर उद्या मरायचेच आहे. सरळ सामना देऊन मर. कर्म, जन्म व जातीप्रमाणे आलेले कर्तव्य करण्याचाच फक्त तुला अधिकार आहे. त्या कर्मातून मला काही चांगले मिळेल किंवा वाईट मिळेल, ही चिकित्सा करण्याचा तुला अधिकार नाही. फलाशा धरू नकोस. कर्तव्य म्हणून कर्म कर.” असे सांगतो. अशी महाकठीण, स्वतःबद्दल किंवा इतरांबद्दल करुणेचा लवलेश नसलेली ही नीती होती. आणि त्याप्रमाणे क्षत्रिय पुरुषच नव्हे तर गांधारी, कुंती व द्रौपदी या क्षत्रिय स्त्रियाहा वागल्या.

जरासंधवधाबद्दल वरती आलेच आहे. कृष्णाने तो उघड्या डोळ्यांनी कर्तव्य म्हणून करविला. ह्या कृत्यात नाव ठेवण्यासारखे काहीच नव्हते. शिशुपालवध ही घटना अटळ होती. कृष्णाने रागाच्या भरात ती केली हे जितके खरे, तितकेच महाभारतकथेच्या दृष्टीने त्या वेळी ती व्हावयालाच पाहिजे होती, अशी होती. पांडवांचा राजसूय-यज्ञ निर्विघ्नपणे पार पाडण्याची जबाबदारी कृष्णावर होती. त्यामुळे तो निरनिराळ्या कृत्यांत गोवला गेला होता. बोलाचाली वाढू देणे व यज्ञमंडपातच लढाई उभी करणे शक्य नव्हते. म्हणून शिशुपाल त्याच तऱ्हेने, तिथेच, एकाकी, इतर राजे पुढे सरसावायच्या आत मरणे अत्यावश्यक होते. एक प्रकारे शिशुपाल गाफील होता,

बोलावलेला पाहुणा होता. त्याला तशा तऱ्हेने मारणे योग्य नव्हते. पण त्यानेही पाहुणचाराच्या मर्यादा राखल्या नाहीत. आपल्या यजमानांचा, भीष्मासारख्या वृद्धाचा अपमान करून आपल्या शत्रूवर तोंडसुख घेण्याची संधी शिशुपालाने साधली. तेव्हा कृष्णाने असहाय किंवा निरपराध मनुष्याला मारले, असेही होत नाही. एकदा आगळीक करण्यास सुरवात झाली, म्हणजे त्या आगळिकीस प्रत्युत्तर जितक्यास तितके, जेवढ्यास तेवढे देता येईल, असे होत नाही. शिशुपालाने शिव्या दिल्या, नाहक अपमान केला, याचा बदला परत शिव्या देऊन घेता आला असता. त्याऐवजी कृष्णाने त्याला मारून घेतला. आता हा बदला फार झाला, असे वाटणे शक्य आहे. पण राजेलोकांत भांडण लावून मोठा रक्तपात झाला असता, तो एका शिशुपालाच्या वधामुळे टळला, असेही म्हणता येईल.

पांडव वनवासातून आल्यावर ज्या मसलती झाल्या, त्यांत कृष्णाचा वाटा मोठा होता, व सर्वस्वी योग्य असाच होता. शिष्टाईच्या वेळीही त्याने भांडण मिटावे, म्हणून पराकाष्ठा केली. 'अर्धे राज्य नाही, पाच गावे नाहीत, एवढेच नव्हे, तर सुईच्या अग्राखाली मावेल एवढीदेखील जमीन मी देणार नाही,' या दुर्योधनाच्या उत्तरामुळे लढाईखेरीज उपाय उरला नाही. कौरवांच्या दरबारातून कृष्ण निसटला. त्याने जाता-जाता वाटेत कर्णाला आपल्या रथावर घेतले, व पांडवांच्या बाजूने कर्णाला फितवायचा प्रयत्न केला. कृष्णाला पकडले की पांडवांना लढणे अशक्य होईल, असा ज्याप्रमाणे दुर्योधनाचा कयास, तसाच कर्ण बाजूला निघाला, तर दुर्योधनाला पांडवांचे मागणे झिडकारता येणार नाही, हा कृष्णाचा कयास. सबंध उद्योगपर्वभर शह, काटशह असे प्रकार चालले होते. दुर्योधनाचा प्रयत्न आडदांडपणाचा होता. कृष्ण त्यातून निसटला, व दुर्योधनाचा प्रयत्न

फसला. कृष्णाचा प्रयत्न अगदी याउलट, मोठ्या चतुराईचा; पण कर्णाच्या दुर्योधनभक्तीपुढे व दुखावल्या स्वाभिमानापुढे तोही फसला. कृष्णाने कर्णाला सांगितले, "बाबा, तू कुंतीचा कुवारपणचा मुलगा. शास्त्रार्थाने त्या कुवारणीचे ज्याच्याशी लग्न झाले, त्याचाच तू होतोस. म्हणजे बापाकडून तू पांडव व आईकडून तू वृष्णिकुलातला आहेस. माझ्या बरोबर ये, पांडवांना तू कुंतीचा मुलगा, युधिष्ठिराचा थोरला भाऊ, हे कळू दे. मी तुला राजा म्हणून अभिषेक करवितो. पांडवांतला सहावा म्हणून द्रौपदी तुझी होईल. [षष्ठे च त्वां तथा काले द्रौपद्युपगमिष्यति ।] धर्म तुझा युवराज होईल, भीष्म तुझ्यावर चवरी धरील, अर्जुन तुझे सारथ्य करील. वृष्णि व पांचाल तुझे सेवक होतील. 'वसुषेण' म्हणून तुझ्या नावाची द्वाही फिरेल." कृष्णाने ह्या ठिकाणी कर्णाच्या पाळण्यात ठेवलेल्या 'वसुषेण' नावाचा उच्चार केला. सेन हा प्रत्यय क्षत्रियांच्या नावापुढे असे. त्या नावावरून त्याचे क्षत्रियत्व प्रतीत होते. कर्ण वैकर्तन (कानफाट्या) हे टोपणनाव उच्चारलेच नाही, हाही कृष्णाचा शहाणपणाच.

ही लालूच तर फारच मोठी होती. पण कर्ण बधला नाही. राज्य, मोठेपणा व त्यामुळे द्रौपदी आणि बलाढ्य क्षत्रिय-घराण्यांशी संबंध व मैत्री एवढे सर्व सूत-वंशातील कर्णाला मिळणार होते. ही सर्व वचने पाहिली, म्हणजे भावां-भावांतील युद्ध थांबविण्याचा कृष्णाने किती निकराने प्रयत्न केला, हे दिसते. कर्ण कोणत्याही मोठेपणाला बळी पडणार नाही, हे माहीत होते, म्हणून कृष्णाने अशी भरमसाट प्रलोभने दाखविली, हे म्हणणे योग्य वाटत नाही. पांडव कृष्णाचे एवढे ऋणी होते की, मी सांगेन ते ते ऐकतील, अशी कृष्णाची खात्री होती, म्हणून त्याने ही विलक्षण प्रलोभने कर्णाला दाखविली. ही दाखवीत असता राज्य मिळेल, ह्या आशेवर बसलेल्या

धर्माचा त्याने गळा कापला, किंवा बिचाऱ्या द्रौपदीचा सौदा केला, असे दोन्ही आक्षेप त्याच्यावर येतील. पण त्याने शिष्टाई दांभिकपणे केली, हा आरोप खासच येणार नाही. परत एकदा कृष्णाची मूल्ये ही त्या काळाची मूल्ये होती, हे निदर्शनाला येते. धर्म मोठा भाऊ म्हणून राज्याचा वारस होता. एखादा मनुष्य धर्मापेक्षा वडील, त्याच्या आईचा मुलगा म्हणून राज्याचा वाटेकरी असा पुढे आला असता, व इतर भावांनी त्याला मान्यता दिली असती, तर त्याला राज्य मिळण्याचा चांगलाच संभव होता. राज्याचा वाटा कुंतीच्या मुलांना मिळावा व युद्ध टाळावे, अशा दोन गोष्टी कृष्ण साधू पाहत होता. आपण आपल्या मित्रांचा विश्वासघात करतो आहे, असे त्याला वाटले नाही. द्रौपदीचे अर्जुनावर प्रेम असूनही तिला सर्व पाच जणांची बायको व्हायला लागले होते. त्यात आणखी एकाची भर पडली म्हणून काही वावगे झाले, असे त्याला वाटले नाही. बायकांना मन असते, ही गोष्ट त्या वेळचे कोणतेच पुरुष – भीष्म, वसुदेव, पांडव, कृष्ण – कोणीच मानीत नसत. जे इतर क्षत्रिय करीत असत, तेच ह्या बाबतीत कृष्णानेही केले. द्रौपदीला चीड आली असती किंवा नसती, हा विचार त्याच्या मते गौण होता.

भीष्माचा पराभव, व द्रोणाचा वध ह्या दोन्ही वेळी त्याचे कृत्य असेच सर्वस्वी समर्थनीय होते. आजोबांना मारू नये, गुरूंना मारू नये हे जितके खरे, तितकेच आजोबाने किंवा गुरूने नातवाविरुद्ध व शिष्याविरुद्ध लढाईला उभे राहू नये, हेही खरे! एक आगळीक झाली की, त्याला प्रत्युत्तर म्हणून दुसरी आगळीक करणे प्राप्तच होते. एकदा लढाईला उभे राहिले, म्हणजे ती शेवटपर्यंत नेणे हे कर्तव्यच होते. भीष्माला मार, किंवा द्रोणाला मार, असे त्याने सांगितले नव्हतेच. भीष्माला घायाळ करून लढाईतून बाजूला सारणे एवढाच

त्याचा उद्देश होता. त्याचप्रमाणे भीमाने व धृष्टद्युम्नाने द्रोणाचा रथ पकडल्यावर तो तसाच हाकून गुरुजींना पकडून आणले असते, तरी कृष्णाला पुरले असते. द्रोणाला मारून धृष्टद्युम्नाने वडिलार्जित वैराचा सूड उगवला, हा काही कृष्णाचा अपराध नाही. अश्वत्थामा मेला, ही खोटी हूल उठवायची हाही प्रकार अपरिचित नव्हता. अगदी ह्याच उपायाने हंस व डिम्भक हे जरासंधाचे दोन सेनानी मारले गेले होते. कृष्णाने शिष्टाईच्या वेळेला युद्ध टळावे, म्हणून जशी पराकाष्ठा केली, तसाच युद्धाला एकदा उभे राहिल्यावर ते जिंकावे, म्हणून जिवाचा आटापिटा केला. हीच गोष्ट कर्णाच्याही बाबतीत लागू पडते. जे लढाईला उभे राहिले होते, त्या सर्वांनी आगळीक केलेलीच होती. त्यातील कोणीही निर्व्याज किंवा निरपराधी नव्हता. त्यांना कृष्णाने मारविले, ते काही गाफील अवस्थेत नाही. एवढे म्हणता येईल की, एकदा युद्धाला उभे राहिल्यावर कृष्णाने कोणत्याही तऱ्हेची दयामाया दाखविली नाही. आपल्याला कोणी दयामाया दाखवील, अशी त्याची आशा नव्हती. सर्व लोक मारले गेले, केवळ दुर्योधन उरलेला होता. प्राणभयाने तो लपून राहिलेला होता. तो प्रत्यक्ष दयेची याचना करणारा नव्हता. पण बापाकडून दडपण आणून प्राण वाचवावा, असा त्याचा प्रयत्न असावा, असे वाटते. अगदी निष्ठुरपणे कृष्णाने तोही प्रयत्न हाणून पाडला. दुर्योधन जिवंत राहता, तर त्याने पांडवांना सुखाने राज्य करू दिले नसते, अशी कृष्णाची मनोमन खात्री होती.

दुर्योधन मेल्यानंतर पांडवांना धृतराष्ट्र व गांधारी यांच्यापुढे जाण्याचा धीर झाला नाही. परत कृष्णालाच दुर्योधन मेल्याचा निरोप घेऊन त्यांच्याकडे जावे लागले. गांधारी व धृतराष्ट्र यांच्याशी बोलत असतानाच दूत येऊन दुर्योधनाच्या व अश्वत्थाम्याच्या शेवटच्या

संभाषणाची बातमी सांगत असताना काहीतरी दगाफटका आहे, हे हेरून, आपले भाषण अर्धवट टाकून, घाईघाईने निरोप घेऊन कृष्ण पांडवांच्या शिबिराकडे परत आला. पांडव आणि द्रौपदी यांना घेऊन तो कौरवांच्या ओसाड शिबिरात येऊन राहिला. कृष्णार्जुन जातील, तिथे सात्यकी असायचाच, या न्यायाने सात्यकीही बरोबर होता. रात्रीच्या छाप्यात व निर्घृण कत्तलीत द्रौपदीची मुले व भावंडे मारली गेली, पण पांडव वाचले.

ह्याही घटनेत कृष्णाला दोष देण्यासारखे काहीही नाही. जासुदाच्या बोलण्यावरून काहीतरी घातपात होणार, असे कृष्णाला वाटले. पण तो घातपात नक्की काय होणार, हे काही त्याला कळले नव्हते. मुख्य युद्ध दुर्योधन-पांडवांचे होते. सूडाचे उद्देश्य पांडवच असणार, असे त्याला वाटले असले पाहिजे. लढाई जिंकल्याच्या उन्मादात लढाईच्या वेळची शिस्त व जागरूकपणा पार नाहीसा झाला होता. जे-ते नाचरंगात व दारू पिण्यात दंग होते. प्रत्यक्ष सेनापती धृष्टद्युम्नाची व इतर मोठमोठ्या लोकांची परिस्थिती ही होती. सैन्याची काय होती, हे सांगायलाच नको. कृष्ण हस्तिनापुराहून परत आला, तो रात्र पडली होती. अशा वेळी ह्या अस्ताव्यस्त शिबिराला परत सुस्थित करणे हे दुष्कर काम होते. त्यातूनही ज्यांच्यासाठी सबंध लढाई व वैर उत्पन्न झाले होते, त्या पांडवांनाच बाजूला काढले म्हणजे झाले, असे कृष्णाला वाटले असले पाहिजे. कृष्णाला देवत्वाच्या कोटीला पोहोचवून त्याला सर्वज्ञ किंवा त्रिकालज्ञ करावयाचे, आणि मग त्याने न केलेल्या गोष्टीचेही कर्तृत्व त्याच्याकडे चिकटवावयाचे, किंवा त्याच्या हातून काही गोष्टी घडल्या नाहीत, म्हणून त्याला दोष द्यावयाचा, हे दोन्ही चुकीचे आहे. अर्जुनाने सुभद्रेशी लग्न करावे, म्हणून त्याला वनवास घडवावयाचा; त्रिदंडी संन्यास घ्यायला लावायचा,

आणि यति म्हणून त्याला अंतःपुरात आणून बसवायचा; बलराम-दादाला फसवायचे, वगैरे ज्याप्रमाणे कृष्णाने केले नाही, त्याचप्रमाणे पुढे काय होणार हे कळून सर्वांना वाचविण्याची शक्यता असताही पृथ्वीला भार झाला आहे, म्हणून सर्व योद्ध्यांना अश्वत्थाम्याच्या हातून मारविले, हेही कृष्णाने केले नाही.

अभिमन्यूचा मुलगा परीक्षित–म्हणजे सुभद्रेचा, कृष्णाच्या बहिणीचा नातू पुढे हस्तिनापूरच्या राज्यावर बसला. ह्यातही कृष्णाचे काही कर्तृत्व वा कारस्थान नव्हते. अज्ञातवासाच्या शेवटापर्यंत पांडवांच्या कुठल्याच मुलाचे लग्न झालेले नव्हते. निदान महाभारतात तसा उल्लेख नाही. सत्यभामेस घेऊन कृष्ण वनवास सरता-सरता पांडवांना भेटण्यास आला होता. मुलांची खुशाली व अस्त्रविद्येतील त्यांची प्रगती ह्याबद्दल त्याने द्रौपदीस सांगितले. मुलांची लग्ने झाली असती, तर तसा उल्लेख ह्या वेळी यावयास पाहिजे होता. अर्जुन बृहन्नडारूपाने मुलीला नृत्य शिकवीत होता, हे कळल्यानंतर 'तूच उत्तरेशी लग्न कर, म्हणजे योग्य होईल.' असे विराटाने सांगितले. चार दिवस अंबा हस्तिनापुरात राहिली, तर शाल्व तिच्याशी लग्न करीना, तर वर्षभर अर्जुनाबरोबर नृत्य शिकणाऱ्या उत्तरेला दुसरा नवरा मिळणे जडच गेले असते. 'मी तिच्याकडे पितृभावनेने पाहतो. माझ्या मुलाशी तिचे लग्न होऊ दे,' हे अर्जुनाचे उत्तर मिळाल्यावर द्वारकेहून अभिमन्यूला बोलाविले; अर्जुनाला द्रौपदीच्या पोटी झालेला मुलगा होता, त्याला का नाही बोलाविले?–उत्तर सरळ आहे. द्रौपदीला पाच मुले होती. त्यांपैकी धर्माचा मुलगा वडील होता. द्रौपदीने द्यूताच्या वेळी त्याचा उल्लेख 'युवराज' म्हणून केला होता. द्रौपदीच्या मुलांची लग्ने एक तर एकामागून एक ओळीने झाली असती, किंवा सर्वांची एकदम झाली असती. त्यातल्या मधल्याचे सर्वांआधी होणे

शक्य नव्हते. अभिमन्यू अर्जुनाचा मुलगा, पण पांडवांच्या पट्टराणीचा नसल्यामुळे राज्याचा वारस नव्हता. तो वारसांपैकी दुय्यम होता,– नव्हताच म्हणावयास हरकत नाही.

त्याच्या लग्नाने एक मोठी सोयरीक जडत होती. अर्जुनाचा मुलगा हा मोठेपणा होताच व दुसरा काही बांधा येत नव्हता. द्रौपदीची मुले मारली जातील, असे कोणाच्या स्वप्नीही नव्हते. अभिमन्यूने, घटोत्कचाने व इरावताने लढाईच्या खाईत उड्या घेतल्या, पण द्रौपदीच्या मुलांच्या बाबतीत तसे दिसून येत नाही. ती मुले राज्याची वारस होती. ती सर्व लढाई झाल्यावर जिवंत होती. अश्वत्थाम्याने कपटाने व क्रूरपणाने त्यांची हत्या केली नसती, तर ते युवराज म्हणून वावरले असते; त्यांची लग्ने झाली असती. पण ते मारले गेले. शेवटी अभिमन्यूचा मुलगा पोटात होता, तो मरता-मरता वाचला व राजा झाला. ह्यात कृष्णाचे काही कारस्थान नव्हते, कृष्ण शहाणा होता, दूरदर्शी होता, पण त्रिकालज्ञ व सर्वशक्तिमान नव्हता. त्याने आपल्यापुरती काही उद्दिष्टे ठेविली होती, पण ती पुरी करताना त्याने स्वतःला काही मूल्यांची मर्यादाही घातली होती. आपल्या मुलांना राज्य मिळविण्याची ज्याने खटपट केली नाही, तो आपल्या भावांच्यासाठी काही हीन कारस्थान करील, असे संभवत नाही.

कृष्ण-पांडवांच्या मैत्रीमुळे पांडवांचा सर्व तऱ्हेने लाभ झाला. स्वकुळाच्या दृष्टीने व अगदी स्वतःच्या दृष्टीने कृष्णाचाही लाभ झाला. जरासंध मारला गेला, व सर्वोत्तम क्षत्रियाग्रणी म्हणून क्षत्रियसमवेत पहिला मानाचा अर्घ्य मिळाला; पण कृष्णाची अर्जुनाशी जी मैत्री होती, ती निरपेक्ष होती. कृष्णाला अर्जुनाची गाढ मैत्री मिळाली, पण दुसरा व्यावहारिक लाभ झाला नाही. कृष्णाने

तितक्याच उत्कटतेने अर्जुनाला जीव लावला व आपली सर्व प्रज्ञा व साहस अर्जुनाचे शरीर, यश व आत्मा ह्यांचे धारण व संरक्षण करण्यात घालविला.

भीष्मपर्वात, द्रोणपर्वात व कर्णपर्वात अर्जुनाने निरनिराळ्या तऱ्हेने कृष्णापुढे मोठे कठीण पेच टाकले. जे करायला पाहिजे त्यात माघार घेतली, जे करायला महाकठीण त्यात उताविळीने उडी घेतली, जे क्रमप्राप्त ते त्या वेळी थांबविण्याचा घाट घातला. अर्जुनाच्या कीर्तीला कायमचा काळिमा लागण्याचा संभव होता, अर्जुनाच्या शरिराला अपाय होण्याचा संभव होता, अर्जुनाचे मन खचले होते. ह्या सर्वांतून कृष्णाने त्याला वाचविले. आपल्या स्वतःला कृष्ण जपला नाही, इतका अर्जुनाला जपला. गीतेत म्हटल्याप्रमाणे अगदी अक्षरशः कृष्णाने अर्जुनाचा ‘ योगक्षेम ’ वाहिला.

ह्या सर्व वृत्तान्तात कृष्ण अर्जुनाशी बरोबरीच्या – गाढ मैत्रीच्या – नात्यानेच वागत होता, असे दिसते. गीतेच्या पुढच्या-पुढच्या अध्यायांत म्हटल्याप्रमाणे अर्जुनाला कृष्ण जर “ त्वमादिदेवः पुरुषः प्रमाणम् ” असे वाटते, तर कृष्णाला भीष्मावर चालून जाण्याचे, किंवा ‘ नुसते पाड, मारू नकोस, ’ अशी विनवणी करण्याचे कारणच पडले नसते.

द्रोणपर्वात कृष्णार्जुनाचे नाते जास्ती बरोबरीचे व जिव्हाळ्याचे दाखविले आहे. “ अर्जुन समोर असेपर्यंत मला पांडवांवर मात करणे शक्य नाही. तू त्याला दुसरीकडे अडकव, म्हणजे मी धर्माला बांधून जिवंत तुझ्याकडे आणतो, ” असे द्रोणाने सांगितल्यावरून अर्जुनाला संशप्तकांशी युद्धात अडकविण्याची युक्ती दुर्योधनाने योजिली. पहिल्या दिवशी धर्मास पकडता आले नाही. दुसऱ्या दिवशी द्रोणाने अभेद्य असा चक्रव्यूह रचला, अर्जुन संशप्तकांकडे गुंतला होता. एकट्या

अभिमन्यूला व्यूह फोडणे माहीत होते. तो आत जाऊन शत्रूच्या तावडीत सापडून मारला गेला. अर्जुन संध्याकाळी परत येतो, तो मुलगा गेल्याचे त्याला कळले. “अभिमन्यू पुढे गेला, तेव्हा तुम्ही एवढे मोठे लढवय्ये काय करीत होता?” असे त्याने रागाने विचारले, तेव्हा धर्माने उत्तर दिले, “आम्ही त्याच्या मागोमाग होतो. पण सिंधुराज जयद्रथाने आम्हांला थोपविले. आम्ही शिकस्त केली, पण आम्हांला फळी फोडता आली नाही.” हे उत्तर ऐकल्यावर अर्जुनाने रागाच्या व दुःखाच्या भरात प्रतिज्ञा केली, “उद्या सूर्यास्ताच्या आत जयद्रथाला मारीन.” सर्वच दृष्टीने ही प्रतिज्ञा विलक्षण होती. जयद्रथ व्यूहाच्या तोंडाशी होता; पांडवसैन्य अडविण्याचे त्याचे कामच होते. तो ज्या स्थानावर नेमला होता, त्या स्थानामुळे ही जबाबदारी त्याच्यावर पडली होती. अभिमन्यूशी लढून त्याला मारणारे निराळेच होते; त्यांना बाजूला सारून जयद्रथवधाची प्रतिज्ञा त्याने रागाच्या भरात केली! जयद्रथ ही महाभारत-युद्धातली एक क्षुद्र व्यक्ती होती. धर्मराज त्याला ‘क्षुद्र’च म्हणतो. अर्जुनाच्या प्रतिज्ञेने सगळेच मोठ्या चिंतेत पडले. कृष्णाने आश्चर्याने विचारले, “अरे, अशी काय प्रतिज्ञा करून बसलास? मला विचारले नाहीस, भावांना विचारले नाहीस, आणि रागाच्या भरात बोलून गेलास? आता कसे हे साहस पार पाडणार?” अर्जुनाचे उत्तरही अनपेक्षितच वाटते. अर्जुन आपल्या धुंदीतच होता. तो म्हणतो, “कृष्णा, मला काय हे अवघड का आहे? अरे, मी अमक्याला जिंकले, तमक्याला जिंकले. देव आले, तरी त्यांना जिंकीन. माझे धनुष्य, माझे बाहु व मला माहीत असलेली अस्त्रे ह्यांना कमी लेखू नकोस. बघशील उद्या. अगदी पहाटे रथ तयार ठेव मात्र.”

कृष्णाने उत्तर दिले नाही. तो त्याच्या शिबिरात गेला. तेथे

सुभद्रा रडत बसली होती. थोड्याच वेळाने द्रौपदी व उत्तराही आल्या. कृष्णाने त्यांचे सांत्वन केले, म्हणण्यापेक्षा शक्य तितक्या थोड्या वेळात, थोड्याशा कठोरपणानेच त्यांना वाटेला लावल्या. "सुभद्रे, अशी रडू नकोस. तुझा मुलगा वीरमरणाने मेला. आम्ही सर्वच त्या दिशेने चाललो आहोत. क्षत्रिय युद्धात मरायचे नाहीत तर कुठे मरायचे? त्याला स्वर्गप्राप्ती झाली आहे." हे काय सांत्वन? पुढे तो काय म्हणतो, "आता जा, उद्या तुला आनंदाची बातमी कळेल." आनंदाची बातमी कसली? तर तुझ्या शत्रूचे – जयद्रथाचे – मरण! ही काय आनंदाची बातमी? ह्या अशा प्रसंगांनी सबंध महाभारताची कठोर, कर्तव्यदक्ष भूमिका विशद होते. 'मानवी भावनांना स्थान नव्हतेच का? कारुण्य, व्याकुळता ह्यांना वाव नव्हताच का?' असे वाटून मन घाबरे होते. "द्रौपदीला, सुभद्रेला व उत्तरेला चार गोष्टी सांग," असे म्हणून त्याने दुःखाने वेड्या झालेल्या त्या बायांना निरोप दिला व तो अर्जुनाच्या शिबिरात शिरला. त्याने हातपाय धुऊन, नवे दर्भ पसरून अर्जुनाची तृणशय्या तयार केली. भोवती आयुधे ठेविली. अर्जुनाचे उपचार केले. ह्या कृत्यांनी अर्जुन ताळ्यावर आला. त्यानेही हातपाय धुऊन कृष्णाचा सत्कार केला. कृष्णाने 'स्वस्थ नीज,' असे म्हणून त्याचा निरोप घेतला. त्याच्या शिबिराभोवती रक्षणासाठी उत्तम योद्धे ठेविले, व तो स्वतःच्या शिबिरात जाऊन उद्याची जबाबदारी कशी पार पाडावी, ह्याची चिंता करीत बसला. त्याने दारुकाला बोलाविले व स्वतःचा रथ जोडून उत्तम शस्त्रांनी भरून ठेवावयास सांगितला. "अर्जुन नाही, तर मी जयद्रथाला मारीन. सर्व कौरवांना मारीन. मूलबाळ, नातेवाईक कोणीही मला अर्जुनापेक्षा आवडते नाहीत. अर्जुनापाठीमागे मुहूर्तमात्रसुद्धा मी जगणे शक्य नाही. त्याचे शत्रू ते माझे शत्रू,

त्याचे मित्र ते माझे मित्र. तो माझे शरीरार्ध आहे, हे उद्या सर्वांना समजेल. रथ तयार ठेव; कवच घालून तयार रहा. मी पांचजन्य वाजविला की असशील तसा रथ घेऊन ये." अशी त्याने दारुकाला आज्ञा केली. महाभारतातील कृष्णाने दुसऱ्या कोणाहीबद्दल हा जिव्हाळा, ही तळमळ दाखविलेली नाही. अर्जुनाला रात्री साक्षात श्रीशंकराचे दर्शन झाले वगैरे भाग सोडला, तर पुढचा भाग युद्धातील डावपेच व कृष्णार्जुनांचे विलक्षण युद्धकौशल्य ह्या दृष्टीने अतिशय वाचनीय आहे. 'लढाईत मोठा कोण, सारथी की रथी?' हा प्रश्न पडतो. सारथ्याचे कौशल्य अजबच होते. सारथ्य जाणणाऱ्याला नलोपाख्यानात 'अश्वहृदय' शब्द आहे. तो घोड्यांचे अंतरंग जाणणारा असावा लागे. आपले घोडे काय करू शकतील, हे त्याला कळत असे. त्यांना दाबावे केव्हा, दौडवावे केव्हा, हे त्याला समजत असे. ते दमलेले, भ्यालेले असले, तर त्याला ताबडतोब उमगावे लागे. दुसऱ्या बाजूने तो नुसता 'अश्वहृदय'च नाही, तर 'रथीहृदय'ही असावा लागे. योद्धा आता कोणता डावपेच लढविणार आहे, कोणते बाण वापरणार आहे, कोणते अस्त्र योजणार आहे हेही त्याला कळणे आवश्यक होते. कृष्ण व अर्जुन ही दोन शरिरे व एक आत्मा होते. एकमेकांना न बोलता एकमेकांचे हृदय कळत होते. रथी व सारथी ह्यांचे हे ऐकात्म्य ह्या पर्वात फारच उत्तम दिसते. ह्याशिवाय प्रतियोद्धे — ज्यांना तोंड द्यावयाचे ते — काय करीत आहेत, काय योजीत आहेत, हेही सारथ्याला निमिषमात्रात कळणे अवश्य असे. सारथी स्वतः उत्तम रथी असेल, उत्तम योद्धा व अस्त्रविद् असेल, तरच हे सर्व शक्य होते. आणि कृष्ण हे सर्व होता. शिवाय अर्जुनाला प्रेमाने बांधला गेला होता.

अर्जुनाला लांब गुंतवून धर्माला पकडणे हे साध्य ह्या दिवसापुरते तरी दूर ठेवणे कौरवांना प्राप्त होते. जयद्रथाला सर्वांत पाठीमागे ठेवून

अर्जुनाला तेथपर्यंत पोहोचणे अशक्य करणे एवढाच ह्या दिवसाचा दुर्योधनादींचा प्रयत्न होता. एकेका योद्ध्याच्या हाताखाली एकेक सैन्यविभाग होता. प्रत्येक आपल्या सैन्यानिशी अर्जुनावर तुटून पडत होता. पहिली सलामी खुद्द द्रोणाशीच झाली. द्रोणाच्या सैन्याला पळवून लावल्यावर वाट सापडताच कृष्णाने रथ पुढे काढला. द्रोणाने अर्जुनाला आव्हान केले, 'असा निसटून काय जातोस? ये ना माझ्याशी दोन हात करायला'. 'नमस्कार गुरुजी, आज नाही,' म्हणून अर्जुन पुढे सरकला. दुःशासन आडवा आला, त्याला घायाळ करून रथ पुढे निघाला. भोजाच्या सैन्याची अशीच दाणादाण झाली. पक्ष्यांच्या भरारीने जाणारे घोडे छिद्र सापडेल तेथून वाट काढीत होते. अर्धा दिवस कंदन झाले. घोडे थकले होते. अर्जुन म्हणाला, "मी शत्रूला संभाळतो, तू घोड्यांची चाकरी कर". त्याने रथातून उडी टाकली व तो रथापुढे जमिनीवर उभा राहून युद्ध करू लागला. मागच्या बाजूने कृष्णाने घोडे सोडले, त्यांच्या पाठीवर रुतलेले शर काढले, त्यांना पाणी पाजले, जमिनीवर लोळू दिले, त्यांच्या अंगांवरून हात फिरविला. हे सर्व शांतपणे, न घाबरता चालले होते. घोडे ताजेतवाने झाले. अर्जुनाने आपल्या बाणवर्षावाने सर्वांना थोपवून धरले होते. त्याने रथावर परत उडी घातली व रथ चालू लागला. घोडे, सारथी व रथी सर्वच एकमेकांचे हृदय जाणणारे होते.

इकडे धर्मराजाचा जीव थोडथोडा होत होता. त्याने दारुकाच्या रथातून शैनेय सात्यकीला अर्जुनाकडे पाठविले. भीमही थोड्या वेळाने आला, व अर्जुनाच्या प्रवासाला गती मिळाली. शेवटी तो जयद्रथाजवळ पोहोचला. जयद्रथाचा रथ व पताका त्याने मोडून टाकली, व शेवटी जयद्रथाचे शीर उडविले. दोघां मित्रांनी एकमेकांचे अभिनंदन केले.

एका दिव्यातून अर्जुन पार पडला होता. पण अजून त्याला संभाळायचे होते. त्या दिवशी दोन्ही बाजूंना इतका त्वेष चढला होता की, पलिते लावून रात्री लढाई पुढे चालू झाली. योद्धयांना मध्ये थोडी विश्रांती मिळाली, व सूर्य उगवल्यावर परत युद्धाला तोंड लागले. ह्या रात्रीच्या युद्धात कृष्णाने घटोत्कचाला इरेला घातले. शेवटी त्याच्यापुढे टिकाव लागेना, तेव्हा दुर्योधनाच्या विनंतीवरून कर्णाने अमोघ अशी वासवी शक्ती त्यावर सोडली व घटोत्कच मेला. घटोत्कचाच्या मृत्यूमुळे पांडव दुःखात बुडाले, तर कृष्ण आनंदाने नाचतच सुटला. शेवटी अर्जुनाला कृष्णाला दाबणे भाग पडले. "अरे एवढा वीर पडला, तर तू आनंदाने नाचतोस का?" 'बाबा रे, कर्ण जी शक्ती तुला मारण्यासाठी जपून ठेवीत होता, ती फुकट गेली म्हणून." कृष्णाने उत्तर दिले. इकडे धर्म संतापला होता. "अभिमन्यू मेला, तेव्हा अर्जुन नव्हता. अर्जुन असताना घटोत्कचा-सारखा गुणी मुलगा मारला गेला. किती त्याने आमची सेवा केली होती. त्याच्याबद्दल कोणीच काही म्हणत नाही. मुख्य शत्रूंना मारायचे सोडून त्या क्षुद्र जयद्रथापायी एक दिवस फुकट गेला. आता मीच जातो द्रोणाला व कर्णाला मारायला." असे म्हणून तो निघाला होता. कृष्णाने चार युक्तीच्या गोष्टी सांगून त्याला थोपविले. दोन्ही बाजू रात्रंदिवस लढून दमल्या होत्या. तो दिवस युद्ध झाले. मग रात्रीची झोप झाल्यावर पुढल्या दिवशी द्रोण मारला गेला. अर्जुना-कडून कर्णाला मारवायचे होते. द्रोणाच्या वधामुळे अर्जुन खिन्न झाला होता. पांडवांमध्ये आपापसांतच चांगली मोठी भांडणे लागली होती. सात्यकीचे व धृष्टद्युम्नाचे हमरीतुमरीवरून युद्धच जुंपायचे, पण कृष्ण मध्ये पडला.

कर्णाच्या रथाचे चाक खाली गेले, तेव्हा अर्जुनाने त्याला मारले.

तो अर्जुनाला थांबण्याची विनंती करीत होता. धर्माच्या गोष्टी बोलत होता. पण कृष्णाने त्याला उसंत मिळू दिली नाही. मागची सर्व वर्मे काढून, "कोठे गेला होता धर्म तुझा तेधवा वृषा सांग," [ कर्ण क्व ते धर्मस्तदा गतः ] ह्या पालुपदाने अर्जुनाची सर्व अपमानाची आठवण कृष्णाने धगधगत जिवंत ठेविली. कर्ण मारला गेला.

लढाई संपली; पण कृष्णाचे काम संपले नव्हते. केवळ अर्जुनाला नाही, पण इतरांनाही त्याने परत वाचविले. गांधारीचा राग व शाप स्वतःवर घेतला. कृष्णाचे पाठिराखेपण नसते, तर पांडवांना कौरवांचा निःशेष नाश करणे शक्य नव्हते, हे गांधारीने जाणले होते. माझा एकही मुलगा तू जिवंत ठेविला नाहीस, असा ती कृष्णाला बोल लावते. ज्या भीमाने तिची मुले मारली, त्याला ती दोष देत नाही. "आमच्या कुलाचा जसा सर्वनाश झाला, तसा तुझ्याही कुलाचा होईल; आम्ही जसे आपापसांत भांडून मेलो, तसे तुम्हीही आपापसांत भांडून मराल," असा तिने कृष्णाला शाप दिला. कृष्णाने तो शापही हसत झेलला. "बये! अपराध केलास; मुलाला वेळीच आवर घातला नाहीस, आता कशाला उगीच तळतळाट करतेस?" असे त्याने गांधारीला बजाविले. "आम्ही यादव इतके बलाढ्य आहोत की, आमचा नाश करील, असा बाहेरचा शत्रू नाही. आमचा नाश झाला, तर आमच्याच मूर्खपणाने," असे त्याने सांगितले.

यादवांच्या विनाशाला एक पर्व खर्ची पडले आहे; पण ते अगदी लहान आहे. एवढेच नव्हे, तर पंधरा-वीस श्लोकांच्या एका अध्यायात जे सांगितले आहे, त्याचा दुसऱ्याशी मेळ नाही. एका अध्यायात सांगितले आहे की, ऋषीच्या शापाने सांबाला मुसळ झाले. त्याचे चूर्ण करून समुद्रात फेकून दिले व राज्यात द्वाही फिरवली की, जो कोणी दारू पिईल, त्याला राजा कडक शिक्षा करील. त्याच्याच

पुढच्या अध्यायात सांगितले आहे की, सर्व यादव समुद्रतीरी जत्रेला गेले व रामकृष्णासह सर्वच यथेच्छ दारू प्याले व त्या धुंदीत एकमेकांची उणीदुरी काढू लागले. समुद्रतीरी म्हणजे कुठे? काय द्वारका समुद्रतीरी नव्हती? द्वारकेच्या सर्व बाजूला भरभक्कम तटबंदी होती. म्हणून किनाऱ्याला लागायचे, तर द्वारकेतून बाहेर पडावे लागे, असे दिसते. दारू पिऊ नये, अशी द्वाही राजाने फिरविली असता सर्व जण दारू प्याले कसे? का मद्यपाननिषेधाचे प्रकरण जैन कथेतून महाभारतात घुसले? पहिली कुरापत शैनेय सात्यकीने हार्दिक्य कृतवर्म्याची काढली. "बिचाऱ्या द्रौपदीची निजलेली मुले अश्वत्थाम्याच्या मदतीने तू मारलीस हे कृत्य फारच वाईट." "असे होय! मग भूरिश्रव्याचे हात तुटले असता तू त्याचे शीर कापलेस, हे काय चांगले केलेस?" असे हार्दिक्याने विचारले. त्यातच सात्यकीने स्यमंतकमण्याच्या चोरीचे जुने प्रकरण उकरून काढल्यामुळे सत्यभामा रडायला लागली. सात्यकीचे व कृतवर्म्याचे युद्ध जुंपले. त्यात कृतवर्मा मारला गेला. सात्यकी इतरांनाही मारीत सुटला, तेव्हा भोज व अन्धक एक होऊन त्याच्या भोवती जमले, व जेवणातील उष्टी भांडी त्याच्यावर फेकू लागले. हे पाहून प्रद्युम्न सात्यकीच्या मदतीला धावला, पण ते दोघेही त्यात मारले गेले. एका बाजूने वृष्णि-शैनेय व दुसऱ्या बाजूने अंधक-भोज अशी लढत जुंपली. पाहता-पाहता सांब, प्रद्युम्न, चारुदेष्ण, अनिरुद्ध हे असे मारले गेले. हा संहार पाहून कृष्ण रागावला, व एक मूठ लव्हाळे उपटून मारणाऱ्यांना त्याने ते मारले. तो ते लव्हाळे लोखंडाचे झाले व ज्याच्यावर मारले तो मेला. हे पाहून जो-तो लव्हाळे उपटून एकमेकांना मारू लागला. मोठा संहार झाला. हे पाहून राम व त्याच्या मागोमाग कृष्ण ह्या दंगलीतून बाहेर पडले. कृष्णाने बभ्रूला सांगितले, "मी बाहेरच राहतो; तू बायका-मुलांना नीट

संभाळून आत ने." ते करीत असता बभ्रूच मारला गेला, तेव्हा बलरामाला थांबावयास सांगून कृष्ण सर्वांना घेऊन द्वारकेत गेला व वसुदेवाकडे जाऊन म्हणाला, "तुम्ही सर्वांना संभाळा. अर्जुन येईल व सर्वांची व्यवस्था करील. मी बलरामाला थांबायला सांगितले आहे, तिकडे जातो." तो त्वरेने बाहेर पडला. दारुकाला त्याने अर्जुनाकडे पाठविले. तो रामाकडे जातो, तो रामाचे प्राणोत्क्रमण होत होते. रामाचा अंत पाहून तो झाडाखाली योगस्थ बसला, एवढ्यात एका पारध्याचा बाण लागून तोही मेला.

दारूच्या धुंदीत एकमेकांना मारून सर्व कुल मरणे जरा कठीणच वाटते. बभ्रू बलराम व कृष्ण हे तरी यादवांच्या हातून मेले नाहीत. म्हणजे यादवांच्या धुंदीचा व मारामारीचा फायदा घेणारा शत्रू निर्माण झाला होता, असे दिसते. त्यामुळेच द्वारकेभोवतालचा प्रदेश निर्धास्त नव्हता. तो शत्रू जुन्या क्षत्रियघराण्यातील नसून भारतात नवीनच आलेल्या आभीरांच्या टोळ्या होत्या. त्यांनीच अर्जुनालाही जेरीस आणले[१].

कृष्णाच्या मृत्यूची बातमी ऐकून म्हाताऱ्या वसुदेवाने हाय खाल्ली व अंथरूण धरले. अर्जुन आल्यावर मरणोन्मुख वसुदेव त्याला म्हणाला, "बाबा, ज्या प्रद्युम्न-सात्यकीचे तू गुणगान करीत होतास, ते तुझे दोघे भक्त व शिष्यवर ह्या सगळ्या अनर्थाला कारण आहेत."

१. ह्याच 'आभीर' लोकांनी काठेवाड, गुजरात व उत्तर महाराष्ट्रात ऐतिहासिक काळात राज्य केले, असे दाखले आहेत. ह्यांना 'अहीर' म्हणतात. खानदेशातील अहिराणी बोली ह्या आभीरांच्या वंशजांची असावी. ह्याच लोकांनी पुढे यादवांशी आपला संबंध जोडला. बहुतेक आपण क्षत्रिय आहो, हे दाखविण्याचा तो प्रयत्न असावा. यादवांबरोबर कृष्णालाही त्यांनी आपल्यातला देव बनविला असला पाहिजे. त्यामुळेच महाभारतातील राजकारणी योद्धा 'गोपाल'-कृष्ण झाला असावा. गोपालकृष्णाचा गोपीकृष्ण कोणी व कधी केला, ते मात्र महाभारत-कथेवरून कळत नाही.

वसुदेवाला राजाच्या इतमामाने जाळले, मग रामकृष्णांसह सर्व मृत यादववीरांना जाळले. वसुदेव सर्वांत वडील, म्हणजे तोच यादवांचा राजा होता का? का बलराम राजा व वसुदेवाचा मान? दुर्योधन राजा, पण धृतराष्ट्र जिवंत होता म्हणून त्याला 'महाराज' म्हणत, तसाच प्रकार होता की काय?

बलराम, कृष्ण वृद्ध होऊन गेले. वसुदेव तर कुंतीचा भाऊ व राम-कृष्णांचा बाप म्हणजे खूपच म्हातारा. कृष्णाची मुले अभिमन्यूपेक्षा थोडी वडील असतील, – म्हणजे पन्नाशीच्या आत बाहेर. ह्या संहारात तिसरी पिढी जिवंत राहिली. ती परीक्षितीच्या वयाची, म्हणजे पस्तीस-छत्तीस वर्षांची होती. ते कसे जिवंत राहिले? का अतिवृद्ध वसुदेव व ही नातवंडे ह्यांना ठेवून फक्त मधल्या दोन पिढ्यांची माणसेच यात्रेला गेली होती? ही पासष्ट ते पंचाहत्तर वयाची माणसे व त्यांचे मुलगे दारू पिऊन शुद्ध विसरून एकमेकांशी भांडून मेली, असे समजायचे का? महाभारत व सर्व पुराणे असेच सांगतात. काही दिवसांतच द्वारका पाण्यात बुडाली. धरणीकंपाने का? ह्या सबंध किनाऱ्यावर वारंवार धरणीकंप होत असत, – अजूनही होतात. तसाच प्रकार झाला असावा का? 'एरका' नावाचे गवत लोहाचे झाले, ह्याचा अर्थ काय? एरका नावाच्या सरळ टणक गवताच्या कांड्यांचे बाण करून त्यांना लोखंडाची पाती लावणारे काही लोक होते, व त्यांनी यादव धुंदीत आहेत, असे पाहून त्यांचा नाश केला काय? किती तरी प्रश्न मनात उद्भवतात. द्वारकेच्या उत्खननात असे दिसते की, द्वारका कधीतरी पाण्याखाली बुडाली व परत वसविली गेली. एकदा का अनेकदा? ह्याचे उत्तर देण्याइतका पुरावा अजून सापडलेला नाही.

अंताच्या क्षणापर्यंत कृष्ण शांत राहिला. ह्या अवस्थेत जेवढी

निरवानिरव करणे शक्य होते, तेवढी त्याने केली. तो रडला नाही. सर्व मुले डोळ्यांदेखत मेली होती, तरी रडला नाही. द्वारकेत त्याने पाऊल घातले, ते वसुदेवाला निरोप सांगण्यापुरते. सर्व स्त्रिया आकान्त करीत होत्या. पण हा थांबला नाही. बलराम तर कुठच्याच कृत्यात पुढाकार घेत नसे. तो आधीच निघून गेला होता. कृष्णाने उरलेल्या यादवांचा भार शिरावर का घेतला नाही? व्याधाने मारले नसते, तरी तो प्रायोपवेशनाने मरणाच्याच तयारीत होता, असे का? वृद्ध वसुदेवाला त्याने सर्वांना संभाळण्यास का सांगितले? ह्या भयंकर क्षणीही कृष्णाने विचार केला असेल का? तरुण पोरे दुसऱ्याच्या आश्रयाला गेली, तरी हरकत नव्हती. यदुवंशाची रोपटी जिवंत होती. ती वाढविणे पांडवांना शक्य व जरूरच होते. पण आपण कसे परघरी दैन्यात राहणार? ज्यांना आयुष्यभर मोठ्या शौर्याने, मोठ्या दिमाखाने संभाळले, त्यांच्या घरी सर्वस्व नष्ट झाले अशा परिस्थितीत राहणेच शक्य नव्हते. वैभवशाली वासुदेवाला तर मुळीच नव्हते. मृत्यूखेरीज दुसरी वाटच नव्हती. कृष्णाला मरणाखेरीज मार्गच नव्हता. अंगावर आलेल्या सर्व कर्तव्यांना त्याने जसे तोंड दिले, त्याच कठोरतेने नातवांत, बायकांत मन न गुंतविता त्याने ह्याही वेळी तोंड दिले. अर्जुनावर सर्व भार सोपविला व आपण चालता झाला.

जन्मभर लौकिक अर्थाने अर्जुनाला व पांडवांना कृष्णाच्या अगणित उपकारांची फेड करता आली नाही. त्याच्या मृत्यूनंतर ही फेड व्हावयाची होती. कृष्ण अर्जुनाशिवाय मुहूर्तभरही जगू शकत नव्हता. अर्जुनाचेही तसेच होते, असे समजायला हरकत नाही. शेवटी कृष्णाचा निरोप पोहोचल्यावर अर्जुन द्वारकेला आला, तेव्हा कृष्ण जिवंत नव्हता; पण एरवी एवढ्या-तेवढ्यावरून प्रतिज्ञा करणाऱ्या व आगीत उडी घेऊन जीव देण्यास निघणाऱ्या अर्जुनाला त्या वेळी ही

मोकळीक नव्हती. वसुदेवाचा शोक ऐकून त्याचा प्राण गेल्यावर इतमामाने त्याला अग्नी द्यावयाचा होता. कृष्णाचे शरीर शोधून त्याला अग्नी द्यावयाचा होता. उरला-सुरला परिवार घेऊन हस्तिनापुराला जावयाचे होते, स्वतःची व यादवस्त्रियांची विटंबना पहावयाची होती. राज्याला मुकलेल्या यादवांपैकी कृष्णाच्या नातवाला एक राज्य पांडवांनी दिले, सात्यकीच्या मुलाला एक राज्य दिले; एवढेच नव्हे, तर मार्तिकावताचे राज्य अश्वत्थाम्याला मदत करणाऱ्या कृतवर्मा हार्दिक्याच्या वंशाला दिले. सर्व यादव जिवंत राहते, तर त्यांपैकी कोणालाच कुठल्याच राज्यावर अधिकार नव्हता. नवी राज्ये मिळाली, ती पांडवांमुळे. यादवांची व्यवस्था लाविल्यावर कृष्णाच्या देण्याची अशी विलक्षण निरानंद फेड करून, मग अर्जुन व इतर पांडव मरणास तयार झाले.

कृष्णाने एवढे प्रेम करण्यासारखे अर्जुनात होते तरी काय? अर्जुन त्या वेळच्या वीरात अप्रतिम योद्धा म्हणून गाजलेला होता; सर्व तरुण पिढीचा – उत्तराचा, धृष्टद्युम्नाचा, सात्यकीचा, प्रद्युम्नाचा – आदर्श होता. नावाप्रमाणे तो ऋजू होता. अर्जुनाच्या बाहुबलाने धर्म राजा झाला. कृष्णाने इतरांनाही राज्य मिळवून दिले. दोघेही शत्रूंना व स्त्रियांना जिंकणारे होते. कृष्णाने आयुष्यभर जे व जितके दिले, तितके अर्जुनाने देणे शक्यच नव्हते. पण अर्जुनाच्या प्रेमात त्याला सर्व मिळाले होते, व कृष्णाच्या जिवंतपणी नाही, पण मागाहून सर्व फेड अर्जुनाने केली.

कृष्णाने असामान्य कर्तृत्वाने इतरांना राज्ये मिळवून दिली. भीष्माने तेच केले. भीष्म उपभोगशून्य राहिला. कृष्णाने श्री व संपत्ती याचा उपभोग घेतला. भीष्माने अधिकार भोगला, तर कृष्णाचा भोग अधिकारशून्य होता. एक लौकिक दृष्ट्या सर्वस्वाचा होम करून

काहीतरी उपभोगीत होता, तर दुसरा सर्व भोगून खरोखरीने अलिप्तच राहिला. इतर सर्व कधीतरी रडले. भीष्म स्वतःसाठी रडला नाही. कृष्णही कधी रडला नाही. निष्कामच राहिला. इतका की, कधी-कधी तो कठोरच भासतो.

ह्यामुळेच महाभारतातील कृष्ण हातीच लागत नाही. अंतःकरणाला भिडत नाही. त्याने प्रेम केले, सूड उगवला, तो आनंदाने नाचला, पांडवांनी राज्य घालविले तेव्हा दुःखाने हळहळला; पण हे सर्व करूनही तो गुंतला नाही. महाभारतात राधेचा कृष्ण नाही, कुंजवनात गोपाळांमध्ये वेणू वाजविणारा कृष्ण नाही, द्रौपदीच्या धाव्याला धावणारा कृष्ण नाही, रुक्मिणीवल्लभ कृष्ण नाही. तो स्वतः सांगतो की, आपण अर्जुनावर प्रेम केले, पण वेळोवेळी कृतीने ते प्रेम व्यक्त होऊनही हृदयाचा ठाव घेण्यासारखे त्यात काही नाही. 'सह नौ भुनक्तु, सह वीर्यं करवावहै' अशा तऱ्हेचा तो संबंध होता; पण त्यातही तो कुठे गुंतून पडला नाही. सर्व मानवी कष्ट, मानवी सुखे, मानवी विकार त्याच्या चरित्रात होते, तरीही ह्या विलक्षण अलिप्ततेमुळे त्याला साकार करता येत नाही. त्याने गीता नुसती सांगितली नाही, तो गीता जगला.

फेब्रुवारी, १९६६

द हा

# यु गा न्त

अमक्या एका क्षणाला, दिवसाला वा वर्षाला एक युग संपले व दुसरे जन्मले, असे काही सांगता येत नाही. एक युग संपले, म्हणजे त्या युगात जे-काय म्हणून होते, ते सर्व संपून नव्या युगाबरोबर नवी माणसे, समाजाची नवी घडी येते, असेही नाही. कालप्रवाह अखंड चाललेला आहे. आपल्या सोयीप्रमाणे, अभ्यासाचा दृष्टिकोण असेल त्याप्रमाणे तुकडे पाडायचे व त्यांना दशके, सहस्रके, वा युगे अशी नावे द्यायची. महाभारताबरोबर एक युग संपले, ही कल्पना फार जुनी आहे. तीच मी उचलून धरलेली आहे. दुसऱ्या कोणालाही तितक्याच अधिकाराने ही कल्पना नाकारून दुसऱ्या तऱ्हेने कालाचे विभाग पाडता येतील. युग म्हणजे काय व त्याचा अंत झाला असे आपण का म्हणतो, हा दृष्टिकोण स्पष्ट केला, म्हणजे झाले. काही गोष्टी महाभारताबरोबर नष्ट झाल्या, तर काही महाभारतापासून पुढे कित्येक

शतके – अगदी आजपर्यंत आपल्यांत चालू आहेत, असे दाखविता येईल. एका कालविभागाला ‘ युग ’ म्हटले, ते केवळ काही गोष्टी त्यात होत्या, पुढे नव्हत्या, एवढ्याचसाठी नव्हे. पूर्वी नसलेल्या, पुढे जास्त प्रमाणात आढळणाऱ्या समजुती, रितीभाती ह्यांची सुरवात ( म्हणजे – पुढच्या युगाची चाहूल ) येथे जाणवते, म्हणूनही मी ह्या कालविभागाला ‘ युग ’ म्हणते. एका दृष्टीने एखाद्या युगाचा शेवटचा भाग त्या युगाचा प्रातिनिधिक नसून ती खरोखरीने संध्या – एका युगाची रात्र व दुसऱ्या युगाची पहाट – असते. महाभारत अशाच तऱ्हेचे आहे. पण त्याच्या स्वरूपामुळे त्याला एक असामान्य वैशिष्ट्य प्राप्त झाले आहे. महाभारत म्हणजे त्या कालातले एका विशिष्ट वर्गातील लोक कसे राहत असत, ह्याची जंत्रीवजा माहिती नसून एक विशिष्ट कुटुंब घेऊन त्याच्या अनुषंगाने त्या काळाचे जीवन व विचार ह्यांचे खोल व व्यापक चित्रण ज्यात आहे, अशी एक दीर्घ कथा आहे. सर्व कथा छंदात सांगितलेली आहे, आणि बऱ्याच प्रसंगी त्या छंदाला व त्यामुळे एकंदर कथेला खऱ्याखुऱ्या काव्याचे अविस्मरणीय रूप आले आहे.

जुन्या पुराणकालीन समजुतीप्रमाणे पांडवांच्या राज्याची शेवटची वर्षे ही कलियुगाची सुरवात आहे, द्वापरयुगाचा अंत आहे. पण भारतीय योद्ध्यांना तसे वाटत नव्हते, असे वाटते[१]. युग संपले, ही जाणीव युग संपून बराच काळ लोटल्यावर आलेल्या पिढीची. त्याचप्रमाणे पूर्वीचे क्षत्रिय – खरे (?) क्षत्रिय – महाभारतयुद्धात नष्ट पावले, असा पुराणांचा दावा आहे. हीही समजूत मागाहूनची आलेली दिसते. युद्ध संपल्यावर निरनिराळ्या राजांचे वंश आपापल्या गादीवर बसले. खुद्द हस्तिनापूरला पाण्डवांचा नातू परीक्षित बसला,

१. ते त्यांना दाखवून दिले, हा भाग प्रक्षिप्त, मागाहून घुसडलेला वाटतो.

इन्द्रप्रस्थाला कृष्णाचा पणतू वज्र हा राजा झाला, इतर मुख्य यादवांचे वंशज दुसऱ्या राज्यांवर बसले, विदर्भाचा रुक्मी आपल्या राज्यावर होता, वगैरे वृत्तान्त लक्षात घेतला, म्हणजे क्षत्रियवर्ग नष्ट झाला, हा उत्तरकालीन दावा पटत नाही. पण जुन्या क्षत्रियवर्गाची रचना व घडी विस्कटली, ही गोष्ट मात्र ऐतिहासिक दृष्ट्या पटण्यासारखी आहे.

महाभारतकाली काय होते, नंतर काय आले, महाभारतकालात कोणत्या सामाजिक घटनांचा पाया घट्ट रोवला गेला, वगैरेंचे उहापोह करण्याआधी महाभारतकाल म्हणजे काय, हे स्पष्ट सांगितले पाहिजे.

महाभारताचा काल म्हणजे भारतीय युद्ध झाले, त्याच्या अलीकडचा व पलीकडचा काही शतकांचा काळ धरावा लागेल. निदान तसा तो ह्या विवेचनात धरलेला आहे. महाभारतकालाला 'युगान्त' म्हटले आहे. म्हणजे भारतीय युद्धानंतरचा फार-तर एक-दोन शतकांचाच काळ अभिप्रेत आहे. पुराणकारांच्या मते तर पांडवांच्या मरणाआधीच कलियुगाची सुरवात झाली होती. महाभारताच्या आधी किती शतके जावे, हा एक कठीण प्रश्न आहे. वेदात दाशराज्ञ युद्धाचा शेवट ते भारतीय युद्धाचा शेवट, असा एक काळ धरावा लागेल, व युगान्त म्हणजे ह्या काळाचा शेवट, मानावा लागेल. वेद जरी नाहीत, तरी काही ब्राह्मणे व काही उपनिषदे ह्या काळातली मानावी लागतील. याज्ञवल्क्याचे आपला गुरु व मामा जो वैशंपायन त्याच्याशी झालेले भांडण कधीतरी भारतकथेकाळी झालेले सांगितले आहे. प्रत्यक्ष कथेशी ज्याचा संबंध नाही, असा हा भाग आहे. पण कालदृष्ट्या ते विधान खरे मानले, तर सबंध शुक्ल-यजुर्वेद, त्याची महत्त्वाची ब्राह्मणे (उदा० शतपथ) व ईशावास्यादि उपनिषदे ही भारतीय युद्धानंतरची, बुद्धकाळाला जवळची, असे मानावे लागेल.

भारतीय युद्धाचा काळ ख्रिस्तपूर्व १००० ते १२०० वर्षे, असे मी मानते.

भारतीय युद्धाची कथा ही क्षत्रियकुळातील दोन भावांच्या मुलांच्या भांडणाची कथा आहे. क्षत्रियांखेरीज इतर माणसांच्या कथा व उल्लेख दुय्यम आहेत; पण जे काही आहेत, त्यांवरून समाजरचनेची काही अंगे स्पष्ट दिसतात. वर्ण होते; क्षत्रिय व ब्राह्मण वर्ण मुख्य होते; एकमेकांचे प्रतिस्पर्धी, एकमेकांचे पूरक व आधारस्तंभ म्हणून ते राहत होते. क्षत्रियांचा यज्ञयागांवर व ब्राह्मणांच्या मंत्रविद्येवर विश्वास असल्यामुळे व संस्कार त्यांच्या हातून होत असल्यामुळे त्यांना ब्राह्मणांची गरज होती व ब्राह्मणांना क्षत्रियांकडून संरक्षणाची, पुरस्काराची व पोषणाची अपेक्षा होती. हे दोघे ठामपणे एका समाजाचे घटक होते. त्या समाजाच्या दैवतकल्पना एकच होत्या. 'विश्'-वर्गाचे नाव काही वेळेला येते, पण त्या वर्गातील व्यक्तीचे चित्रण नाही. शूद्र-वर्गाबद्दलही असेच म्हणता येईल. शूद्र कोण होते? राजकुले दासदासींनी भरलेली होती. सर्व दास व सर्व दासी शूद्र होत्या, असे म्हणावयाचे का? सुभद्रा गोपालिका-वेष घेऊन 'मी तुमची दासी,' म्हणून द्रौपदीला भेटायला आली. म्हणजे तिने विनयाने शूद्रत्व धारण केले, असा अर्थ होतो का?

भगवद्गीता आज ज्या स्वरूपात आहे, त्या स्वरूपात ती पूर्वी (युद्धकाली?) नव्हती, म्हणून पुढच्या-पुढच्या अध्यायात – जेथे कृष्णाचे देवपण उघड गृहीत धरले आहे तेथे – जे आले आहे, त्याचा दाखला देणे बरोबर होणार नाही. पण पुढच्या कालातला म्हणून धरला, तरी गीतेतील पुढील श्लोक विचार करण्यासारखा आहे. कारण तो पांडवांच्या वेळच्या समाजस्थितीचा निदर्शक आहे; स्मृतीतील समाजस्थितीचा नव्हे. कृषि, गोरक्ष, वाणिज्य अशी कर्मे वैश्यांची व

परिचर्यात्मक कर्म शूद्राचे (गीता : १८·४४) म्हणून सांगितले आहे. अशाच अर्थाचे दोन श्लोक पुढे कर्णपर्वात शल्याच्या तोंडी आहेत. (८·२३·३५-३६.) कृषीवल म्हणजे शेतकरी, गोरक्ष म्हणजे गवळी व वाणिज्य म्हणजे सर्व प्रकारचा व्यापार करणारे, – वस्तू तयार करून विकणारे लोक. शेतकरी राजाला कर देत होता. गवळी किंवा गोवारी गोधन बाळगीत. राजधानी स्थापावयाची म्हणजे निरनिराळ्या दुकानदारांना आणून त्यांना जागा देऊन, करांत सवलती देऊन नव्या राजधानीत त्यांना वसवायची प्रथा होतीसे दिसते. ते वसले, म्हणजे अर्थात करही देत असत. हे लोक परिचर्या म्हणजे एखाद्याची चाकरी करीत, असे दिसत नाही. क्षत्रियांचे गोधन संभाळणाऱ्यांत खूपसे चाकर व गोपाध्यक्ष म्हणजे राजपुरुष असत, असे दिसते. ह्या वेळचे सामाजिक चित्र राजन्य, ब्राह्मण व सर्वसाधारण प्रजा म्हणजे ‘विश्’ व दास असे होते. ह्या काळानंतर वणिज धनवान व बलशाली झाले व त्यांनीच फक्त वैश्य वर्ण (तिसरा वर्ण) व्यापिला; शेतकरी व गोपाल चौथ्या वर्णीत गेले. ह्याचा अर्थ असाही करता येईल की, वैश्य-वर्गात असलेल्या धनवान लोकांच्या मालकीची जी जमीन होती, ती ते स्वतः (जुन्या ‘विश्’-प्रमाणे) न करता गरीब शेतकऱ्यांना किंवा भूमिहीन मजुरांना कसावयास देत. भूमिहीन कामकरी स्थायिक नसून ते ह्या गावाहून त्या गावाला जाणारे लोक होते. ह्याशिवाय ह्या कामकरी वर्गात स्वतःचे असे दास होतेच. म्हणजे पुढील काळात वैश्य व शूद्र या वर्णांची व्यवस्था बदलली. वैश्य वा ‘विश्’ म्हणजे ‘सर्वसाधारण प्रजा’ न राहता ‘वैश्य’ नावाचा विशिष्ट कार्य करणारा वर्ण बनला; आणि मग सर्व तऱ्हेचे कारागीर, शेतकरी, गोपाल, परिचर्या करणारे व दास मिळून शूद्र वर्ण बनला काय? त्याचप्रमाणे सैन्यातही दोन प्रकार दिसतात. एक क्षत्रियवर्ग व

त्यांच्या जवळचे क्षत्रियांचेच आप्त व दुसरे पगारी (?) सैनिक. कृष्णाजवळ 'नारायणीय' नावाचे असे सैनिक होते. 'संशप्तक' हे अशाच तऱ्हेचे युद्धजीवी लोक होतेसे दिसते. ह्या लोकांचा दर्जा काय होता ? तेही शूद्रच होते का ? बाकीच्यांना (क्षत्रिय, ब्राह्मण, वैश्य-कृषक इत्यादींना) लढाईत वाटल्यास जाता येई, वाटल्यास अलिप्त राहता येई. पण हे लोक सैन्यात भरती झालेले, व सैनिक म्हणून पोसलेले होते. त्यांना धनी सांगेल, त्याप्रमाणे लढाई करणे प्राप्त होते. म्हणजे ते 'क्रीतदास' होते. कृष्ण पांडवांच्या बाजूचा होता, पण 'नारायणीय' नावाचे योद्धे दुर्योधनाच्या बाजूने लढत होतेसे दिसते. वर्णसंस्थेत ह्या लोकांना स्थान काय होते, ते कळत नाही. भारतीय युद्धात भाग घेणारा समाज प्रामुख्याने त्रैवर्णिक होता. म्हणजे राजा, धार्मिक विधी करणारे ब्राह्मण व वैश्य ही मुख्य प्रजा, अशी समाजरचना होती; व ज्यांना कोणतेही हक्क नाहीत, ज्यांचे संस्कार वरील तिघांचे नव्हेत, व जे फक्त नोकर, ते शूद्र होते. कृषि व गोरक्षण वैश्यांकडे असल्यामुळे शूद्रांची संख्याही पुढील काळापेक्षा फारच कमी असली पाहिजे. हा समाज प्रामुख्याने त्रैवर्णिक असला, तरी चौथा वर्ण प्रस्थापित झालेला होता व त्याला नावही होते. म्हणून चातुर्वर्ण्यात्मक समाजव्यस्थेची सुरवात व्हावयास लागली होती. कृषि, गोरक्ष, वाणिज्य हे करणारा वैश्यवर्ग जाऊन त्याऐवजी व्यापार करणारा धनाढ्य व बलशाली वर्ग स्थापन झाला व कृषिगोरक्ष करणारे हे परिचर्या करणाऱ्या शूद्र पायरीला पोहोचले, हे दृश्य महाभारताच्या काळानंतर उदयाला पावलेल्या बौद्धयुगामध्ये स्पष्ट दिसते. बौद्ध व नंतरच्या जैन वाङ्मयात वैश्यवर्गाला फार प्राधान्य आहे. गोष्टींचा नायक हा वीरपुरुष व क्षत्रिय असावा, हा भारतकालीन प्रघात जाऊन तो श्रेष्ठी वा श्रेष्ठी-

पुत्र होऊ लागला. म्हणूनच बुद्धकथांमध्ये किसा गोतमी व विशाखा अशा वैश्य स्त्रियांची वर्णने आलेली आहेत. श्रीमंत वैश्य गृहस्थाश्रमात असण्याची आवश्यकता सांघिक प्रव्रज्याप्रधान धर्माला असते, असे म्हणता येईल का? प्रव्रज्याप्रधान धर्म पहिल्यापासूनच व्यक्तिपूजेवर आधारलेले असतात. ते सांघिक असतात व म्हणून की काय, धर्मसंस्थेची बांधणीही घट्ट आखीव होते. धर्माचा मुख्य, उपमुख्य, संघमुख्य, संघाचे व व्यक्तीचे जीवन सर्वच बांधले जाते. बौद्ध, ख्रिस्ती, व महंमदीय धर्म असेच होते. घरच्या वाणिज्यावर भागेनासे झाले, तेव्हा ह्या धर्मांचे लोक साम्राज्य-संस्थापक बनले व धर्मांची तत्त्वे जगभर पसरली. बौद्ध धर्म घरच्या-घरी साम्राज्यवादी होता व त्याच्या हजारो भिक्षूंच्या पोषणासाठी त्या वेळी श्रीमंत वणिक्-वर्गही होता. भारतीय युद्धाचे युग त्या मानाने आकुंचित संबंधित गटांनी व्यापिलेले असे दिसते. धर्माला सार्वजनिक स्वरूप नव्हते. जो बांधीवपणा होता, तो समाजाच्या एकसंधपणामुळे; धर्माच्या स्वरूपामुळे नव्हे. धर्म हा शब्द फारच व्यापक व खऱ्या अर्थाने व्यक्तिगतच राहिला.

पुढचा प्रश्न : जाती होत्या का? वर्ण होते, पण जाती नव्हत्या, असे म्हणण्याकडे बऱ्याच जणांचा कल आहे. जातींची नावे फारशी वाचण्यात येत नाहीत. पण ज्यांना जाती म्हणता येईल, असे समूह होते, ह्यात शंकाच नाही. 'सूत' हा असा एक समूह होता. सूतांचे स्थान 'विश्' व शूद्र ह्यांच्या वरचे होते की काय, अशी शंका शल्याच्या पुढील वाक्यावरून येते. कर्णाचा सारथी होण्याची विनंती दुर्योधनाने केली, तेव्हा रागावून शल्य म्हणाला, "शूद्र ब्रह्मक्षत्रविश ह्यांचे परिचारक ठरलेले आहेत. सूत ब्रह्मक्षत्रांचे परिचारक आहेत, विश व शूद्र ह्यांचे नाहीत. मूर्धाभिषेक झालेला मी कर्णाची चाकरी करावी, असे कसे होईल?"

**ब्रह्मक्षत्रविशां शूद्रा विहिताः परिचारकाः।** ८·२३–३५.

**ब्रह्मक्षत्रस्य विहिताः सूता वै परिचारकाः।**

**न विट्शूद्रस्य**......................॥ ८·२३·३८.

ज्यांची लग्ने आपसांतच बहुतांशी होतात, अशा माणसांचा मिळून झालेला समाज म्हणजे जात. जातीचा एक गुण असा असतो की, तीतील एखादा मनुष्य अमक्या वर्णाचा अशी सार्वत्रिक कबुली मिळाली, म्हणजे इतर जातभाई त्या वर्णाचे होऊ शकतात. कर्णाची धडपड वैयक्तिक होती. तो सर्व सूतांना क्षत्रियत्वाचे दार मोकळे करू इच्छीत नव्हता. स्वतः जन्माने क्षत्रिय आहोत, हे सिद्ध करण्याची त्याची धडपड होती. मेल्यावर क्षत्रियांच्या विधींने अग्निसंस्कार झाल्यामुळे क्षत्रियत्व त्याला एकट्याला मिळाले; त्याच्या मुलाला मिळाले नाही. कारण तो सूतस्त्रीपासून जन्माला आला होता, ही एकच गोष्ट जात ह्या सामाजिक समूहाचे अस्तित्व दाखविण्यास पुरेशी आहे. भारतातील जातिसंस्थेचा एक विशेष असा आहे की, वरच्या जातींतील लोकांना खालच्या जातींतील स्त्रियांशी प्रसंगी लग्नही करता येत असे, पण त्यामुळे त्या स्त्रियांच्या माहेरच्या मंडळीची जात बदलत नसे. उदा० सुदेष्णा व काली-सत्यवती. जाती व वर्णसंस्था ह्यांचा एक विशेष महाभारत-कथेतही दिसतो. खालच्या जाती बहुधा वरच्या वर्णांत जाऊ इच्छितात, फक्त एका जातीतून दुसरीत जायचा प्रयत्न नसे. सर्व जाती वा वंश ह्यांचे स्थान नक्की झालेले दिसत नाही. नागकुलांना – विशेषतः त्यांतील राजघराण्यांना – बराच मान असे, पण त्यांना कोठच्या वर्णात स्थान होते, ते कळत नाही. बरीच राजघराणी क्षत्रिय नसूनही पुढच्या कालात स्वतःला 'क्षत्रिय' म्हणवून घेऊ लागली; पण बौद्धकालातही अशा प्रयत्नांना यश मिळत नसे व राजा असूनही क्षत्रिय नसलेल्या

बलशाली राजालासुद्धा क्षत्रियकन्या मिळत नसे, हे पसेनदी कोसल व वासभखत्तिया ह्यांच्या गोष्टीवरून दिसून येते. पुढील काळात दिसून येणारी वर्ण व जाति यांची व्यवस्था व खालच्या जातींची वरच्या वर्णांत जाण्याची धडपड व बऱ्याचदा यशस्वी झालेले प्रयत्न हे भारतीय समाजाचे आजपर्यंत दिसणारे अंग भारतीय युद्धाच्या काळात दृढमूल होऊ लागले होते. भारतीय युद्धाच्या वेळी क्षत्रिय म्हणवणारी घराणी बऱ्याच पूर्वीपासून अस्तित्वात होती. भारतीय कथेवरून पाहता क्षत्रिय घराणी आपल्या क्षत्रित्वाला फार जपत होती, व त्याचबरोबर एकमेकांच्या परंपरागत आलेल्या राज्यांना व क्षत्रियसमाजाच्या अशा विशिष्ट बांधणीला जपत असत. क्षत्रिय – ल्हानशा का होईना, पण – एकेका प्रदेशाला चिकटून होते. ह्याच्या उलट ब्राह्मण इतरांच्या आश्रयावर अवलंबून असल्यामुळे ह्या राज्यातून त्या राज्यात जात असत. नाना प्रदेशांशी, राजसभांशी त्यांचा संबंध येईच, पण नाग व अरण्यातून राहणाऱ्या इतर लोकांशीही त्यांचा संबंध येई व शरीरसंबंधही घडे. त्यापासून निर्माण झालेली ही प्रजा बऱ्याचदा ब्राह्मण गणली जाई. क्षत्रियांतही संकर होत होता, पण तो ब्राह्मणांइतका नव्हता, असे कथेवरून दिसते.

राजा असूनही क्षत्रिय नाही, असे कर्णाचे उदाहरण. लगेच पुढील काळातील पसेनदीचे उदाहरण. ह्यांवरून असे अनुमान काढता येईल की, निरनिराळ्या व्यक्तींना किंवा समूहांना आपल्या जातीतून क्षत्रियवर्णात जाणे जरी यशस्वीपणे करता आले, तरी प्रत्येक वर्णात (१) जुनी प्रतिष्ठित घराणी, (२) जुनी प्रतिष्ठित पण मांडलिक व मातबर नसलेली घराणी व (३) नव्याने आत शिरू पाहणारी वा शिरलेली मातबर बलशाली घराणी असत. घराण्यांचा समूह आपापले वैशिष्ट्य टिकवी. फक्त नव्या आलेल्या घराण्यांना जुन्यांशी शरीरसंबंध जोडून

आपण मूळपासून क्षत्रिय आहोत, वा ब्राह्मण आहोत, असा दावा करायचा असे. वर्णांतर्गत उच्च-नीच, नवे-जुने असे गट असत. व्यक्ती किंवा जाती वरच्या वर्णात जायची धडपड करीत, त्या वेळी त्या वर्णातील जुन्या सर्वांनी प्रमाणित मानलेल्या कुटुंबात लग्नसंबंध करण्याचे त्यांचे प्रयत्न असत, असे दिसते. जाती व वर्ण ह्यांच्यामधील अशा तऱ्हेचे संबंध भारताच्या सगळ्या इतिहासात दिसतात. सर्व जगभर सर्व समाजात सर्वकाळ चाललेल्या एका सामाजिक प्रक्रियेचेच हे भारतीय उदाहरण समजता येईल. एका वर्णात पुष्कळ जाति का असतात, त्याचे हे एक कारण देता येईल. वर्णसंकराबद्दल ओरडा जसा सनातन, तशीच वर्णसंकर ही क्रियाही सनातनच.

वर्ण व जाति असलेल्या समाजाचे महाभारतातील चित्र फार उठावदार नाही. वर्ण दृढ होते, जाती अस्तित्वात होत्या, वैश्यांची कृत्ये पुढच्या काळातील शूद्रांची होती, इतक्याच गोष्टी सांगता येतात. ह्याउलट महाभारतातील कौटुंबिक चित्र फारच उठावदार, बारकाव्यांनी भरलेले व आजतागायत रूढ असलेल्या पितृप्रधान कुटुंबाचे प्रातिनिधिक आहे. हे चित्र इतके तपशीलवार आहे की, त्यामुळे त्यात पुढे पडलेले लहान-मोठे फेरफारही लवकर समजू शकतात. आजतागायत बहुतेक हिंदुस्थानभर रूढ असलेले पितृप्रधान सामायिक कुटुंब महाभारतात वर्णिलेले आहे. हस्तिनापूरच्या कुरूंचे, पांचालातील द्रुपदांचे व द्वारकेतील यादवांचे असेच कुटुंब होते. एका वेळी कुटुंबात चार-चार पिढ्यांचे लोक असत. ह्या कुटुंबातील पुरुष त्यात जन्मलेले असत. (दत्तक गेलेल्यांचा, घेतलेल्यांचा अपवाद.) कुटुंबात जन्मलेल्या मुली परघरी जात व परघरच्या मुली सासवा, बायका व सुना म्हणून कुटुंबात येत. कुटुंबात जन्मलेल्या मुली कन्या व पुत्री असत. त्यांचे निराळे असे अंतःपुर होतेसे दिसते. परघरच्या

मुलींना ‘वधू’ हे सामान्य नाव. त्यांचे अंतःपुर निराळे असे. ह्या काळचा विशेष असा की, नातेवाचक शब्द फारच कमी होते. ‘पिता’, ‘तात’ ह्या शब्दांनी बाप, बापाचे भाऊ ह्यांचा बोध होई. बापाची बायको व बापाच्या भावाची बायको ही ‘माता’ किंवा ‘अम्बा’ होती. स्वतःच्या बापाची व बापाच्या भावाची मुले भाऊ किंवा बहिणी होत्या. व स्वतःची व स्वतःच्या भावाची मुले पुत्र व कन्या असत. महाभारत ही भावां-भावांच्या मुलांच्या भांडणाची ही गोष्ट आहे. पण बाप व चुलता, सक्खा भाऊ, चुलतभाऊ, मुलगे व पुतण्ये असे निरनिराळे शब्द नाहीत. ही गोष्ट परत-परत लक्षात येते. वारणावताला जाताना धर्म धृतराष्ट्राचा व गांधारीचा ‘तात’ व ‘अम्ब’ म्हणून निरोप घेतो. ही माणसे आपला घात करणार आहेत, हे माहीत असूनही त्यांना नमस्कार करून दीनपणे उभा राहतो. त्या वेळची ‘तात’ व ‘अम्ब’ ही संबोधने आजच्या वाचकाला तरी जास्तच करुण वाटतात. ‘पुत्र’ म्हणून पांडवांना त्यांनी दिलेला आशीर्वाद जास्तच दांभिक वाटतो. पांडवांना वनात पाठविले, तेव्हा विदुर त्यांच्या वतीने धृतराष्ट्राशी भांडला, तेव्हाही धृतराष्ट्राने विदुराला म्हटले, “अरे! एवढा कळवळा आला असला, तर जा त्यांच्यामागून. माझ्यामागे भुणभूण लावू नकोस.

**कथं हि पुत्रं पाण्डवार्थे त्यजेयम्।** ३.५.१७.

(‘पांडवांसाठी मी मुलाचा त्याग करणे कसे शक्य आहे?’)

**असंशयं तेऽपि ममैव पुत्रा दुर्योधनस्तु मम देहात् प्रसूतः।**
**स्वं वै देहं परहेतोस्त्यजेति को नु ब्रूयात् समतामन्ववेक्षन्॥**
३.६.१७.

तो पुढे म्हणतो, “तेही निःसंशय माझेच मुलगे आहेत; पण दुर्योधन माझ्या शरिरापासूनचा आहे. दुसऱ्यासाठी स्वतःचा देह सोड, असे

समानता शोधू जाणारा कोणता शहाणा म्हणेल ?" म्हाताऱ्याच्या सर्व मुलांना मारून धर्म परत त्यांना 'तात' व 'अम्ब' म्हणत राहिलाच. हे शब्द म्हणताना कित्येक वेळी त्याची जीभ अडखळली असेल, असे काही प्रसंगी तरी वाटतेच. आजही कुटुंब पितृप्रधान व सामायिक आहे, पण सख्खे व चुलत हा भेद सर्व उत्तर-भारतीय भाषेत स्पष्ट केलेला आहे.

महाभारतकाळी 'पतिव्रता' ह्या शब्दाचा अर्थ काही दृष्टींनी पुढच्या काळापेक्षा निराळा होता. त्या वेळी औरस संतती नसली, तर नियोगाने पुत्रोत्पत्ती हा मार्ग दत्तक घेण्यापेक्षा जास्त चांगला समजत. नंतरच्या काळात नियोग मागे पडला, व दत्तक घेण्याचा प्रघात सर्रास सुरू झाला. ह्यामुळे स्त्रीला जास्त मान मिळाला, असे मात्र होत नाही. पूर्वी स्त्री ही 'क्षेत्र' होती. तिला नवरा सांगेल, त्याच्यापासून पुत्रोत्पत्ती करून घ्यावी लागे. पुढच्या काळी ही सक्ती नाहीशी झाली, पण त्याचबरोबर स्त्रीच्या हातून कुवारपणी वा लग्न झाल्यावर काही चूक झाली, तर तिला क्षमा करावयाची, ही वृत्तीही पार नाहीशी झाली. स्त्रीवर बलात्कार झाला, तर पूर्वीचे क्षत्रिय तिला टाकून देत नसत. त्यानंतरचा हिंदू समाज मात्र पावित्र्याच्या, –फक्त स्त्रियांच्याच पावित्र्याच्या,– बाबतीत इतका हट्टी व संकुचित बनला की, तो आपल्या स्त्रियांना रक्षूही शकला नाही, वा परत आपल्यात घेऊही शकला नाही. आजतागायत ही भयंकर वृत्ती कायमच आहे. हे फाळणीच्या प्रसंगी प्रत्ययास आलेच !

ज्यात आपला जन्म झाला, ते कुटुंब व ज्यांच्याशी सोयरीक झाली, ती इतर कुटुंबे अशा दोन विश्वांत आयुष्य सामावलेले होते. बापाचे कुटुंब ते मुख्य. पण त्यातच भांडणे निघाली, म्हणजे भांडणांत सोयरे मदत करीत. स्वकुटुंबातील वडीलधाऱ्या माणसांची भांडण

टाळण्याकडे प्रवृत्ती. अन्याय झाला तरी चालेल, पण उघड भांडण नको. जो वाटा मागेल, त्याला बऱ्या बोलाने वाटा मिळाला नाही, तरी चालेल. त्याने गप्प बसावे, पण वाट्यासाठी तटून बसू नये, असाच सूर. पण सोयरे मात्र आपल्या जावयासाठी, मेहुण्यासाठी धडपडत. पांडवांचे सर्व मदतनीस सोयरेच होते. यादव आईच्या माहेरचे, द्रुपद बायकोच्या माहेरचे, व विराट सुनेच्या माहेरचे. आपल्या बहिणीच्या अंधळ्या नवऱ्यासाठी व भाच्यांसाठी जीव टाकणारा गांधारराज शकुनी कौरवांकडे होता, तोही सोयराच!

हे पितृप्रधान कुटुंब त्या वेळच्या समाजाचा आधारस्तंभ होते. सामाजिक मूल्ये समाजधारणेसाठी असतात. अशा कुटुंबांचा परिपोष व्हावा, अशाच तऱ्हेची मूल्ये त्या समाजाचीही होती. पुरुषांचे मुख्य गुण पितृभक्ती व सौभ्रात्र हे होते. पितृप्रधान कुटुंब सुस्थिर रहावयास, भांडणे टाळण्यास ह्या गुणांची आवश्यकता होती. ह्या कुटुंबांत कायम रहावयाला येणाऱ्या स्त्रिया परघरच्या असत. त्यांच्यामध्ये पितृभक्ती किंवा सौभ्रात्र ह्या दोन्ही गुणांची अपेक्षा नव्हती. पतिभक्ती व सासरचा अभिमान ह्या गुणांची अपेक्षा होती. त्यांची पितृभक्ती लग्न झाले नाही तोवरची, पितृकुलाचे मोठेपण साधण्यासाठी, पण एकदा का लग्न झाले, म्हणजे माहेर तोडून सर्वस्व पतीसाठी वेचणे, व त्याच्या कुळाच्या मोठेपणासाठी जपणे ही तिची कर्तव्ये होती. आई म्हणून मुलांना संभाळणे, पत्नी म्हणून पती नेईल तिकडे जाणे व सून म्हणून सासू-सासऱ्यांची सेवा करणे ही तिची मुख्य कर्तव्ये होती. सामाजिक मूल्ये ही त्या-त्या काळी त्या-त्या समाजाच्या गरजेवर बहुतांशी आधारलेली असतात. देशकालनिरपेक्ष मूल्ये असू शकतात का, असा एक प्रश्न ह्या लेखाच्या अनुषंगाने (कृष्ण वासुदेवाबद्दल) निघाला होता. सर्वस्वी देशकालनिरपेक्ष

मूल्ये असूच शकत नाहीत, अशी आपल्या तत्त्वज्ञानाची भूमिका आहे. ती तर्ककर्कश असली, तरी रास्त वाटते. ह्याबद्दल पुढे उल्लेख येईल. सध्या एवढेच सांगता येईल की, एका विशिष्ट वर्गाची, विशिष्ट कुटुंबपद्धतीला पोषक अशी मूल्ये जशी असतात, तशीच सर्वसाधारणपणे मानवजातीला लागू पडतील, अशीही मूल्ये असतात; पण तीही एका काळाची मूल्ये दुसऱ्या काळाला तोकडी वाटू लागतात. द्रौपदीवस्त्रहरणाच्या वेळी अशाच तऱ्हेच्या व्यापक मूल्यांचा प्रश्न होता. यक्षप्रश्नप्रकरणात ह्या व्यापकतेचा पडताळा येतो. सर्व मनुष्यांना लागू म्हणून एक धर्म होताच. पण तो खांडवदाहप्रसंगी कृष्णार्जुन विसरले, असे आज आपण म्हणतो. त्यांना त्या वेळी तसे वाटले नाही. "**दया करी जे पुत्रासी तेचि दासा आणि दासी**" असे परमवैष्णव, परमकारुणिक तुकारामबुवा म्हणतात. पण आजचा मनुष्य म्हणेल, 'दास आणि दासी ह्या शब्दांनी व्यक्त झालेले दास्य समाजात असावे, हाच अन्याय नाही का?' हा न संपणारा वाद आहे. अजूनपर्यंत तरी सर्व व्यक्तींना ज्या समाजात, न्याय व समता मिळाली, असा समाज उत्पन्न झाला नाही, हे कोणाही विचारी व्यक्तीला पटेल. असा समाज स्थापणे शक्य आहे का, ह्या प्रश्नाचे उत्तर येथे देण्याची गरज नाही.

ह्या संदर्भात महाभारतातील काही घटनांचा विचार करणे रास्त होईल. धृतराष्ट्र आणि पांडू हे विचित्रवीर्याच्या विधवा राण्यांचे मुलगे नियोगाने झालेले, असे म्हटले आहे. स्मृतीमध्ये 'नियोग' म्हणजे थोरल्या भावाच्या विधवेच्या ठायी धाकट्या भावाने पुत्रोत्पत्ती करणे असा आहे. व्यास सत्यवतीचा थोरला मुलगा, म्हणजे विचित्र-वीर्याचा थोरला सावत्रभाऊ होतो. म्हणजे स्मृतीप्रमाणे संतती निर्माण करण्याचा हा प्रयोग 'नियोग' ह्या क्रियेत बसत नाही. त्याला दीर

म्हणून नव्हे, पण एक ब्राह्मण म्हणून 'नियुक्त' केला, म्हणून 'नियोग' असे म्हणावे, तर

"कौसल्ये देवरस्तेऽस्ति सोऽद्य त्वानुप्रवेक्ष्यति।
अप्रमत्ता प्रतीक्षैनं निशीथे आगमिष्यति ॥"

हे सासूचे बोलणे केवळ सुनेची फसवणूक करण्यासाठी होते का? उद्योगपर्वात कर्णकुंती-संवादाच्या वेळी कुंतीला कुवारपणी मूल होण्याच्या प्रकारालाही 'नियोग' हा शब्द योजिला आहे. ह्या अर्थाने 'नियोग' हा शब्द दुसरीकडे येत नाही. ह्याची उत्तरे दोन संभवतात: (१) जरा अपप्रकार होत होता, त्याला एक रूढ शब्द वापरून झाले ते योग्यच, तो आपद्धर्मच होता, असे दर्शवायचे होते, किंवा (२) 'नियोग' ह्या शब्दाला निश्चित असा अर्थ प्राप्त झाला नव्हता. स्त्रीच्या ठायी अमक्यानेच संतती निर्माण करावी, असा दंडकही रूढ झाला नव्हता. ह्यांपैकी कोठचा पर्याय स्वीकारायचा, हे सध्याच्या आवृत्तीवरून कळणे शक्य नाही. सध्याची आवृत्ती ज्या हस्तलिखितांची तपासणी करून सिद्ध केली आहे, त्यातले जुन्यांत जुने इ. स. ९०० किंवा १०००-च्या पाठीमागचे नाही. आता सिद्ध झालेल्या आवृत्तीची आतून मजकुराची तपासणी होऊन जेव्हा नवी आवृत्ती सिद्ध होईल, तेव्हा असल्या प्रश्नांचा निकाल लागेल, एरवी नाही.

दुसरी घटना म्हणजे शल्य आपल्या भाच्यांच्या बाजूला न लढता कौरवांना मिळाला ही. ह्या बाबतीत पहिली अडचण आहे, ती शब्दांच्या अर्थाबद्दल. महाभारतात भाऊ, बहीण, बाप, आई वगैरे नातेवाचक शब्द सबंध एका तऱ्हेच्या नातेवाइकांना लावले आहेत, असे वरती दाखविलेच आहे. म्हणजे भाऊ सक्खा, की सावत्र, की चुलत, हे संदर्भाशिवाय काहीच कळत नाही. शल्य हा माद्रीचा सक्खा भाऊ होता की खूप लांबचा चुलततला होता, ते समजत नाही. बहिणीच्या

दुर्दैवी मरणाबद्दल शल्याचा पांडवांवर राग होता म्हणावे, तर तसेही काही दिसत नाही. तशा तऱ्हेचा एकही उल्लेख महाभारतात नाही, व दुसरे म्हणजे जी घटना आपल्याला दुर्दैवी व विशेष म्हणजे संताप आणणारी वाटते, तशी ती शल्याला त्या वेळी वाटली असेल, असे संभवत नाही. मद्रांनी आपली मुलगी खूपसे धन घेऊन एका अभिषिक्त राजाला धाकटी राणी म्हणून जाणून-बुजून सवतीवर दिली होती. तिला मुलेही झाली होती. ती नवऱ्यामागून सती गेली, ही तिने आपणहून केलेली – इतर कित्येक क्षत्रियस्त्रिया करीत त्याप्रमाणे केलेली – गोष्ट होती. माद्रीमागून माद्रीच्या मुलांना सावत्र आईने व भावांनी विलक्षण आपलेपणाने वागविले होते. तेव्हा झाल्या गोष्टीवरून राग करण्यासारखे काहीच नव्हते. ह्या बाबतीत आणखी लक्षात ठेवण्यासारखी गोष्ट म्हणजे मद्र-बाल्हीकांचे हस्तिनापूरच्या घराण्याशी असलेले पिढीजाद संबंध. प्रतीपाची एक राणी मद्रांची राजकन्या होती. तिचा मुलगा मामाघरी दत्तक गेला होता. तो शंतनूचा सावत्रभाऊ. त्याचा नातू वा पणतू सौमदत्ति कौरवांच्या दरबारात असे, व कौरवांच्या बाजूने लढला. हा सौमदत्ति शल्याचा काका असावा. जिकडे वडील माणसे तिकडे आपण, अशी शल्याची वृत्ती असावी. म्हणजे शल्य पांडवांवर रागावला, किंवा भाच्यांना बेइमान झाला, असे म्हणता येणार नाही. ही लढाईच अशी विचित्र होती की, न्याय कोणता, अन्याय कोणता, ह्यापेक्षा जवळचे कोण, लांबचे कोण, ह्यावरच कोण कुठून लढले, हे ठरवावे लागेल. वास्तविक हीच लढाई नाही, जगातील सर्वच लहान-मोठ्या लढाया अशाच असतात. सर्व न्याय एका बाजूस, सर्व अन्याय दुसऱ्या बाजूस, असे नसतेच.

महाभारतात तिसरा एक प्रसंग असा आहे की, मूल्यांचा प्रश्न परत एकदा तीव्रतेने पुढे येतो. पितृभक्ती हा सर्वांत मोठा गुण

व पितृकुल सावरायचे, संभाळायचे, हे मोठे कर्तव्य, अशी त्या वेळच्या समाजाची मूल्ये होती. पण मूल्यांची मर्यादा काही दृष्टींनी फारच व्यापक, म्हणजे कुटुंबापलीकडे वा एखाद्या विशेष समाजापलीकडे असते, तर दुसऱ्या दृष्टीने ती सर्वस्वी व्यक्तिगत असते. भीष्माच्या चरित्रात न्याय, अन्याय वगैरेंना फारसे महत्त्व नाही. कुलरक्षण ही त्याला जबाबदारी वाटत होती. पांडवांची बाजू न्यायाची, का कौरवांची बाजू न्यायाची, ह्या वादात तो विदुराइतका खोल शिरला नाही. थोरल्या घराचे त्याने रक्षण केले, तिथे तो वाढला, लढताना उघड-उघड तरी तो त्या बाजूने लढला, लढायला उभे राहण्याचे नाटक केले. बापासाठी सर्वस्वाचा त्याग करण्यात पितृभक्ती दाखविली. विचित्रवीर्याच्या मरणानंतर त्याला राज्यावर बसण्याची गळ घालण्यात आली, भावांच्या विधवांच्या ठिकाणी संतती निर्माण करावी, म्हणून त्याला विनंती केली, पण त्याने दाद दिली नाही. कुळधारणेसाठी त्याने गौण मार्ग पत्करला, पण स्वतःची प्रतिज्ञा मोडली नाही. कुटुंब व कुल रक्षण करण्याच्या कर्तव्यापेक्षा – लोकदृष्टीने ते एक कर्तव्यच होते, – त्याला स्वतःच्या वचनाचे बंधन अधिक वाटले. अंतिम मूल्य तात्कालिक वा चिरकालिक, उपयोगी आहे वा नाही, हा विचार त्याने केला नाही. ते मूल्य हा त्याच्या स्वत्वाचा भाग झाला होता, व ते त्याने टिकविले. मूल्याची एक अंतिम मर्यादा भीष्माने दाखविली.

समाजव्यवस्थेचाच एक भाग म्हणून त्या वेळच्या राजकीय स्थितीचे वर्णन देता येईल. 'कृष्ण वासुदेव' ह्या लेखात त्याचा उल्लेख आलाच आहे. राज्ये लहान-लहान, व रानांनी वेढलेली अशी होती. प्रत्येक राज्यावर वंशपरंपरा आलेल्या घराण्यातील पुरुष बसलेला होता. बरीच राज्ये जिंकून, त्यांचा प्रदेश काबीज करून साम्राज्य

स्थापण्याची प्रथा नव्हती. जरासंध सम्राट होता. त्याने उत्तरेकडची व पश्चिमेकडची राज्ये काबीज केल्याचा प्रत्यक्ष पुरावा नाही. कर्ण अंगाचा राजा होता. त्यावरून जरासंधाने मगधाशेजारचीही राज्ये जिंकली नाहीत, असे स्पष्ट होते. पण तो सारखा लढाईत गुंतलेला होता. त्याने बऱ्याच राजांना कैद केले होते, असे दिसते. तो अतिशय बलाढ्य व भारी होता. यादव, मत्स्य वगैरे लोकांना त्याच्या भीतीने आपला मुलख सोडावा लागला, त्यावरून त्यांचा प्रदेश त्याने जिंकला असला पाहिजे, असे अनुमान निघते. त्याला मारल्याशिवाय धर्माला राजसूय करणे शक्य नव्हते. राजसूय यज्ञ म्हणजे सम्राटपदाचे[१] द्योतकच होते. पण ते मिळविताना धर्माने कोणाचे राज्य घेतले नव्हते. बरोबरीच्या राजांत शौर्याने, औदार्याने व गुणांनी जो पहिला, तो राजसूय यज्ञ करी. काही राजे जिंकून, काही वश करून, कांही मित्रत्वानें व काही सोयरे-संबंधी म्हणून सर्वांकडून मान्यता मिळाल्यावर राजसूय होई. हे मोठेपण मिळवायसाठी शौर्य लागे, तसेच दातृत्वही लागे. राजे-रजवाड्यांना पाहुणचारासाठी बोलावून त्यांचा योग्य सत्कार करावा लागे. हजारो ब्राह्मणांना व इतरांना दक्षिणा द्यावी लागे. अशा तऱ्हेने पहिलेपणाचा मान मिळवायची धडपड इतरही मानवसमाजात दिसते, व त्यासाठी राजसूयासारखे सामाजिक संकेतही रूढ झालेले दिसतात! 'अकिञ्चनत्वं मखजं व्यनक्ति' ही नुसती कविकल्पनाच नाही. अशा तऱ्हेचे अकिंचनत्व हा एक मोठा सामाजिक दर्जा होता. ही कल्पना सर्व मानवसमाजांत रूढ आहे. श्रीहर्ष दर सहा वर्षांनी सर्वस्वाचे दान करी, असे वर्णन आहे.[२] एका कुळात राजसूययज्ञ एका पिढीस एकदाच होई,

१. 'सम्राट' ह्या शब्दाचा मूळचा अर्थ 'चांगला राजा' असा आहे.
२. अमेरिकन इंडियन लोकांत "पोटलॅच" म्हणून अशाच तऱ्हेचे एक कार्य असते.

म्हणून दुर्योधनाला तो करता आला नाही. असेच अश्वमेधाचे होते. यादवांमध्ये वसुदेवाने अश्वमेध केला. कुरुकुलात धर्माने केला. ' बरोबरीच्यात पहिला ' हे सूत्र ह्या संबंधाचे द्योतक आहे. महाभारतीय युगानंतर उत्तर-भारतात मोठमोठी साम्राज्ये स्थापिली गेली. बुद्धाच्या वेळी ' पसेनदी कोसल ' नावाचा सम्राट होता. नंतर मगधातच एकामागून एक प्रथम मौर्यांचे, नंतर गुप्तांचे अशी साम्राज्ये झाली. ह्या सम्राटपदात या सम्राटाचे इतरांवर बिनतोड वर्चस्व होते. बरोबरीच्यात पहिला हा नियम गंगेच्या खोऱ्यात नष्ट झाला. पण तो इतर पुष्कळ मानवसमाजांत दिसून येतो. उत्तरेकडील पशुपालक टोळीवाल्यांमध्ये हा नियम अगदी मध्ययुगापर्यंत होता. जर्मनीमध्ये बिस्मार्कपर्यंत अस्तित्वात असलेली लहान-लहान राज्ये ह्या धर्तीवरचीच होती. जरी भारतात साम्राज्यांमागून साम्राज्ये होत राहिली, तरी कित्येक लहान-लहान जातिसमूहांतून वर दिलेला नियम व त्याबरोबर आढळणारी मूल्ये व विचारसरणी दिसून येते. रजपुतांच्या निरनिराळ्या घराण्यांचे परस्पर नाते काहीसे असेच होते. मराठ्यांच्या घराण्यांचेही असेच होते. शिवाजीला औरंगजेबासारख्या परकीयांशी लढणे जितके जड होते, त्याहीपेक्षा बरोबरीच्या स्वकीय मराठा-कुळाकडून राजा – सर्वांचा मुख्य – म्हणवून घेणे जड गेले. जुनी घडण व जुनी मूल्ये सर्वस्वी टाकाऊ कधीच होत नाहीत. मानवांना जशा तऱ्हेचे अनुभव एकदा आले, तशाच तऱ्हेचे अनुभव जेव्हा परत-परत येतात, तेव्हा ह्या जुन्या मूल्यांची वा घडणींची आठवण ठेवणे उपयुक्त ठरते. जगाच्या सध्याच्या परिस्थितीत मोठी साम्राज्ये लयास गेलेली असल्यामुळे बरोबरीच्या अनेक घटकांनी एकत्र नांदावयास कसे शिकावे, हाच प्राचीन भारतीयांचा पेच आपल्यापुढे आलेला दिसत आहे.

महाभारतातील दैवतकल्पना जास्त प्रमाणात वेद-ब्राह्मणकालीन आहे; पुराणकालीन नाही. महाभारतात मूर्ती व देवळे ह्यांचे उल्लेख नाहीत[१]. शिवस्तोत्र व विष्णुसहस्रनाम वा सूर्याची नांवे ही मागाहून घुसडलेली व प्रक्षिप्त वाटतात. ती भांडारकर-आवृत्तीत असली, तरी मागाहूनचीच आहेत, ह्यात शंका नाही. सूर्यपूजा (प्रातःकाली वा सायंकाळी) ही वर दिलेल्या तीन दैवतांच्या पूजांपैकी जुनी असण्याचा संभव आहे. त्र्यंबक वा शिव नंतरचा, व शांतिपर्वात आलेले विष्णुसहस्रनाम सर्वांत शेवटचे असावे. महाभारतातील धर्म यज्ञप्रधान दिसतो. राजाचा पुरोहित अग्नी प्रज्वलित ठेवून रोजच्या आहुती देत असे. यज्ञामध्ये पशूंची आहुती होतीच. अश्वमेघात नक्कीच, इतरांतही बहुतकरून असावी. तरीही पुढच्या काळात यज्ञक्रिया ज्या महत्त्वाला पोहोचली, तितक्या महत्त्वाला ती गेली नसावी. इंद्र, सूर्य, रुद्र, ह्या देवता मानिल्या होत्या, व त्यांना हविर्भाग पोहोचविणारा अग्नी होता. स्वर्गाची वा इंद्रलोकाची कल्पना होती. नरकाची कल्पना इतकी स्पष्टपणे आलेली नाही, पण ती असावी. पितृश्राद्ध होते. पुनर्जन्मावर व कर्मावरही विश्वास होता. त्याचबरोबर आत्मानात्मविचार,

१. 'देवायतन' हा शब्द चार वेळा आलेला आहे. आदिपर्व ६४·४०, अनुशासन १०·१८, आश्वमेधिक ६९·१५ व भीष्मपर्व १०८·११. त्याचप्रमाणे भीष्मपर्व अध्याय १०८ यामध्ये निरनिराळे अशुभ शकुन कसे झाले, त्यांचे वर्णन आहे. त्यात देवायतनातील देवता कंप पावल्या, हसल्या, रडल्या, नाचल्या, असे वर्णन आहे. ही सर्व वर्णने पुढील काळात येणाऱ्या साचेबंद वर्णनासारखी आहेत, म्हणून ती मागाहून घातल्यासारखी वाटतात. भीष्मपर्वातला श्लोक तर फारच पुढच्या काळातील वाटतो. त्यातील 'कुलदैवत' किंवा एखाद्या माणसाचे खास असे 'दैवत' ह्या कल्पना उत्तरकालीन संस्कृत वाङ्मयात वारंवार येतात. महाभारतात एकदाच आलेली ही कल्पना इतर गोष्टींशी संबंध नसलेली अशी आहे :

देवतायतनस्थाश्च कौरवेन्द्रस्य देवताः।
कम्पन्ते च हसन्ते च नृत्यन्ति च रुदन्ति च।

व धर्म काय, अधर्म काय, हाही विचार वारंवार येतो.

धर्माचा पदोपदी एवढा उहापोह होऊनही धर्माच्या व्याख्या कृती, रूप व अंतरंग स्पष्ट झालेलेच नाही. महाभारतात आढळणारा तात्त्विक उहापोहातील हा कणखरपणा पुढे राहिला नाही. भक्ति-मार्गाने सगळेच विचार बोथट झाले. काही दृष्टींनी मात्र धर्माचे साधारण स्वरूप तसेच राहिले. त्या धर्मातून निघणारे संप्रदाय बौद्ध जैन, शैव, वैष्णव हे वगळले, तर हिंदूंचा धर्म अनामिक, लवचीक व व्यक्तिगतच राहिला. त्याला नाव दिले, ते परकीयांनी. तोपर्यंत त्याला नावही नव्हते. आजही प्रत्येक विचारी हिंदूला धर्माचे पूर्ण स्वरूप सांगणे शक्य नाही. 'मला काय वाटते, ते सांगतो,' असेच तो म्हणेल. आपली ही अगतिकता अनुभविली, म्हणजे ठामपणे हिंदुधर्माचे स्वरूप करणाऱ्या पाश्चात्यांच्या प्रज्ञेचे व धाष्टर्याचे कौतुक वाटते.

प्रत्येक प्रसंगी धर्म काय, अधर्म काय, ह्याची संवादात्मक चर्चा महाभारतात जितकी झाली आहे, तितकी दुसऱ्या कोठच्याही पुस्तकात झालेली नाही. इतर पुस्तकांतून – उदा० बायबल व कुराण – धर्म काय, ते ठाम सांगितले आहे. त्यावर संशय उत्पन्न होऊ दिलेला नाही. पण तशा तऱ्हेचे विवरण महाभारतात येत नाही. महाभारताची गोष्ट मनाचा ठाव घेते, ती ह्यामुळेच. मानवजीवित क्षणभंगुर आहे, असार आहे, त्याला काही अर्थ नाही, व्यक्ती एकटी आली, ती एकटी जाणार, अशा तऱ्हेची विचारसरणी व तीवर आधारलेले वैफल्यमय विदारक वाङ्मय फ्रान्स, इंग्लंड व अमेरिका येथे गेल्या २५–३० वर्षांत विशेष झाले आहे. मनात येते की, पश्चिमी साम्राज्याच्या अस्तानंतरचे हे वैराग्य आहे. अंतकाळच्या ह्या वेदना आहेत. जयाच्या क्षणाला **'जयोऽयमजयाकारो भगवन् प्रतिभाति मे'** म्हणून

दुःखाने रडणारा धर्म किंवा आपण सगळ्यांना मारू शकू, ही खात्री असताही '**एतान् न हन्तुमिच्छामि घ्नतोऽपि मधुसूदन। अपि त्रैलोक्यराज्यस्य हेतोः किं नु महीकृते॥**' असे म्हणणारा अर्जुन ह्यांची धर्माची वा मानवी यशाच्या वैफल्याची जाणीव अधिक तीव्र व अधिक आतली वाटते.

**न हि प्रपश्यामि ममापनुद्याद्यच्छोकमुच्छोषणमिन्द्रियाणाम्।**
**अवाप्य भूमावसपत्नमृद्धं राज्यं सुराणामपि चाधिपत्यम्॥**

ही माणसे मरणार व आपण शोकाने झुरत राहणार, हे अर्जुनाला स्पष्ट, ठाम दिसत होते. अशा वेळी ह्यांना मारूच नये. जे मिळणार, त्याची किंमत जबर आहे, असे वाटणे हे स्वजनाबद्दल प्रेम व दया दाखविते. श्रीकृष्णाचे उत्तर एका अर्थाने उत्तरच नव्हते. हे अन्यायी आहेत ह्यांना मारले पाहिजे, अशा तऱ्हेच्या न्यायावर आधारलेला एक भाग आहे; पण अर्जुनाचे उद्गार न्याय की अन्याय, ह्यावर आधारलेले नाहीत. मुख्य रोख आहे, तो न्यायान्यायावर नसून प्राप्त परिस्थिती, व समाजातील स्थान ह्यांवर आहे. त्याचबरोबर मनुष्याचे जीवित क्षणभंगुर आहे, परत-परत येणारे आहे, ह्यावरही रोख आहे. एकदा मनुष्याच्या विश्वातील स्थानाबद्दल विचार करावयास लागले, म्हणजे सर्वच क्षुद्र वाटू लागते. पण कृष्णाचे म्हणणे तसे नव्हते. ब्रह्मसत्यापर्यंत पोहोचले, म्हणजे इतर सर्वच मिथ्या. पण तिथपर्यंत पोहोचण्याआधी हे मिथ्यात्व गृहीत करून प्राप्त कर्तव्यापासून स्वतःला वाचविता येणे शक्य नाही, अशी त्याची भूमिका होती. एका दृष्टीने सर्वच मानवी मूल्ये सापेक्ष – दिक्कालसापेक्ष – म्हणून पूर्ण सत्य नव्हत. दुसऱ्या दृष्टीने अपरिपूर्ण अशा मानवयोनीत तीच दिशा दाखवितात, व आयुष्यात अर्थ भरतात, असे कृष्णाचे सांगणे होते. अलिप्त रहावयाचे, पण नवीन वाङ्मयात आढळणारा 'Stranger' (उपरा) किंवा

केवळ ‘ Witness ’ ( साक्षी ) म्हणून नव्हे. तसे राहणे शक्यच नाही. ‘अर्जुना, किती नाही म्हटलेस, तरी तुला युद्ध केल्याशिवाय रहावयाचे नाही. [प्रकृतिस्त्वां नियोक्ष्यति ।] मग अशा बलात्काराने, अनिच्छेने करण्यापेक्षा डोळे उघडे ठेवून, परिणाम लक्षात घेऊन युद्ध कर, आत्मविस्मृति होऊ न देता कर, असे ते सांगणे आहे.

भारतीय युद्धाच्या काळात भक्तिमार्ग प्रसृत झाला नव्हता. अर्जुन हा कृष्णाचा ‘भक्त’ म्हणजे प्रियसखा होता. कृष्णाने कितीही जीव तोडून सांगितले, तरी ज्या दोघांना मारवायचे नाही, असे अर्जुन म्हणाला, त्यांना त्याने मारले नाही. **‘कथं भीष्ममहं संख्ये द्रोणं च मधुसूदन इषुभिः प्रतियोत्स्यामि’** असे तो म्हणाला. भीष्माला – शिखंडीच्या शरांनी जर्जर झालेल्या – भीष्माला मोठ्या नाइलाजाने त्याने खाली पाडले. भीष्म भूमीवर पडला, – पडलेलाच राहिला. लढाईला वाट मोकळी झाली. द्रोणाला अर्जुनाने मारलेच नाही. पण त्या दोघांचे व इतरांचेही मरण त्याने पाहिले. आपला दुसरा प्राणच अशा कृष्णाचेही मरण पाहिले. जगातील सुखाचा व दुःखाचा, मानाचा व मानहानीचा पेला तो पुरेपूर भरलेल्या मापाने प्याला, व आपल्या पायांनी चालत जाता येईल तितके जाऊन पडेल तेथे मरायचे, असे मरण त्याने पत्करले. अर्जुनच नव्हे, तर इतरही सर्व – कुंती, द्रौपदी, धृतराष्ट्र, गांधारी – असेच जगले व असेच मेले. धडपड करायची ती त्यांनी केली, प्रसंगी त्याग केला, पण काहीतरी लोकोत्तर मिळणार, ह्या हावेने नाही. हा जो आयुष्याचा मार्ग, त्याला साजेसाच कठोर धारदार असा महाभारताचा कथावृत्तान्तही आहे.

ह्यापुढच्या काळातल्या मूल्यांच्या कल्पना, देवादिकांच्या कल्पना व वाङ्मय ह्यांचे सबंध वळणच निराळे आहे. एका दृष्टीने भावविश्व रुंदावले. सबंध मानवजातीबद्दल कणव उत्पन्न झाली. एका दृष्टीने

विचारात शिथिलता आली. इतरांबद्दल करुणा वाटते, तिचा उगम स्वतःबद्दल वाटणाऱ्या करुणेमध्ये आहे. हायडेगरने ह्या भावनेचे पृथक्करण फार उत्तम तऱ्हेने केले आहे. असणे हा भाव (म्हणजेच जीव) हा नाशवंत असतो. जन्ममरण बरोबर घेऊनच तो येतो.

**जेथ उदो होये अस्तवावेया चि लागि**
**मृत्यु उदयाचां परिवरीं। गर्भ गिंवसी**

ज्ञानदेवी : ९·४९७, ४९८.

जे असते, त्याला न असण्याची भीती कायम असते. आपल्या मनातली ही भीती दुसऱ्याबद्दलची कल्पून जीव (being) हा सर्व जगाच्या काळजीत गुंतून पडतो. म्हणजे विश्वाची चिंता, काळजी, भीती ही सर्व स्वतःविषयी वाटणाऱ्या काळजीचा इतरांवर केलेला अध्यारोप आहे. आजार, वार्धक्य व मृत्यू ही पाहून बुद्धाला उपरती झाली. 'जितके जगात गुंतून पडावे, तितकी भयस्थाने जास्त, म्हणून जगात गुंतून पडू नका,' हा बुद्धाचा उपदेश. अगदी ह्याउलट महाभारताची व ब्राह्मणांची शिकवण. '**जातस्य हि ध्रुवो मृत्युः**' हा सगळ्यांच्याच तत्त्वज्ञानाचा पाया. '**ध्रुवं जन्म मृतस्य च**' हा बुद्धाचा व कृष्णाचाही सिद्धान्त; हायडेगरचा नाही. पण एक जन्म असो वा अनेक असोत, सर्व मृत्यूतच नाश पावतात. म्हणून फलाशा न धरता उघड्या डोळ्यांनी कर्म कर. कर्मसंन्यास कठीण, जवळजवळ अशक्य, ही कृष्णाची शिकवण. शक्य तर संन्यास घ्या, व गृहस्थाश्रमीच्या भिक्षेवर जगा, ही बुद्धाची शिकवण. आणि 'जे आहे, ते हे. पुढे काही नाही. मागे काही नव्हते. ह्या परिस्थितीत फक्त येथचाच विचार करा. उगीच मूल्यांच्या नादी लागूच नका,' ही हायडेगरच्या सिद्धान्तावर आधारलेली सध्याच्या लेखकांची तिसरी भूमिका. पहिली भूमिका कणखर, दुसरी पलायनवादीच नव्हे, तर

विरोधाने भरलेली. मोठ्या संख्येने संन्यास घेणाऱ्या भिक्षूंना संपन्न, दानशूर, गृहस्थाश्रमी कुटुंबांच्या भिक्षेवरच जगावे लागते. म्हणून संन्यासधर्म टिकावयास गृहस्थाश्रमी आवश्यक, असा हा अंतर्गत विरोध अशा धर्मातून दिसून येतो. तिसरी भूमिका सर्वस्वी अगतिक आणि निराशावादी. दुसऱ्या व तिसऱ्या भूमिकेत असामान्य करुणा भरून राहिलेली आहे. पुष्कळदा existentialist लिखाण अती कठोर व विदारकही असते, पण त्याचा उगम 'मानवी जीवन विफल आहे,' ह्या ठाम समजुतीत आहे.

जे महाभारतकाली नव्हते, जे बुद्धकाली होते व हल्लीही आहे, ते म्हणजे विभूतिपूजन व संघपूजन. '**बुद्धं सरणं गच्छामि**' '**संघं सरणं गच्छामि**' हेच सूत्र हल्लीही फार प्रमाणात दिसून येते. 'विभूती' ह्या ऐतिहासिक वा धार्मिक विभूती असतात, व 'संघ' म्हणजे ह्या विभूतींनी स्थापिलेले ख्रिस्ती, कम्युनिस्ट वगैरे संघ असतात. विभूतिपूजेपोटीच भक्तिमार्गाचा जन्म झाला. विभूती वा दैवत विफलतेपासून आपली सुटका करील, अशी एक आशा उत्पन्न झाली. तिच्या पोटी काही अति-एकतर्फी संहारास उद्युक्त करणारे, त्याचप्रमाणे अतिरम्य हृद्य लिखाणाबरोबरच स्वप्नाळू अवास्तव लिखाणही उत्पन्न झाले. दैवतकल्पना, भक्तिभाव, एकेश्वरी पंथ, कठीण वास्तव विसरण्याचा प्रयत्न हे सर्व मागाहून आलेले, – महाभारतात नाही असे. त्या दृष्टीने महाभारत युगान्तच. एकतर्फी संहारास उद्युक्त करणारे लिखाण भारतात झाले नाही. कारण भारत अनेकदैवतवादाला चिकटून राहिला. पण भारतातील लिखाण स्वप्नाळू झाले. महाभारतातील सर्वव्यापी निराशेची वा वैफल्याची भावना, कठोरपणा व वास्तवता पुन्हा भारतीय लिखाणात आलीच नाहीत. मनोभूमिकेतील व वाङ्मयातील फरक काही उदाहरणांवरून स्पष्ट होईल.

भरताने आपल्या 'नाट्यशास्त्रा'त स्पष्टच सांगितले आहे की, नाटक शोकान्त होता कामा नये. हा नियम पुढील नाटककारांनी इतक्या इमानाने पाळला की, मूळ शोकात्म कथासुद्धा 'उत्तररामचरिता'-सारख्या नाटकात सुखान्त होऊ लागल्या. नायक, नायिका व त्यांची मुले ह्यांचे एका सुंदर कौटुंबिक मेळाव्यात शेवटी मीलन होऊ लागले. 'विक्रमोर्वशीय', 'अभिज्ञान-शाकुन्तल' ह्यांचाही शेवट तोच. अशाच तऱ्हेचे चित्र पाश्चात्य देशात आज एक प्रकारच्या लिखाणात दिसते. कौटुंबिक जीवनाची नित्य क्रूर मोडतोड होत असते. रकानेच्या रकाने भरून सर्व वर्तमानपत्रांतून तिची वर्णने येत असतात; पण राजकारणी पुरुषांची चित्रे येतात, ती मात्र बायकां-मुलांबरोबर काढलेल्या कुटुंब-मेळाव्याची, असा आजच्या पाश्चात्त्य देशात दिसणारा विरोध ह्या नाटकांत दिसतो. पुष्कळ बायका असलेला वयस्क राजा राणीच्या परिवारातील वा इतर कुठे दिसतील त्या सुंदर पोरींच्या मागे लागलेला असतो, त्यांच्याशी त्याचा विरह होतो, व शेवटी पुनर्मीलन होते ते प्रौढ बनलेल्या प्रियेचे व तिच्यापासून झालेल्या चांगल्या वाढलेल्या मुलाचे! सर्वच खोटे. प्रेम खोटे, विरह खोटा, कौटुंबिक जिव्हाळाही खोटा. आणि वाईट वाटते ते ह्यासाठी की, ह्या देखाव्याचे वर्णन करणारे खरोखरीचे कवि होते. त्यांचे काव्य हृदयाला भिडते; मात्र कोणाबद्दल व कशाच्या अनुषंगाने ते लिहिले आहे, ते विसरले पाहिजे.

महाभारतातील 'शकुन्तलोपाख्यान' व कालिदासाचे 'अभिज्ञान-शाकुन्तल' ह्यांचा अभ्यास करावा, म्हणजे वरील वचनाची प्रचीती येते. महाभारतातील राजा व शकुन्तला दोघेही स्वार्थी व धूर्त होते. दोघे परस्परांची पारध करीत होते. शकुन्तलेला आश्रमात मुलगा झाला. तो द्वाडपणा करून सर्वांना त्रास देऊ लागला, तेव्हा कण्वाने तिची पाठवणी केली, व राजाने तिला ओळखूनही कानांवर हात

ठेविले. मग आकाशवाणी होऊन शकुन्तलेचा व मुलाचा स्वीकार झाला. मुलगा होता, तो राजाला हवा होता, म्हणून शकुन्तलेच्या आयुष्याची विटंबना झाली नाही. ह्या गोष्टीत स्वभावदर्शन आहे. राजाची व विशेषतः शकुन्तलेची राजदरबारातील भाषणे फारच छान वठलेली आहेत. त्यांत राग आहे, उपरोध आहे, अगतिकता आहे. गोष्ट साधी आहे. त्या वेळच्या मूल्यांत व चालीरितींत बसणारी आहे. ह्या साध्या व काहीशा व्यापारी गोष्टीचे रूपान्तर कालिदासाने एका रम्य स्वप्नसृष्टींत केले आहे. शाकुन्तलाचा चौथा अंक एकदा वाचला की, कधी त्याचा विसरच पडत नाही. पण मूळ कथेची धार मात्र अजिबात बोथटते. नुसती शकुन्तलाच निरागस दाखवून भागत नाही, तर अंगठीचे प्रकरण व दुर्वासऋषीचा शाप आणून राजालाही निरागस बनविण्याचा प्रयत्न तितकासा साधत नाही. शेवटचे कौटुंबिक मीलन तर इतके साचेबंद की, ते कालिदासाच्या काही सुंदर कविता किंवा उपमा नसत्या, तर वाचवलेच नसते. सगळेच पराकाष्ठेला नेऊन पोहोचवायचे. पराक्रम, निरागसता, विरह, शृंगार व शोक ही ठराविक साच्यात अत्युक्तिपूर्ण दाखवायची! द्रौपदी अर्जुनासाठी झुरत होती, तर महाभारतात चार-दोन श्लोक येतात. कुंतीचा सवतीमत्सर व स्वतःबद्दची कीव दाखविली आहेत, ती आगीने धगधगणाऱ्या एका श्लोकात. कर्णाचे वैफल्य व निराशा एका वाक्यात. एक वाङ्मय रम्य, हृद्य व नादमधुर पण आभासमय, तर दुसरे कठीण, खडबडीत, अत्यन्त थोडक्यात व वर्षानुवर्षे विचार करावयास लावणारे!

अशाच तऱ्हेचा अतिरेक पुराणकालीन कथांतूनही आढळतो. महाभारतात नाही, पण ऐतरेय-ब्राह्मणात हरिश्चंद्राची कथा आली आहे, ती पुढील काळातील पौराणिक कथेशी ताडून पाहण्यासारखी आहे.

हरिश्चंद्र राजाने मुलगा व्हावा म्हणून वरुणाची प्रार्थना केली, आणि असे वचन दिले की, 'मुलगा झाला, तर तो वरुणाला अर्पण करीन.' वरुणाच्या कृपेने राजाला मुलगा झाला. त्याचे नांव रोहित. मुलगा जन्मल्यापासून वरुण हा राजाकडे येऊन मुलाची मागणी करू लागला, आणि राजाने 'मुलगा अजून लहान आहे, अजून त्याला दात आले नाहीत,' अशा निरनिराळ्या सबबी सांगून वरुणाला परत घालवून दिले. मुलगा चांगला मोठा झाल्यावर 'आता तुला बळी द्यावयाचे,' असे त्याला सांगितले. त्याबरोबर 'छे' असे म्हणून रोहित धनुष्य घेऊन घराबाहेर पडला व रानात भटकत राहिला. इंद्राने सहा वर्षे त्याला रानातच भटकत ठेविले. शेवटी वचनभंगाचा राग येऊन वरुणाने राजाला शिक्षा केली. ती शिक्षा म्हणजे जलोदराचा रोग. जलोदराचा रोग होणे म्हणजे वरुणाच्या अवकृपेचे लक्षण समजले जाई.

रोहिताने रानात अजीगर्त नावाच्या गरीब ब्राह्मणाचा शुनःशेप नावाचा मुलगा शंभर गाई देऊन विकत घेतला. तो रानातून घरी आला व शुनःशेपाला राजाच्या स्वाधीन करून म्हणाला, "माझ्या-ऐवजी ह्याला वरुणाला द्या." राजाने वरुणाला प्रार्थना केली की, "माझा मुलगा काही तुला देता येत नाही. त्याऐवजी दुसरा ब्राह्मण मुलगा बळी देईन. तो तू गोड करून घे. मला वचनातून आणि रोगातून मुक्त कर." वरुणाने म्हटले, "क्षत्रियापेक्षा ब्राह्मण बळी मला जास्त पसंत आहे. तुझे म्हणणे कबूल आहे." शुनःशेपाला यज्ञस्तंभाला बांधले व वरुणाप्रीत्यर्थ यज्ञ सुरू झाला. शुनःशेपाला मारायला कोणी तयार होईना. तीनशे गाई घेऊन ठरल्या वेळी मुलावर प्राणघातक वार करायला अजीगर्त तयार झाला. यज्ञाला विश्वामित्र व इतर मोठे ऋषी आले होते. आपण आता बळी जाणार, हे पाहून

शुनःशेपाने वरुणासुद्धा सर्व देवांची करुणा भाकली. वरुणाच्या स्तुतीचे काव्य तो म्हणू लागला. आणि एकेका कडव्याबरोबर त्याचे पाश गळून पडू लागले. उषेने प्रसन्न होऊन शुनःशेपाला मोकळे केले. वरुणाने राजालाही रोगमुक्त केले, व मिळाला तो हविर्भाग घेऊन तो निघून गेला. यज्ञाच्या शेवटी शुनःशेपाने आई-वडिलांकडे जाण्याचे नाकारले. पोटाची खळगी भरण्यासाठी पोटच्या पोराला विकणारे व मारण्यास तयार होणारे हे लोक माझे आईबापच नव्हेत, असे तो म्हणू लागला व विश्वामित्राने त्याला दत्तक घेतले. अशी आहे जुनी कथा. पुराणांत तरी हीच कथा अगदी निराळ्या स्वरूपात सांगितलेली दिसते. हरिश्चंद्र राजा स्वप्नात दिलेले वचन पुरे करण्यासाठी राज्य सोडतो. आपल्या स्वतःला व बायको-मुलाला विकतो. शेवटी आपल्या बायकोला मारावयास तो तयार होतो. आणि मग त्याच्या एक-वचनीपणामुळे प्रसन्न झालेला विश्वामित्र ऋषी त्याच्या मेलेल्या मुलाला जिवंत करून सर्व राज्य परत देतो, – अशी कथा आहे.

ऐतरेयातला राजा मनुष्य होता. देवालासुद्धा तो आपला मुलगा द्यावयाला तयार नव्हता. वचनभंगाच्या पातकामुळे जलोदर झाल्यामुळे त्याने दुसराच एक विकत घेतलेला मुलगा देऊ केला, पण आपला मुलगा दिला नाही. नवस करणे म्हणजे देवाला प्रत्यक्ष वचन देण्यासारखेच आहे. पण राजाला मुलापुढे वचनाची किंमत नव्हती. ह्याउलट पुराणकालीन राजा स्वप्नात दिलेले वचन पुरे करण्यासाठी नाना तऱ्हेचे छळ पत्करतो; मनुष्यस्वभावाला विसंगत अशा गोष्टी करीत राहतो; आणि शेवटी सर्व काही परत मिळून वचनपूर्ति (म्हणजे राज्यदान) होतच नाही. सत्यवचनीपणा हे एक मायाजाळच ठरते.

हरिश्चंद्र-कथाच नव्हे, तर मागाहून येणाऱ्या इतरही कथा ह्याच धर्तीच्या आहेत. कुठल्या तरी एका गुणाची परिसीमा दाखवायची,

आणि शेवटी होणारा सत्यानाश न दाखविता सर्वतोपरी चांगलेच झाले, असे दाखवायचे, अशा धर्तीच्या ह्या नव्या युगातील कथा आहेत. महाभारताच्या काळापर्यंतचे वाङ्मय अगदी ह्याच्या उलट आहे.

महाभारताची कथा पहा. त्यामधली माणसे ही हाडामासाची, एका विशिष्ट समाजात राहणारी आहेत. ती काही कृत्ये करीत असतात व त्याची निमूटपणे फळे भोगीत असतात. आयुष्याच्या चाकाला एक दिशा व गती मिळालेली असते. ती दिशा बदलत नाही, ती गती थोपविली जात नाही. तो मनुष्य बाई असो, पुरुष असो, राजा असो, श्रीमंत असो, कंगाल असो, मनुष्य असो, देव असो, आयुष्याच्या ठरलेल्या फेऱ्यातून त्याला सुटका नाही. काही दिवस सुखाचे, ऐश्वर्याचे, भरभराटीचे, काही दिवस दुःखाचे, कष्टाचे, किंवा सर्वनाशाचेसुद्धा ! ही आयुष्याची गती भीष्माला चुकविता आली नाही, अंबेला चुकविता आली नाही. धर्माला चुकविता आली नाही, प्रत्यक्ष श्रीकृष्णालाही चुकविता आली नाही. भारत 'इतिहास' म्हणून गाइले गेले. 'हे असे झाले'. ते होत असताना व्यक्तीच्या आशा, आकांक्षा, तडफड, निराशा ह्या सर्वांचे चित्रण आले आहे; आणि सर्व मानवी पातळीवर. अतिमानुष चमत्कार जवळ-जवळ नाहीतच, म्हटले तरी चालेल. देव किंवा इतर शक्ती आणून माणसांना संकटांतून, निराशेतून काढले, असे आढळत नाही.

ह्या सगळ्याच्या मागे आचाराची आणि विचाराची एक घट्ट चौकट होती. ज्या गोष्टी करावयाच्या त्या धर्म म्हणून, कर्तव्य म्हणून, पुष्कळदा पुढे वाढून ठेविलेल्या आहेत, म्हणून करावयाच्या. त्यांतून सर्व सुखे मिळतील, ही आशाच कधी नव्हती. काही थोडेसे मिळाले, तर त्याच्याबरोबर पुष्कळसे गेलेले असावयाचे. युद्धामध्ये एक जीव मरतो, व जो जगाच्या दृष्टीने जिंकतो, तो सर्व सुखे

गमावून. ह्या कथेतून मनुष्याच्या आकांक्षापूर्तीला वाव नाही. मनुष्याच्या आकांक्षा सर्व प्रकारे पुरवील, असे दैवत नाही. खोट्या, खोट्या इच्छापूर्तीच्या कल्पनाही नाहीत. मनुष्य व त्याचे दैवत ही दोन्ही एका प्रचंड संसारचक्रात सापडलेली होती. ते चक्र परतविण्याचे सामर्थ्य कोणातच नव्हते.

मानवी जीवनाच्या मर्यादा महाभारतात स्वच्छ, स्पष्ट सांगितल्या आहेत. ह्या मर्यादा ओलांडण्याची कुठच्याही तऱ्हेची स्वप्नसृष्टी महाभारतात दिसत नाही. काहीतरी अघटित घडावे, कोणाची तरी कृपा व्हावी, व एकदम वाइटाचे चांगले व्हावे, असा प्रकार दिसत नाही. कर्तव्य करण्याचा उपदेश केला गेला, त्या वेळी सुखाचे किंवा वैभवाचे आमिष दाखविले गेले नाही. प्रश्न होता, तो मानाने जगण्याचा, आणि मानाने मरण्याचा. आणि हा मान होता जन्मजात मूल्ये संभाळण्याचा. 'जन्मजात' हा शब्द बुद्धया वापरला आहे. काही मूल्ये सबंध मानवजातीची म्हणून मानली गेली होती, तरी इतर मूल्ये ज्या तऱ्हेने मनुष्य जन्माला आला, त्यावर अवलंबून होती. कोणी क्षत्रिय होता, कोणी ब्राह्मण होता. कोणी मुलगी होती, कोणी आई होती, कोणी मुलगा होता, –आणि जो-तो आपल्या जन्मामुळे प्राप्त झालेली कर्तव्ये सांभाळून त्या स्थानाला चिकटलेल्या मूल्यांचे संरक्षण करीत होता. ह्या मूल्यांना धरून वागल्यामुळे जे कल्याण व्हावयाचे, ते जगात न दिसणारे, मानवी हातांनी न गवसणारे असे होते.

अगदी उलट परिस्थिती ह्यापुढच्या कालखंडात दिसते. सत्याच्या, शौर्याच्या, सतीत्वाच्या, भक्तीच्या कल्पना पराकोटीला गेलेल्या. त्यांचे वर्णन वास्तव नाहीच, आणि ते सर्व गुणही खोटेच. कारण ह्या कल्पनेप्रमाणे वागणाऱ्या माणसाला सर्व सुखे प्राप्त होतात. दुःखे क्षणभंगुर ठरतात. मनुष्य अमक्या तऱ्हेने वागतो, ते मूल्यांची

जोपासना करण्याच्या दृष्टीने वागतो की बक्षिसाच्या लालचीने, तेच कळत नाही. कथा, नाटक, काव्य – सगळ्यांवर ह्या वृत्तीचा पगडा बसलेला; म्हणून ज्या मूल्यांचा पुरस्कार केलेला, ती मुळातच आभासात्मक, पोकळ, असत्य वाटू लागतात. त्याप्रमाणे वागण्याचा नुसता देखावा उभा केलेला असतो. हरिश्चंद्र सर्वस्व देतो व सर्व पूर्वीच्या कितीतरी पट जास्त मिळते; उत्तररामचरितात रामाने मारलेला शंबूक दिव्य रूपाने परत येतो; सीतेचे धरणीच्या पोटात जाणेसुद्धा खोटे-खोटेच ठरते; चांगुणा मूल ठेचते, तेही परत मिळते. सर्व काही सत्त्वपरीक्षेच्या सदरात जाते व परीक्षेत उत्तम मार्क मिळाले की प्रसिद्धी होते, मान मिळतो, जे काय घालविले असेल, त्याच्या दसपट मिळते. ह्या किमयेत मानवी जीवनाच्या कष्टदायक मर्यादा नाहीतशा होऊन एक स्वप्नसृष्टी निर्माण होते. नायक-नायिकांवर अपरंपार संकटे कोसळावयाची, व त्यांतून त्यांनी पार होऊन जायचे, हा संकेत काव्यांत, नाटकांत सर्वत्र रूढ झाला. महाभारतानंतर हे युग सुरू झाले, ते आजतागायत टिकले आहे. ते युग स्वप्नाळू माणसांचे; आयुष्याला भ्यालेल्या माणसांचे. जे प्रत्यक्षात दिसत नाही, मिळत नाही, ते वाङ्मयद्वारा मिळविण्याची खटपट करणाऱ्यांचे. थोडे बौद्ध वाङ्मय, शंकराचार्यांचे ब्रह्मसूत्रभाष्य व काही थोड्या कथा वगैरेसारखे ग्रंथ सोडल्यास जवळ-जवळ सर्वच वाङ्मय ह्या धर्तीवरचे झाले.

हे सर्व वाङ्मय टाकाऊ समजण्यास मी तयार नाही. त्यातील काही अतिहृद्य आहे, पण त्यात महाभारताची धार नाही, चिरकाल विचार करावयाला लावील, असे काही नाही.

उत्तरकालीन भक्तिकथा तर ह्याहीवर ताण करणाऱ्या आहेत. अजामिळाची कथा, चांगुणेची कथा, त्यांपैकीच. अजामिळाच्या कथेत

सामाजिक मूल्यांचा पायाच मुळी उखडून टाकलेला आहे. चांगुणेच्या कथेतील भक्तीपायी केलेला त्यागही खोटा व त्यागाच्या सवाईने मिळालेले फळही खोटे![1]

भक्तीचा अतिरेक फक्त ईश्वरभक्तीतच नाही, तर गुरुभक्तीतही (व्यक्तिपूजेतही) दिसतो. 'यानि अस्माकं सुचरितानि तानि ग्रहीतव्यानि, नो इतराणि,' हा महाभारतपूर्व किंवा महाभारतकलीन उपदेश व ज्ञानेश्वरांपासून तुकाराम-रामदासांपर्यंत वर्णिलेली गुरुपूजा ह्यांच्या मनोभूमिकेत जमीन-अस्मानाचा फरक आहे. महाभारता-सारख्या ग्रंथाने सुरवात होऊन सर्वच वाङ्मय इतके मऊ-मऊ का झाले? 'धियो यो नः प्रचोदयात्' अशी प्रार्थना करणारे स्वतःची बुद्धी सर्वस्वी दुसऱ्याच्या हवाली कसे करू लागले, हे आपल्या समाजेतिहासातील एक मोठे कोडेच आहे.

महाभारतामध्ये मैत्री म्हणजे काय, ह्याचे त्या वेळच्या चाली-रितींना धरून उत्तम चित्रण झाले आहे. दारिद्र्याने गांजलेला द्रोण द्रुपदाच्या राजदरबारी येऊन आपण द्रुपदाचे बाळमित्र, म्हणजे आताचेही मित्र असे नाते सांगू लागला. द्रुपदाने हे मित्रत्व झिडकारले. 'राजा दरिद्री ब्राह्मणाचा मित्र कसा होऊ शकेल? मैत्री ही बरोबरीच्यांत असते, इतरांत नाही,' असे त्याने द्रोणाला बजाविले. द्रोणाने शिष्यांकरवी द्रुपदाचे अर्धे राज्य हिरावून घेऊन, 'आता आपण बरोबरीचे मित्र झालो,' असे म्हणून द्रुपदाला जीवदान दिले.

१. ह्या दृष्टीने पाहता 'द्रौपदी'मधील मी रचलेला शेवटचा भाग ही 'नरोटी' आहे. जे भीमाला कळले नाही, जे देण्याची शक्यता द्रौपदीला नव्हती, ते जणू दिलेच, असा भास मी निर्माण केला आहे. हे महाभारताच्या परंपरेला सोडून आहे.

—एवढे कळते आहे, तर शेवटचा भाग लिहिलाच का? मीही माझ्याच युगातली आहे. डोळे व मन दुबळे असलेली आहे. महाभारताच्या प्रकाशाचा झोत मला सहन झाला नाही.

ही गोष्ट मैत्रीची सुरवात नसून एका भयंकर वैराचीच सुरवात ठरली. कर्णाचा शस्त्ररंगात अपमान झाल्यावर दुर्योधनाने कर्णाला आपला मित्र म्हणवले व अंगाचे राज्य दिले. राजे-राजे म्हणून बरोबरीचे मित्र म्हणावे, तर तशी परिस्थिती नव्हती. एक क्षत्रिय होता, दुसरा लौकिकात सूत होता, व शेवटपर्यंत दुर्योधन-कर्णांचे नाते बरोबरीच्या मित्रांचे न होता पोष्य-पोषकांचेच राहिले. कर्णपर्वात शल्याचे शब्द हेच दाखवितात. अर्जुनाचा रथ कर्णाला दाखवून शल्य म्हणाला, 'कर्णा, दुर्योधनाने तुझ्यावर भार टाकला आहे. (८·६२·१३ – १४.) तो उचल. आता वेळ आली आहे.

अशाच तऱ्हेचे उद्गार भीष्माचेही होते. म्हणजे लौकिकात कर्ण-दुर्योधनांचे संबंध बरोबरीच्या मित्रांचे नव्हतेच. तिसरे उदाहरण कृष्णार्जुनांच्या मैत्रीचे आहे. ते मात्र अगदी बरोबरीच्या मैत्रीचे आहे. दोघांचा सामाजिक दर्जा क्षत्रियाचा; दोघेही धाकटे मुलगे म्हणून अभिषिक्त राजे नव्हते; दोघांनीही पराक्रमाने एकमेकांना मदत केलेली; घराण्यांत विवाहसंबंध झालेले; एकत्र बसून 'विक्रान्तानि रतानि च,' अशा युद्धे व प्रेम ह्यांबद्दल मनसोक्त गप्पा मारलेल्या; दोघांनी बरोबर बसून दारू प्यालेली; ह्याच अवस्थेत एकाच्या बायकोचे पाय दुसऱ्याच्या मांडीवर अशा तऱ्हेने वागलेले; एक दुसऱ्याशिवाय जगू शकत नव्हता. महाभारतकालातल्या गाढ मैत्रीचे ते प्रतीक होते. महाभारतात मैत्री – गाढ मैत्री – बरोबरीच्यांशीच होई, असे दिसते.

ह्यानंतरच्या काळात श्रीकृष्ण देवत्वाला पोहोचल्यावर त्याच्या व सुदाम्याच्या मैत्रीचे जे वर्णन आहे, ते महाभारतातील चित्रणाशी सर्वथैव विसंगत आहे. सुदामा हा एक गरीब ब्राह्मणाचा मुलगा कृष्णाबरोबरच गुरुगृही विद्या शिकत असे. शिकून झाल्यावर दोघेही आपापल्या घरी गेले. सुदामा कशातच – विद्येच्याही बाबतीत पारंगत

झाला होता, असे दिसत नाही. तो केवळ एक दरिद्री ब्राह्मणच राहिला. एवढेच नव्हे, तर तोंडाळ बायकोमुळेही गांजून गेला होता. ती त्याला म्हणे, 'अहो, तुमचा तो मित्र कृष्ण द्वारकेचा राजा झाला आहे, त्याच्याकडे जाऊन द्रव्य मागा,' ह्या गोष्टीत कृष्ण द्वारकेचा राजा दाखविला आहे. शेवटी कंटाळून सुदामा द्वारकेला जाऊन भीत-भीत राजद्वारी उभा राहिला. कोण आले आहे, हे कळल्याबरोबर कृष्ण सिंहासनावरून उठून दाराशी गेला. त्याने मित्राला मिठी मारली; आपल्या शेजारी आणून बसविले; आपल्या राण्यांकडून त्याला स्नान घातले; त्याने आणलेले मूठभर पोहे मोठ्या आवडीने खाल्ले; त्याचा पाहुणचार केला; व शेवटी त्याच्या गावात त्याला अपार धन दिले. ही कथा भारतभर सर्वांना माहीत आहे. महाराष्ट्रात प्रत्येक कीर्तनकार ती सांगत आला आहे. ह्या गोष्टीतली प्रत्येक घटना द्रुपद-द्रोणांच्या कथेकडे पाहून मुद्दाम तीविरुद्ध रचिलेली दिसते. श्रीमंतांनी चढेलपणे वागू नये म्हणून लिहिलेली ही नीतिकथा आहे, की देव (श्रीकृष्ण) श्रीमंत-गरिबांत भेद करीत नाही, हे पटविण्यासाठी ही कथा लिहिली आहे, हे कळत नाही. ज्याला 'मित्र' म्हटले आहे, तो एकदाच कृष्णाच्या मोठेपणच्या आयुष्यात येतो, व स्वतःची गरज भागवून जातो. आपल्या राज्यातल्या ब्राह्मण वगैरेंना तृप्त ठेवणे हे राजाचे कामच आहे. तेव्हा कृष्णाने केले, ते योग्यच. पण हा संबंध मित्रत्वाचा नव्हे, असेच महाभारताच्या आचार-विचारांच्या चौकटीचा विचार केला, तर म्हणावे लागेल. 'मित्र'-शब्दाचा अर्थच बदलला.

महाभारतापर्यंत आपले वाङ्मय ही स्वतंत्र नवनिर्मिती होती. टीकावाङ्मय हे सर्व नंतरचे. नवनिर्मितीही होत होती, पण टीका-वाङ्मय जास्त होते. एक प्रकारे हा क्रम सर्वच जागतिक वाङ्मयात दिसतो. वाङ्मयाच्या सुरवातीला सर्वच नवनिर्मिती असते. हीच

निर्मिती पुढील टीकावाङ्मयाचा पाया असते. महाभारत हे आपले प्राथमिक वाङ्मय. त्याने पुढच्या कित्येक शतकांच्या काव्य-नाटकांना, कथा-पुराणांना व टीकावाङ्मयाला खाद्य पुरविले.

महाभारतीय समाज बऱ्याच अर्थांनी संकुचितच होता. त्याच्या जीवनाचे चित्र दाखविते की, आधिभौतिक दृष्टीने – द्रव्याच्या दृष्टीने – तो कृषि-गोरक्षकांचाच होता. वैदिक आर्य येथल्या लोकांत मिसळू लागले होते. पण त्यांचे सांस्कृतिक जीवन बहुतांशी गोरक्षक आर्यांच्याच मर्यादेत राहिलेले होते. घोडे हे त्यांचे आवडते जनावर. घोड्यांच्या संख्येवर, रूपावर व गुणांवर क्षत्रियांचा मोठेपणा अवलंबून असे. बऱ्याचशा राजांची नावेही घोड्याच्या मालकीची वा गुणांची निदर्शक होती. उदा० 'हर्यश्व' (तांबडा घोडा असलेला); 'अश्वपति' (घोड्यांचा स्वामी); 'श्वेतवाहन' (अर्जुनाचे एक नाव); 'युवनाश्व' (एका प्रसिद्ध पूर्वकालीन राजाचे नाव). सारथी असणे, व रथातून लढणे (महारथी, रथी, अतिरथी) हा मोठेपणा समजला जाई. घोडा जोडलेले रथ असत. रथांची चाके अरा असलेली होती. रथ लहान-मोठे असत. पण महाभारतकाली कोणाला घोड्यावर बसता येत नसे. ती कला ख्रिस्तोत्तरकाली, म्हणजे भारतीय युद्धानंतर हजार वर्षांनी हिंदुस्थानात आली.

गोरक्षण व कृषि हा जीवनाचा पाया होता. गोमांस खात असत का? असत, असाही पुरावा नाही. नसत, असाही पुरावा नाही. वेद-ब्राह्मण-काली खात होते. सणासुदीला, विद्वान ब्राह्मणासारखा मोठा पाहुणा आला, तर खाण्याचा तो जिन्नस होता. तसा उल्लेख महाभारतात नाही. खात नसतीलच, असेही नक्की सांगता येत नाही. जागोजाग व्याधांचे उल्लेख आहेत. भीमाला मांस आवडे, ते ते मृगया करून आणीत, असाही उल्लेख आहे. पांडव मृगयेवर राहत.

त्यांनी आणिलेली मृगया त्यांचे ब्राह्मण आश्रितही खात असणार. मृगयेच्या व व्याधांच्या उल्लेखांवरून वाटते की, गोमांस खावयाचा प्रघात अजिबात नाहीसा तरी झाला होता, किंवा फारसा अस्तित्वात नव्हता. सर्व क्षत्रिय गाईंचे मोठाले कळप पाळीत. ते का? क्षत्रिय दूध विकीतसे दिसत नाहीत. मग गुरे कुटुंबाला दूधदुभत्यासाठी व नित्य होणाऱ्या यागाला लागणाऱ्या तुपासाठीच होती, का क्वचित खाण्यासाठीही, असा प्रश्न मनात येतो. कर्णपर्वातील उघड-उघड प्रक्षिप्त भाग कर्णाचे मद्र-बाल्हीक व गांधार या देशांतील माणसांबद्दलचे निर्देश हा वाटतो. कुरु-पांचाल धार्मिक, इतर राष्ट्रे अधार्मिक, असा समज झाल्यानंतरचा तो असावा. त्यात म्हटले आहे की, वरील तिन्ही राष्ट्रांचे लोक गोमांस खात व दारू पीत. (८·२७-७७.) दारू पिणे महाभारतकाळी क्षत्रियांना संमत होते, हे उघड आहे. तसेच गोमांस खाणेही संमत असेल. पुढे त्यावर धार्मिक बंधन पडल्यावर पश्चिमेकडील लोक जुने रीति-रिवाज पाळीत असल्यामुळे ते नव्या समजुतीप्रमाणे धर्मबाह्य ठरले असतील.

दूध, सान्नाय व घृत ही हविर्द्रव्ये होती. 'सान्नाय' म्हणजे दूध फाडून फडक्यात बांधून केलेला छाना. ही सर्व खाद्येही असणारच. मनुष्य स्वतःसाठी जे उत्पन्न करतो व खातो, तेच आपल्या देवांना वाहतो. 'घृत' म्हणजे काय? 'तक्र' व 'नवनीत' हे दोन्ही शब्द महाभारतात नाहीत. लोणी तापवून केलेले ते घृत, की गोचर्ममांस तापवून युरोपात काढतात तशी चरबी? तोच प्रश्न 'आज्य' ह्या शब्दाविषयी. 'आज्य' म्हणजे 'अजा'पासून झालेले ते. 'आज्य' हे बोकडाचे वा शेळीचे मांसही असू शकेल. 'आज्य' शब्द 'अञ्ज्' (='माखणे') ह्या धातूपासूनही होतो. आज्य म्हणजे ह्या अर्थाने अंगाला जे माखायचे ते. तिबेटी लोक व मध्य आशियातील पशुपालक

भटके लोक आजही सर्व तऱ्हेची चरबी व लोणी अंगाला फासायलाही वापरतात. घोडा अश्वमेधात बळी देत. अजा क्षुद्र यागात उपयोगी पडत असेल. इतरही जनावरे मेध्य होती. मेध्य जनावरे खाद्यही होती. गो ही मेध्य व खाद्य दोन्ही होती का?

महाभारतकालीन लोकांचे मुख्य धान्य काय होते, ते पुस्तकावरून कळत नाही. बहुधा जव असावे. क्षत्रिय भरपूर दारू पीत असत. धान्य जसे खाद्य होते, तसे देवाला पुरोडाशाच्या रूपाने अर्पण करावयाचे द्रव्यही असे. यागप्रधान धर्मात पत्र, पुष्प व फल ह्या तिहींनाही स्थान नव्हते. तशा तऱ्हेची पूजा महाभारतात नाही. गीतेत जरी ह्या तिन्हींचा ['पत्रं पुष्पं फलं तोयं यो मां भक्त्या' इत्यादि] उल्लेख असला, तरी तो नंतरचा समजला पाहिजे. महाभारतकाली जे आपले व आपल्या देवांचे खाद्य होते, ते मागाहून राहिले नाही. माणसे व देव दोन्ही बदलली.

ज्याचा निर्णय करता येत नाही, अशी आणखी एक महत्त्वाची गोष्ट आहे : ती म्हणजे लिपी व लेखन. महाभारतकाली लोकांना लिहिता येत होते का? महाभारतात लेखनाचा उल्लेख नाही. लिपी असती, तर उल्लेख आलाच असता, अशी ठिकाणे असूनही उल्लेख येत नाही. म्हणून लिहिणे माहीत नसावेसे वाटते. सगळी तोंडी निरोपानिरोपी. दूत पाठवायचे, तेही लिहिलेली चिठी न देता तोंडी निरोप देऊन. विदुराने वारणावताला धर्माकडे आपला जो एक विश्वासू 'खनक' (= खणणारा) पाठविला, तो तोंडी निरोप देऊन. निरोप फार गुप्त स्वरूपाचा म्हणून तोंडी दिला असे म्हटले, तरी इतर प्रकरणे मुळीच गुप्त नव्हती. प्रत्येक सांगावा चार माणसे जमवून बोलण्याचा होता. विराटपर्वात शमीवृक्षाखाली उभे राहून अर्जुन उत्तराला कोणची शस्त्रे कोणाची, हे जेव्हा सांगतो, त्या वेळी एका तरी शस्त्रावर नाव

असावे, अशी अपेक्षा असते. पण नाव नसून खुणा मात्र होत्या. सोन्याचे ठिपके [जातरूपस्य बिन्दवः] असलेले धनुष्य गांडीव, ज्याच्यावर सोन्याचे हत्ती ते भीमाचे, ज्याच्यावर इन्द्रगोप ते धर्माचे, ज्याच्यावर सोन्याचे सूर्य ते नकुलाचे व टोळ असलेले ते सहदेवाचे. त्याचप्रमाणे बाण कुणाकुणाचे, तलवारी व म्याने कोणाकोणाची, ह्याचे वर्णन आहे. एकाही आयुधावर नाव मात्र नाही. तसेच, राजाचे गोधन मुद्रांकित असे. पण मुद्रेवर नाव असे, असे दिसत नाही. ही गोष्ट क्षत्रियांची. क्षत्रियांना लिहिणे-वाचणे आले नाही, तरी अगदी परवा-परवापर्यंत चालतच असे. पण इतरांच्याही बाबतीत लेखाचे नाव नाही. कृषि व गोरक्षण लेखनाशिवाय चालू शकते. आर्यांच्या आधी भारतात वसलेल्या सिंधुकाठच्या लोकांना लिपी होती, लिहिणे होते. आर्यांची लिपी पहिल्याने ख्रिस्तपूर्व पाचव्या शतकात सापडते. त्याआधी दोन शतके लेखन आले असल्यास बुद्धाच्या वेळी लेखन होतेसे दिसते. बुद्धयुगाला वणिग्युग म्हटले, तर ते अपेक्षितच आहे. कारण द्रव्याच्या उलाढाली लेखनाशिवाय होऊ शकत नाहीत. महाभारतात लेखनाचा व लेखनसाहित्याचा, – शाई, पत्र व लेखणी यांतल्या कशाचाच उल्लेख नाही. लेखन असेल, पण असलेच, तर अपवादात्मक असावे. कदाचित सभा बांधणाऱ्या मयाला ती विद्या अवगत असली, तर कोण जाणे !

रुक्मिणीची कथा ही महाभारताचा भाग नसली, तरी त्या कालातीलच ! कृष्ण कितीही श्रेष्ठ असला, तरी तोही त्या काळातील क्षत्रियच होता. तेव्हा रुक्मिणीने स्वयंवरापूर्वी प्रेमपत्रिका लिहिणे व कृष्णाला ती वाचता येणे दोन्ही गोष्टी असंभाव्य.

जसे लेखन नव्हते, तशी विटांची वा दगडांची घरेही नव्हती. आर्य बहुधा लाकडी घरे बांधीत. पहिली बौद्ध लेणी ही लाकडी बांधणीच्या अनुकरणाची आहेत, असे जाणकारांचे मत आहे. यज्ञांत

निरनिराळ्या चिती सांगितल्या आहेत. त्यांसाठी इष्टका म्हणजे वीट लागत असे. वीट करणे एकदा माहीत झाले, म्हणजे विटा घरांसाठी वापरणे शक्य आहे. पण तसा उल्लेख नाही. गरीब लोक आज बांधतात, तशी मातीची घरे बांधीत असतील.

धर्म, तत्त्वज्ञान, सामाजिक मूल्ये ह्या बाबतींत खूप पुढे गेलेले हे लोक ऐहिक गोष्टीत फार पुढारलेले नव्हते. इतर आर्यभाषिकांप्रमाणेच मिसर व बावेरु येथल्या सेमिटिक-हामिटिक लोकांच्या मानाने ते मागासलेलेच होते. त्यांची शस्त्रे उत्तम होती, व वाहनांमुळे त्यांना जलद गती होती. घोडा हे जनावर त्यांनीच नव्याने मिसर व बावेरु (इजिप्त व बाबिलॉन) देशांत नेले व त्याच्याच साहाय्याने ते देश जिंकून कांही काळ त्यांनी त्यांवर पगडा बसविला. ह्याच भाषिक समूहातील लोक ग्रीसमध्ये गेले. ग्रीसमधील समाजव्यवस्था, दैवते व महाभारतातील चित्र ह्यांत विलक्षण साम्य आहे, व विचार करायला लावतील, असे फरकही आहेत. त्यांनीही अशाच एका जुन्या लढाईचा 'इलियड' नावाच्या अमर-काव्यात वृत्तान्त दिला आहे. त्यात जी समाजस्थिती दिसते, ती आपल्या महाभारतकालीन समाजस्थितीशी जुळती आहे. तेथेही लहान-लहान राज्ये होती. सगळे राज्यकर्ते एकमेकांच्या बरोबरीचे होते; व ट्रॉयच्या युद्धात या राजांचे मानापमान करता-करता बिचाऱ्या आगामेम्नॉनची दुर्योधनाप्रमाणेच अवस्था झाली होती. ग्रीक कथेत देवादिकांची ढवळाढवळ महाभारतकथेपेक्षा जास्त आहे. ग्रीक देव एकमेकांशी भांडतात. ग्रीक कथांतून देवींचे स्थान स्वतंत्र, (उदा० पालासअथीनी) – देवांइतकेच महत्वाचे आहे. महाभारतकाळापर्यंत आपल्याकडे देवींना वा देवांच्या बायकांना स्थान नाही. दोन्ही समाज पितृप्रधान असूनही ग्रीकांच्या कथात स्त्रियांची चरित्रे ठळक, वैशिष्ट्यपूर्ण व विविध आहेत. मानवी समाजात काय, किंवा स्वर्गात

काय, ग्रीकांमध्ये स्त्रीला भारतातल्यापेक्षा जास्त महत्त्व होते, ह्यात शंकाच नाही. ग्रीकांच्या मानाने आपल्याकडील स्त्रिया उदात्त असल्या, तरी एकाच ठशाच्या व कंटाळवाण्या वाटतात. माता व पत्नी ह्या दोन भूमिकांतच त्या दिसतात. नवऱ्याने पोटच्या पोरीला देवाला बळी दिली, हे निमित्त पुढे करून नवऱ्याला मारणारी क्लिटेमनेस्ट्रा, आपला मुलगा मेलिआगर ह्याने आपला भाऊ थेस्टिआडीस ह्याला भांडणात मारले म्हणून रागाच्या भरात मेलिआगरला मारणारी त्याची आई आलथिआ, आपला शापित भाऊ ओरेस्टेसबरोबर वणवण हिंडणारी इलेक्ट्रा[1], पापाचे प्रायश्चित म्हणून म्हातारपणी इडिपसने आपले डोळे फोडून घेतले तेव्हा ठरलेले लग्न मोडून ह्या निराधार अपंग बापाची काठी होणारी इफिजेनिया, अशी कितीतरी अविस्मरणीय विविध चरित्रे ग्रीक कथांतून आहेत. ग्रीकांचे देव व देवताही आपल्याकडील देवांच्या मानाने भारी रागीट, उतावळ्या व स्वभावाने दुष्ट वाटतात. ग्रीक कथेत

---

१. महाभारतात बहीण-भावांच्या प्रेमाबद्दल दाखले मिळत नाहीत. बहिणीच्या मोबदल्यात पराक्रमी वा श्रीमंत मेहुणा मिळवायचा, हाच भावाचा मुख्य उद्देश दिसतो. लग्न झाल्यावर बायकांचा माहेरघरी फारसा संबंध राहत नसे, असे दिसते. वैदिक वाङ्मयात मात्र बहीण-भावांचे संबंध जवळचे दाखविले आहेत. भावाशिवाय असलेल्या बहिणींची स्थिती शोचनीय होती, असेही उल्लेख आहेत. पण महाभारतात बहीण-भावांच्या प्रेमाचे उल्लेख नसले, तरी गांधारीच्या व द्रौपदीच्या पाठीशी भाऊ होते व कुंतीच्या पाठीशी भाऊ नाही तरी भाचा होता, असे दिसते. तरी गांधारीचे व शकुनीचे बोलणे किंवा धृष्टद्युम्न-द्रौपदीचे जिवाभावाचे संभाषण कुठे दिलेले नाही. पुढील काळात हीच परिस्थिती संस्कृत वाङ्मयात दिसते. पण मध्ययुगानंतर संस्कृत ग्रंथांतून यमद्वितीया व रक्षाबंधन ह्या सणांमध्ये भावा-बहिणींचे संबंध फार जिव्हाळ्याचे दाखविले आहेत, व भारतभर आजकालच्या सर्व भाषांतून भावा-बहिणींच्या प्रेमाने थबथबलेले लोकवाङ्मय आहे. लोकांच्या तोंडी असलेल्या वाङ्मयातून सापडणारा हा भाव संस्कृतात नाही, पण आजकालच्या लिखित वाङ्मयात सर्वत्र आढळतो. जुन्या संस्कृताच्या परंपरेत अशा तऱ्हेचे संबंध नव्हते, पण बहुजनसमाजात होते व त्यांच्याकडून ते हळूहळू समाजातील सर्व थरांत पसरले, इतकेच नव्हे, तर वाङ्मयातही त्यांना स्थान मिळाले.

बहीण-भाऊ ह्यांचे नाते अतिशय प्रेमाचे व जवळिकीचे दाखविलेले आहे. लग्न झाले, म्हणून स्त्री आपल्या माहेराला विसरत नव्हती. मूळ एक पण मागाहून निरनिराळ्या प्रदेशांत गेलेल्या दोन पितृप्रधान संस्कृतींत हा फरक का असावा, असा प्रश्न साहजिकच उभा राहतो. ग्रीकांवर मिसरी संस्कृतीचा परिणाम झाला असला पाहिजे. मिसर देशात राजा जरी पुरुष असला, तरी संस्कृती मातृप्रधान होती, व स्त्रियांचा दर्जा फार मोठा होता. त्याचा हा परिणाम असेल.

ग्रीकांमध्येही राजकुले, पूजा-अर्चा करणारा वर्ग व इतर समाज होता. त्याशिवाय परिचर्या करणारा दासवर्गही होता. राजकुले जाऊन लोकसत्ताक प्रस्थापित झाले, तेव्हा मताधिकार फक्त वरच्या तीन लोकांना होता. दासांना नव्हता. तोच प्रकार आजपर्यंत अमेरिकेत होता. इतर पाश्चात्त्य देशही एकाच वेळी घरी लोकसत्ताक व बाहेर साम्राज्यवादी होते व आहेत. आपले व परकीय, आपले देव व परकीयांचे देव, आपले हक्क घेण्याची व परकीयांना हक्क न देण्याची प्रवृत्ती – हे सर्व तेव्हा होते, आताही आहे. मात्र तेव्हाच्या लिखाणात ह्या गोष्टी स्पष्ट आहेत. तेव्हाचे मानवसमाज लहान-लहान होते. ह्या तऱ्हेची समाजव्यवस्था हीच स्वाभाविक समजली जाई. तीत लपविण्यासारखे काही वाटत नसे. हल्ली पूर्वीच्या गोष्टींपैकी खूपच गोष्टी शिल्लक आहेत. पण त्या जणू नाहीतच, अशा भावनेने लोक लिहीत असतात. जुने नुसते त्याज्यच नाही, तर हल्लीच्या काळाला गैरलागू, अशी बऱ्याच लोकांची समजूत असते. तसे ते नाही. जुने कधीही सर्वस्वी टाकाऊ व सर्वस्वी गैरलागू होत नाही; नवे ते इतके नवे कधीही नसते की, त्यात जुन्याचा अंशच नाही. अशी मानवशास्त्राची बैठक आहे. जुने, नवे, जवळ-जवळचे तसेच लांब-लांबचे, अप्रगत व प्रगत, सगळेच मानवसमाज अभ्यासास

योग्य आहेत. अभ्यास व्हावा तो पूर्वी काय होते व आज काय आहे, त्याची तुलना करता येईल, ह्या दृष्टीने व्हावा. अभ्यासाआधीच ठाम मते ठरवून मूर्तिपूजकाप्रमाणे भक्तिभावानेही होऊ नये व मूर्तिभंजकाच्या आवेशाने द्वेषभावनेनेही होऊ नये, इतकीच प्रार्थना.



हे सर्व लिहीत असताना एका मित्राने एक विचार मांडला. वेद, उपनिषदे, महाभारत अशी सुरवात झाल्यावर आपल्या सबंध समाजाने पलटी का खाल्ली ? इतक्या कणखरपणे आयुष्याचा विचार केल्यावर भक्तिमार्गाचा स्वप्नाळूपणा व विभूतिपूजा त्याने कशी पत्करली ? गोमांसासुद्धा सर्व तऱ्हेचे मांस खाणारे शेवटी गाईचे शेण खाऊन व मूत पिऊन, एका चार पायाच्या जनावराला आपली माता कशी समजू लागले ?

ह्या प्रश्नांची उत्तरे देणे – निदान एकट्या माणसाने ती देणे – अशक्य आहे. विचार व्हावा, म्हणून माझे व इतरांचे प्रश्न पुढे टाकले आहेत. दुसऱ्या एका मित्राने मांडलेला विचार मात्र काहीसा सुखकारक आहे. तो म्हणाला, “अहो, दुसरे काही टिकले नाही, पण भाषा टिकली आहे, हे नशीब समजा. आज तुम्हांला महाभारत वाचता येऊन त्याचा अर्थ समजतो आहे, हे भाग्य नाही का ? नाहीतर मोहेंजोदारोप्रमाणे झाले असते. चित्रे आहेत, वस्तू आहेत, काहीतरी लिहिलेले आहे, पण काय ते मात्र भाषेच्या ज्ञाना अभावी कळत नाही.” खरेच केवढे माझे भाग्य की, आज मला तीन हजार वर्षांपूर्वीची ‘जय’ नावाची कथा वाचता येते आहे, व तीत माझे प्रतिबिंब पाहता येत आहे !

वर्षप्रतिपदा, शके १८८९
१० एप्रिल, १९६७

## महाभारतात उल्लेखिलेले काही समाज

(१) वैदिक समाज : मानववंशाबद्दल काही विशिष्ट कल्पना मनात बाळगल्या नाहीत, तर ह्या समाजाला 'आर्य' म्हणावयास हरकत नाही.

ह्यात मुख्यत्वे तीन प्रकार : ब्राह्मण, क्षत्रिय व विश्. ब्राह्मण, क्षत्रिय व विश् ह्या तिघांचे चाकर, दास, दासी वगैरे, ते शूद्र. फक्त ब्राह्मण व क्षत्रिय यांचे परिचारक, पुष्कळदा क्षत्रियाना अति जवळचे असे, ते सूत (उदा० विदुर, संजय, सुदेष्णा वगैरे).

(२) वरील गटाशी मित्रत्वाचे वा शत्रुत्वाचे नाते असलेला मुख्य गट नाग. त्याची मुख्य घराणी :

तक्षक—खांडववनाचा राजा : पांडवांशी तीन पिढ्यांचे वैर.

ऐरावत कौरव्य—ह्याचेच प्राकृत स्वरूप एलापत्त. अर्जुनाची एक बायको उलूपी ह्याच्याच कुळातली.

वासुकी—भोगावतीचा राजा. मुलगी जरत्कारु त्याच नावाच्या ब्राह्मणाला दिली. तिचा मुलगा आस्तिक ह्याने मातृकुलाला जनमेजयाच्या सर्पसत्रापासून वाचविले.

(३) दासराज—गंगेवर बोटी चालविणाऱ्या, मासे धरणाऱ्या लोकांचा राजा. ह्याची मुलगी काली—सत्यवती—मत्स्यगंधा हिचे लग्न शंतनूशी झाले. ही धृतराष्ट्र-पांडूंची आजी.

(४) पक्षिकुलाची नावे असलेले नागेतर अरण्यवासी लोक. शार्ङ्गी नावाच्या बाईला ब्राह्मणापासून झालेल्या संततीला अर्जुनाने खांडवदाहाच्या वेळी जीवदान दिले.

(५) अरण्यवासी राक्षस (?)—हिडिंब, बक वगैरे.

ह्यांतील एका बाईशी—हिडिंबेशी भीमाचे लग्न झाले. त्यांचा मुलगा घटोत्कच लढाईत मारला गेला.

(६) मणलूरपुरचा राजा व प्रजा. ह्याची मुलगी चित्रांगदा हिचे अर्जुनाशी लग्न झाले. ती व तिचा मुलगा तिच्या माहेरीच राहत होती. मातृप्रधान घराणे होते काय ते कळत नाही.

# कुरूंची वंशावळ

ययाति

— पूरू

कुरू

प्रतीप

देवापी

बाल्हीक (मामा घरी दत्तक गेला.)

गंगा × शंतनू × सत्यवती × पराशर ब्राह्मण

भीष्म

चित्रांगद

व्यास

विचित्रवीर्य × अंबिका
अंबालिका
दासी



## यदुवंश

सबंध वंश दिला नाही. मुख्य-मुख्य नावे दिली आहेत. वंश फार विस्तारलेला व पुराणांत त्याबद्दल एकवाक्यता नाही, असा आहे. महाभारतात कोठेही ह्या वंशाची संगतवार माहिती नाही. हरिवंशात फारच घोटाळ्याची व चुकीची माहिती आहे. वरील वंशावळ निरनिराळ्या पुराणांचा अभ्यास करून पार्गिटरने आपल्या 'जनरल सर्व्हे ऑफ एन्शंट इंडियन हिस्टॉरिकल ट्रॅडिशन', १९२२, ह्या पुस्तकात दिलेल्या वंशावळींवरून तयार केली आहे. जेथे बापमुलाचे नाते, तेथे उभी ओळ सलंग काढली आहे. जेथे जास्त लांब वंशजाचे नाते, तेथे तुटक टिंबांनी दाखवली आहे. चेदी, विदर्भ, भोज, वृष्णी, अंधक, शैनेय हे सर्व पितृकुलाकडून नातेवाईक होते. त्यांची परस्परांत लग्नेही होत होती. चेदी व विदर्भ ह्यांची स्वतंत्र राज्ये होती. इतरांवर जरासंधाची संक्रांत आल्याने त्यांनी द्वारकेला जाऊन राज्य स्थापिले. कदाचित मथुरा कंसाच्या मुलांच्या ताब्यात असावी. ह्या वंशावळीवरून कृष्णाची पैतृक नावे ( माधव, यादव, सात्वत, वार्ष्णेय, शौरी व वासुदेव ) समजतील.

# कुरूंशी संबंध आलेली घराणी



# कुरूंशी संबंध आलेली घराणी







## विराट



# कुरूंशी संबंध आलेली घराणी







महाभारतकालीन
उत्तरभारत
0 100 200 300 400 500 किलोमीटर
गांधार
तक्षशिला
सरस्वती
सिंधु
हस्तिनापुर
इन्द्रप्रस्थ
अहिच्छत्र
मथुरा
काम्पिल्य
अयोध्या
कामरूप
अङ्ग
मगध
चेदी
मार्तिकावत
नर्मदा
पूर्णा
विदर्भ
गोदावरी
महानदी
कलिङ्ग
द्वारका

## आमची प्रकाशने

इरावती कर्वे

**परिपूर्ति**

**भोवरा**

**आमची संस्कृति**

**मराठी लोकांची संस्कृति**

## आमची प्रकाशने

नरहर कुरुंदकर

**रूपवेध**

**मागोवा**

मालतीबाई बेडेकर

**घराला मुकलेल्या स्त्रिया**

शि. गो. भावे

**करुण नाट्यांतील कांही नायक**